मनोहर ग्रंथ–माला : प्रकाशन ५७ वें

# पा ऊ ल वा ट

श्रीधर देशपांडे

वर्षप्रतिपदा
१८७२



१९ मार्च
१९५०

मूल्य ४ रुपये

# श्रीधर देशपांडे यांचें साहित्य

- **सहारा**—पत्रानी सांगितलेली करुणरम्य प्रणयकथा
  ( शिल्लक नाही )
- **सायंतारा**—नाविक जीवनावर आधारलेली प्रीतिकथा
  ( शिल्लक नाही )
- **ठेंगणें अस्मान**—एका वैमानिकाच्या आयुष्यात विवाहोत्तर उत्पन्न झालेला प्रणयत्रिकोण मूल्य ४ रुपये
- **पाऊलवाट**—एका विरागी महाभागाची वैचित्र्यपूर्ण जीवनकथा.
  मूल्य ४ रुपये

**मनोहर ग्रंथ-माला टिळक रोड, पुणें २.**

माझ्या पाऊलवाटेवर पावलं टाकायला जिनं
मला शिकवलं त्या माझ्या आईस ( **अक्कास** )

नि

पाऊलवाटेवर चालतांना जी माझी साथ करीत
आहे त्या माझ्या पत्नीला ( ' **मालिनी** 'स )

**ही ' पाऊलवाट ' अर्पण करीत आहे.**

— श्रीधर देशपांडे

मनोहर

प्र का

## शिल्लक नाहींत

(१) तिरगी नवमतवाद · न. चि. केळकर
(२) विस्तवाशी खेळ वा म जोशी
(४) हास्य-विनोद-मीमासा न चि. केळकर
(५) सहारा श्रीधर देशपाडे
(६) वलिदान न चि केळकर
(८) चद्रगुप्त न चि केळकर
(१२) न्याहारी वि म कुलकर्णी
(१३) वादळी वारे (आ दु) प्रा केळकर
(१४) इब्सेन ग भा. निरतर
(१५) उन्माद प्रा फडके
(१६) बीजाकुर शाताराम आठवले
(१७) दुसरी सावली श्री बोकील
(१८) कागदी विमाने र. गो सरदेसाई
(१९) बोकिलाच्या गोष्टी
(२०) गुप्त प्रायश्चित्त प्रा फडके
(२४) सायतारा श्रीधर देशपाडे
(२६) लयलूट कथासग्रह
(२७) Hindu-Pad-Padashahi Savarkar
(२८) पालापाचोळा न चि केळकर
(२९) विसर्जन वि म कुलकर्णी
(३४) ससेमिरा सरदेशमुख
(३९) From Quit India to split India: Bhide Guruji
(४५) नेताजीचे सहवासात . पु. ना. ओक

ग्रंथमाला

शनें

## शिल्लक आहेत

(३) फरेच राज्यक्रांति २॥
न. चि केळकर
(७) 'समग्र केळकर'-वाङ्मय ७५
(९) राका सौ सजीवनी मराठे १।
(१०) प्रतारणा प्रा. दांडेकर २
(११) मसारसोपान १।
सौ गिरिजाबाई केळकर
(२१) प्रदक्षिणा २॥
शतवार्षिक वाङ्मय-समालोचन
(२२) सस्कृतिसगम प्रा केळकर ६
(२३) चपी आणि मोत्या १॥
(२५) वेदप्रकाश पाठकशास्त्री १०
(३०) जीवनविहार २
आचार्य कालेलकर
(३१) स्मरणसाखळी ६
कमलाबाई देशपांडे
(३२) रानोमाळ रा वि फडतरे २॥
(३३) साहित्यविहार . प्रा केळकर ३
(३५) गावरान गीता २
न चि केळकर
(३६) काव्यालोचन प्रा केळकर ५
(३७) हसरा निर्माल्य व चिमण्या २
कमलाबाई देशपांडे
(३८) साहित्याचा ध्रुवतारा
प्रा वाळिंबे ३
(४०) 'नरसिंह' केळकर १॥
वि. उ. वैद्य
(४१) ज्ञानेश्वरी-सर्वस्व ५
न चि केळकर
(४२) ठेंगणे अस्मान ४
श्रीधर देशपांडे
(४३) गानसचित्रे ३
गंगाधर गाडगीळ
(४४) उपायन म म केळकर २॥
(४६) सस्कृत काव्याचे पचप्राण
डॉ के ना वाटवे ६
(४७) काव्यविहार : मा. पटवर्धन ४
(४८) Location of Lanka २
Sardar Kibe
(४९) तिसऱ्या महायुद्धाच्या छायेत ५
य न केळकर
(५०) हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा
श दा चितळे ३
(५१) हिंदी क्रिकेट ५
र गो सरदेसाई
(५२) स्त्रीगीते : कमलाबाई देशपांडे ३
(५३) मां थेन थेन . कथासकलन ३
(५४) रत्नाकार द पा. खांबेटे २
(५५) गोकुळच्या गौळणी २
महादेवशास्त्री जोशी
(५६) कामधेनू अर्थात् सुलभपाकशास्त्र
सौ. गिरजाबाई केळकर
(५७) पाऊलवाट : श्री. देशपांडे ४
(५८) आमच्यापुढील प्रश्न !! २॥

# कमलाबाई देशपांडे यांचें साहित्य

**स्मरण सांखळी**— शिक्षणविषयक आत्मवृत्त, स्त्रियाच्या हातून उतरलेल्या उत्कृष्ट आत्मचरित्रापैकी एक

**हंसरा निर्माल्य व चिमण्या**—सुदर व्यक्तिचित्रे

मूल्य सहा रुपये

**अपौरुषेय वाङ्मय अर्थात् स्त्रीगीतें**— सखोल अभ्यासातून उतरलेले महत्त्वाचे पुस्तक

मूल्य तीन रुपये

The child in Ancient India— A study of Ancient Social Customs

मूल्य ४ रुपये

मनोहर ग्रंथ-माला टिळक रोड, पुणें २

# अनुक्रमणिका





प्रकाशक **मनोहर महादेव केळकर**, १९६/८५ सदाशिव पेठ, पुणे २

मुद्रक **न वि सरदेशपांडे**, आदर्श मुद्रणालय ३९५/५ सदाशिव, पुणे २

# — पाऊलवाट —

## ....उपोद्घात : : :

सह्याद्रि पर्वतराजीच्या अनेक पठारापैकी ते एक पठार होते पुण्या–मुबई-च्या मोठ्या सडकेपासून काही मैलच आत असेल ते पण त्या पठारावर उभे राहिल्यावर विजनवनातल्या अनिर्बंध मोकळेपणाची चव ताबडतोब लागत होती

आसपास दृष्टिपथात कुणीसुद्धा माणूम दिसत नव्हते आपल्याला कुणी पहात नाही अशी खात्री असल्यावर एकादा वन्य पशु मन मानेल तसा आप-ल्याच छदात निर्वेध रगून जातो, तद्वत् सृष्टि आपल्याच नादात गुगल्यासारखी वाटत होती

पठारावर गवते वाढलेली होती. ती कुणीहि न तुडवल्यामुळे वा तोडल्या-मुळे जशीच्या तशी होती वठून गेल्याने त्याचा रग सोनेरी पिवळा दिसत होता. त्या गवतातून साधीसुधी रानफुले माना वर काढून पहात, घोसदार पाढरे झुबके नी तुरे डोकावत भालाइताने खाद्यावर भाला उच धरावा त्या-प्रमाणे गवताच्या दाटीतून उच भाले वर निघालेले दिसत.

वाऱ्याच्या झुळकेगणिक साऱ्या गवतावर लाटा उठत आणि सर्व कुरणात चैतन्य भरलेले दिसे. गवताच्या अधेमधे लहान झुडपे होती त्यामधल्या आपल्या घरट्यातून रानपाखराचा एखादा थवा अचानक बाहेर पडून भरारी

मारी मग गवताच्या पृष्ठभागाच्या वर उडत पुन कोठेतरी गवतामध्ये बसून अदृश्य होई त्यामुळे एकादवेळे ः । होई की, गवताचे कुरण जणू काही कुणी काळया फणीने विचरत आहे

वर आकाशात ढग होते, पण ते चागल्या हवेचे त्याच्यात भीषणपणा नव्हता जणू काही त्याच्यावाचून चित्र अपुरे राहील म्हणूनच त्याची उपस्थिति एकाद्या लग्नसमारभात कुटुबातील झाडून सारी मण्डळी नाही का एकत्र फोटोला उभी राहात ! त्याचप्रमाणे सृष्टीच्या या चित्रात मागच्या रागेत ढग उभे राहिले होते

अथवा एकादी मोठी आरास माडून तिच्यामागे मोठा बिलोरी आरसा ठेवावा त्याप्रमाणे वक्ररेखाकित पाढऱ्या शुभ्र ढगाची रचना त्या देखाव्याच्या मागच्या बाजूला झाल्याने जास्तच शोभा येत होती

देखाव्यात रगकामसुद्धा काही थोडेथोडके नव्हते आकाशाची नीळ घातल्याने ढगाची धुलाई अगदी पाढरी शुभ्र झाली होती

पश्चिम क्षितिजाकडे रगाचे मोठे बटबटीत व ठळक पट्टे दिसत होते आधुनिक तऱ्हेवाईक चित्रकाराने काढलेल्या अभिनव साप्रदायी चित्राप्रमाणे ते होते त्यातील एक एक निरनिराळा रग जरी फारच भडक व जुन्या कलापद्धतीशी बडखोर वाटला,तरी त्या सर्वांचा मिळून होणारा सकलित परिणाम फार प्रभावी होता यात शका नाही

मद्र सप्तकातला षड्ज् दीर्घ लावून धरावा, त्याप्रमाणे पठाराचा पसारा सथ पसरला होता आणि तो स्वर धरून आजूबाजूच्या देखाव्याची जणू काही एक रमणीय पण धीरगभीर रागदारी रगत होती दरबारी कानडयाचा रुबाब त्या देखाव्यात होता सृष्टीला माणसाप्रमाणे कालाची कधी ददात पडत नाही त्यामुळे सृष्टीची गाने विलबित लयीत गायलेली ऐकू येतात पठाराच्या सोनेरी कुरणाचा जर ‘ सा ’ मानला, तर उच्च ढगाचे तारसप्तकातील ‘ मध्यम ’ आणि ‘ पचम ’ लागत होते आणि या दोन मर्यादाच्यामधे पक्षाचे थवे ज्या भराऱ्या मारत, हरकती आणि मुरडी घेत त्यामुळे एकाद्या कलावताच्या कसलेल्या गळयातून उमटलेल्या स्वरसभाराची आठवण होई

पण या सर्व वनशोभेची ज्याला मुळीच दखल नव्हती असा एक विमनस्क तरुण आपल्याच विचाराच्या तद्रीत झपाझप पावले टाकीत चालला होता.

या सर्व कुरणामधून चक्राकार उलगडत जाणाऱ्या एका पाऊलवाटेवर त्याची दृष्टि खिळली होती, व पाऊलवाट जाईल तिकडे तो चालला होता त्याच्या चेहऱ्यावर उद्विग्नतेचे सावट पडले होते तो ओठ अधूनमधून चावी, त्यावरून त्याच्या मनातली चीड दिसत होती हाताचे पजे तो उघडत मिटत होता. त्याच्या बोटाच्या अस्थिरपणावरून त्याच्या मनातल्या खळबळीची कल्पना येत होती पाऊलवाटेच्या दोन्ही बाजूनी पुढे डोकावणारी गवते त्याच्या पावलात अडमडत आणि त्याचे भाले त्याच्या कपड्यात घुसत पण त्याच्या टोचण्यामुळेसुद्धा त्याला भान येत नव्हते, की त्याचा वेग कमी होत नव्हता.

चालता चालता पठाराचा पृष्ठभाग जिथे खडकाळ झाला होता तिथवर तो आला या पत्थरावर गवत मुळीच नव्हते पावसाळ्यातील पाण्याच्या प्रवाहाने त्यावरची माती धुपून जाऊन पत्थर उघडा पडला होता त्यावरून पुढें चालत काही पावले टाकल्यावर तो तरुण एकदम भानावर येऊन स्तब्ध उभा राहिला त्याने चमकून अर्धे पाऊल मागेच टाकले, कारण त्याच्या दोन पावले पुढे पठार एकाएकी सपून दीडदोन हजार फूट तुटका कडा आ वासून उभा होता! तिथून समुद्रपट्टीच्या तळकोकणच्या भागाचे एकदम दर्शन होत होते त्या प्रचड देखाव्याच्या अवचित घडलेल्या दर्शनाने आपल्या विचाराचा क्षणभर विसर पडून तो तरुणहि मत्रमुग्ध झाल्याप्रमाणे उभा राहिला

पठारावरच्या देखाव्याची रागदारी कड्यापाशी एकदम सपून निसर्गाने पुढच्या देखाव्यात जणू काही अगदी दुसऱ्याच थाटाच्या रागाची रगत सुरू केलेली होती

डोगरानी कडेवर घेतलेल्या काळ्या कपारी, कपारीना घट्ट बिलगून राहिलेली वाकडी तिकडी झाडे – झाडाच्या खाली पसरलेल्या खोल दऱ्या – डोगराच्या पायथ्याच्या उतरणीवर पायऱ्यापायऱ्यानी लावलेली भातखाचरे – भातखाचराच्या अधेमधे उठून दिसणाऱ्या वाड्या – वाड्यामधली गुरेढोरे – त्याना वळणारी अर्धनग्न, फाटक्या अगाची काटक पोरे – त्या पोराइतक्याच अचपळतेने झोपड्याबाहेर पडून, पण मग चक्राकार वेटोळी घेत उच वर चढत शेवटी वाऱ्यात विरून जाणारे धुराचे स्तभ – दरीच्या तळाशी वेडीवाकडी वळणे घेत वाहणारा डोगरओढा – ओढ्याच्या पुढे चकाकणाऱ्या खाड्या – आणि त्या सर्वांपुढे अत्यत दूर अतरावर धूसर वातावरणात अरबी

समुद्र आणि आकाश यांचे अनिर्णित क्षितिजाशी झालेले मीलन – असा तो प्रचंड देखावा होता

दृष्टि त्या दूरच्या देखाव्यावरून काढून अगदी जवळ पायाखाली लावली की, एकदम तुटलेल्या दीड दोन हजार फूट खोल कड्याची उभी दरड दिसे, आणि मनात धसका वाटे की, हे सृष्टिसौंदर्य मनोहारी वाटले तरी इथे आदबी-नेच वागले पाहिजे इथे चुकीचे पाऊल टाकले तर निभाव लागणार नाही

हा देखावा पाहून वाटे की, सृष्टीच्या या प्रचंड पसाऱ्यापुढे व निसर्गाच्या अवाढव्य उलाढालीपुढे माणसाचे जीवन फार क्षुद्र आणि क पदार्थ आहे ! सृष्टीला कालमर्यादा नाही तिच्या सथ गाण्याला मानवी आयुष्याच्या द्रुत लयीचा ठेका अपुरा पडतो इतक्या प्रचंड पसाऱ्यात मनुष्याच्या छोट्या जीविताची काय एवढी पत्रास असणार ?

या तरुणाच्या पायाशी पत्थरामध्ये पावसाळी पाण्याने घगाळाप्रमाणे खोलगट घळ पडली होती त्यामधे सहज बसता येईल अशी जागा झाली होती, आणि तेथे बसून सर्व देखावा उत्तम दिसत होता

तो तरुण बराच वेळ तिथे उभा राहिला आणि मग त्या पत्थरातल्या जागे-वर बसला त्याने आपल्या अंगातला कोट काढून टाकला. कड्यावर कोपर रोवून हाताच्या पंजावर हनुवटी टेकली आणि त्या दूर देखाव्यावर दृष्टि लावून तो विचारात गढून गेला.

"जग मोठ्ठं चमत्कारिक आहे. इतक्या तरुण वयात मला माणसातून उठाव लागेल अशी यत्किंचितहि कल्पना नव्हती तान्हा असतानाच मी पोरका झालो त्याच वेळी मी उघडा पडून मरायचा वास्तविक त्या वेळी अंगावर थोडा वेळ पांघरूण नसतं किंवा दुधाचे दोन घोट पोटात गेले नसते तर आपोआप माझं जीवन संपुष्टात आलं असतं आणि त्या वेळेला काहीच कळत नसल्यामुळं यातनांचीहि जाणीव झाली नसती जन्म होताना कळलं नाही, तसंच जीव जातानाहि कळलं नसतं. पण म्हणतात ना तशातली गत ! कुणाला कुणाची माया लागते मला कुणीतरी आपल्या मायापाखरेखाली घेतलं आणि मी लहानाचा मोठा होऊ लागलो

" मला समज लागले तेव्हा मी प्रथम नाव घेऊ लागलो ते 'निपुणाबेन' कारण तिनंच मला आईप्रमाणं दूध पाजलं आणि माझी जोपासना केली.

किती साध्वी आहे ती ! नी किती मायाळू ! मला धन्यता वाटायची की, पोरकेपणी अशी आई मिळावी हे थोड का भाग्य ? खर म्हणजे तिच्यामुळ मला आईची वाण कधी भासली नाही

" तिन दरवेळेला माझी बाजू घ्यावी नी गुलाबशेटन कुरकुरत कुरकुरत पण शेवटी ऐकाव अस चाले मला उचलून तान्हेपणी घेतानासुद्धा बहुतेक गुलाबशेटन निपुणाबेनला परावृत्त केल असेल पूर्वजन्मीचे लागेबाधे म्हणून असेल पण निपुणाबेनन सदा माझी बाजू उचलून धरली. शाळेत मला घालायच ठरल तेव्हा, त्यानतर पुन कॉलेजात जाताना, प्रत्येक वेळी गुलाबशेटन नापसती दाखवायची

'दोन मुल आपल्याला होऊन गेली आणि त्यानतर आणखी होण्याच चिन्ह दिसत नाही मग अनायासे देवान हे पोर आपल्या पदरात टाकल तर तेच आपल मानून वाढवण्याला काय हरकत आहे ? अगदी आपल्या रक्तामासाच मूल नसल तरी सहवास ही का लहानसहान गोष्ट आहे ? एकदा लागत लागल म्हणजे मानलेल सुद्धा सख्ख्याहून जवळ होत आणि त्या उलट व्हायच असल म्हणजे सख्खी मुल आईबापाना शत्रूप्रमाण वागवतात, अशी उदाहरण नाही का आपण पहात ? शिवाय देवान सतति दिली नसली, तरी सपत्तीला तर काही कमी केल नाही ? मग झाला थोडा खर्च याच्या शिक्षणावर तर तेवढ्यान गडगज्ज सपत्तीत एवढ तरी काही कमी होईल का ? ' अस निपुणाबेन सदा माझ्यातर्फे बोले पण गुलाबशेटला हे कधीच पटल नाही. त्याचा हिशोबीपणा इतका असे की माझ्यावर खर्च करण त्याला सकट वाटे कळू लागल्यावर मला अनेकदा वाटायच की, गुलाबशेटच्या डोळ्यात मी जर सलत असलो तर बायकोच्या भिडेखातर तरी केवळ त्यान मला का जवळ कराव ? कारण मनाला गोष्ट पटली नाही तर लोकाच्या भीडमुर्वतीसाठी आपल वर्तन बदलण्याचा काही गुलाबशेटचा स्वभाव नव्हता. मग मनाला वाटे की, गुलाबशेटच्या मनात काही दूर धोरणाचा हेतु तर नाही ?

"गुलाबशेटच जरी बायकोशी अनेक बाबतीत पटल नाही आणि तो तिला फारसा मानीतहि नव्हता, तरी गुलाबशेट रीतीच्या बाबतीत बहुतेक चुकत नसे. रीतीन करावयाच्या वरवरच्या गोष्टी तो बहुतेक नीट करी.

पण क्षुल्लक बाबतीत कशाला उगीच कचकच ?– असे धूर्तपणाच धोरण त्याच असाव

" कशान का असेना, निपुणाबेनन मला लहानाच मोठ केल, त्याबद्दल त्यान मना केल नाही, किवा माझ्या शाळा–कॉलेजातील शिक्षण पुर करण्याच्या-विरुद्धहि फारसा जोर धरला नाही पण हे तरी काय थोड झाल ? बोलून चालून पोरक्यान याहून जास्त अपेक्षा काय धरावी ?

" हायस्कुलात वरच्या वर्गात असताना ही सर्व जाणीव मला हलके हलके होऊ लागली आणि त्याचा परिणाम असा झाला की, वाईट वाटण्याखेरीज आपण स्वावलबी बनल पाहिजे, मिळालेल्या सधीचा फायदा घेतला पाहिजे व अभ्यास उत्तम करून परिक्षेत चागल यश मिळवल पाहिजे, अस मला वाटू लागल मी खूप अभ्यास केला, आणि बी एस्सी ची परीक्षा पहिल्या क्लासात पास झालो

" मला परिक्षेचा निकाल लागला तो दिवस आठवतो त्या दिवशी घरी परत आल्यावर मला आनदाच्या ऐवजी खिन्नताच अधिक वाटू लागली वाटल, स्वत चे आईवडील असते तर त्याना किती कौतुक वाटल असत पण आईवडील म्हटले तरी माझ्या मनातील चित्र अपुर राहायच कारण त्याना जाणतेपणी न पाहिल्यान आठवणच नाही तर त्याचा चेहरामोहरा डोळ्यापुढ यावाच कसा ?

"मनाशी 'आई' 'आई' म्हटल्यावर चेहरा पुढ दिसू लागे तो निपुणाबेनचा ! कारण तिच्याइतके मायेन जगात माझ दुसर कुणी काय केल होत ? आणि आता सुद्धा माझ्या यशान तिलाच खरा फार आनद झाला तिन माझ्या डोक्यावरून वत्सलतेन हात फिरवीत म्हटल 'बाळ, चागल केलस हो ! माझी बाजू राखलीस नापास झाला असतास तर मला बोलणी खावी लागली असती आता कर्तासवरता झालास, तुझी तुला स्वत ची आता काळजी घेता येईल. आता कुणाच्या तोडाकड पाहयची तुला जरूरी नाही आणि मलासुद्धा आधार झाला एक '

" मी म्हणालो, 'मा ! तुला माझा आधार कसा काय ? "

" का ? अस का म्हणतोस ? तुला तुझ्या पुढच्या यशाच्या मार्गात मी अडथळा वाटू लागले की काय ?"

'छे छे मा! माझ्या म्हणण्याचा तसा नाही हेतु! मुलाला आईचा का कधी अडथळा होतो? मी आणखी यश मिळवल पुढ, तरी मायेन पाहील अस दुसर कोण आहे तुझ्यावाचून? तुला तर मी कधीच अतर देणार नाही! माझा म्हणायचा हेतु होता एवढाच, की माझ्या आधारावरच तू काही अवलबून नाहीस स्वत तुझ्या घरातील तूच मालकीण आहेस आणि तुझ्या घरात लक्ष्मीहि नादत आहे मग तुला काय कमी?'

'बाळ, तू ऐकल आहेस का – लक्ष्मी चचल असते तिची लहर लागली तर ती येते आणि जावस वाटल म्हणजे आपल्या इच्छेची फिकीर न करता चालती होते माणसान आपल आयुष्य तिच्यापेक्षा जास्त स्थिर गोष्टीच्या आधारावर अवलबून ठेवाव, म्हणजे फशी पडण्याची वेळ येत नाही'

"आणि लौकरच काही दिवसात गुलाबशेटन माझ्या लग्नाचा विषय काढला. मी मनाशी म्हटल की, माझ्या यशान गुलाबशेटन इतक्या दिवसाची मनातली अढी काढून टाकली की काय? कारण नाही तर माझ्या कल्याणाची व लग्नाची आठवण त्याना एकदम कशी व्हावी? मला वाटू लागल की, आपणच गुलाबशेटचा स्वभाव न कळल्यान, त्याना इतक्या दिवस अन्याय केला

"एक दिवस गुलाबशेट निपुणाबेनच्या देखत म्हणाले, 'किरणभाईची एक परीक्षा पास झाली, आता दुसरी परीक्षा आमची!'

'तुमची परीक्षा कशी काय?' निपुणाबेनन विचारल.

'आमची परीक्षा किरणसाठी चागली वधूपरीक्षा करण्यात, आणि तीसुद्धा आम्ही नक्की फर्स्ट क्लासमात पास होणार आहो! ठाऊक आहे का कुणाशी लग्न ठरवत आहो त्याच?'

'नाही, कोण?'

"मीसुद्धा उत्सुकतेन सवाद ऐकू लागलो

"गुलाबशेट म्हणाले, 'हिरालालची मुलगी 'चपक', पाहिली आहेस ना तिला?'

'हो, पाहिली आहे तिला एकदा लहानपणी, पण अलिकड पाहिल्याचं काही आठवत नाही पण किरणला सासरासुद्धा पुष्कळ श्रीमत मिळाला पाहिजे. –म्हणजे त्याला व्यापार करायला आपल्याबरोबर त्याच्याहि सपत्तीची पुष्कळ

मदत झाली पाहिजे किवा जर किरणच्या मनात आणखी पुढ बरच शिकायच असल तरी सासऱ्यानसुद्धा हौसेन पुढ आल पाहिजे '

"गुलाबशेट म्हणाला, ' जगात जोर लागतो दोन गोष्टीचा– पैशाचा आणि अधिकाराचा हिरालालच्याजवळ पैसे फारसे नसले तरी त्याच्या ओळखी पुष्कळ आहेत आणि त्याला अधिकाराच फार मोठ्ठ पाठबळ आहे शिवाय किरणला आणखी शिक्षण वगैरे कशाला ? माझ्याच पेढीवर नाही तर व्यापारात घालीन त्याला. सासऱ्याकडून पैशाची नाहीतर अधिकाराची अशी अपेक्षा करत बसू नाही कारण त्या गोष्टी मिळवायला काही सासराच लागत नाही! इतर कुणाकडूनहि त्या मिळवता येतात पण सासऱ्याकडून मिळणारी मुख्य गोष्ट म्हणजे मुलगी ! ती जर चागली असली तर मग बाकीच्या गोष्टीकड पाहायची गरजच काय ? येईलच आता ती चार दिवसात आपल्याकड, तेव्हा पहालच, माझ्या म्हणण्यात किती अर्थ आहे तो ! '

" आणखीन् मग चार दिवसानी आमच्याकड जी मुलगी आली ती पाहून निपुणाबेनला काय वाटल कुणास ठाऊक, पण माझ्या मनात मात्र हर्षाची लाट उसळली चपक खरच चाफेकळीसारखी होती सौदर्य ओसडत होत नी यौवन बहरल होत मी मनाशी म्हटल, सुदैव देऊ लागल म्हणजे नुसत देत नाही, तर वर्षाव करत परिक्षेच्या यशानतर पेढीत नाही तर व्यापारात कामाला सुरुवात करायची व त्यातच चपकसारख सुदर रत्न लाभायच म्हणजे किती भाग्याची गोष्ट ! मला वाटल, आनदाच्या भरात मी वाऱ्यावर चालत होतो जणू काही !

"अति आनदान सुद्धा मनाची शाति ढळते माझहि तसच झाल मला झोप येईना म्हणून शेवटी ठरवल थोड बाहेर जाऊन फिरून याव पण इतक्या उशिरा रात्री बाहेर जाताना इतर कुणाची झोपमोड होऊ नये म्हणून हलक्या पावलानी चालत होतो इतक्यात हॉलमधल्या खोलीत गुलाबशेटचा आवाज ऐकला नुसता आवाज ऐकू येता तर मी चोरून ऐकण्याची अशिष्टपणाची गोष्ट केली नसती. पण गुलाबशेटच्या बोलण्यात माझ्या नावाचा उल्लेख व त्यानतर एका मजुळ हास्याची लकेर, यानी माझ लक्ष वेधल मी थबकलो नी ऐकू लागलो.

"आता आमच्यापासून अस दूर अतर ठेवायच तुला काही कारण नाही,

चपक ! पूर्वीच्या दिवसात हवी तेवढी लग्न केली तरी कुणी विचारत नसे सध्याच्या दिवसात ते काही शक्य नाही आणि आमच्यासारख्या व्यवहारचतुर माणसाच ब्रीद हे असत की, चार लोकात करायच्या शिष्टसमत गोष्टीना नेहमी मान तुकवायची समाजाच्याविरुद्ध उघड बड पुकारायच नाही तेवढ केल म्हणजे समाज इतका निर्बुद्ध असतो की, तोहि तुमच्या वाटेला जात नाही. मग आपल्या खासगी जीवनात गुपचुपपणान हव तस वागाव आताच पहा तुझ्याशी पुन लग्न करायच म्हणतो तर सगळ्यानी काव काव केली असती निपुणाला धाब्यावर बसवण अवघड पडल असत पण त्याहूनहि आमच्या व्यापारात शिष्टपणाचा व प्रतिष्ठितपणाचा बोलबाला असल्यान सध्या जो फायदा मिळतो तो मिळाला नसता दुसर अस की, आम्ही कसहि वागलो तरी एक गोष्ट पक्की धरून ठेवलेली असते ती म्हणजे व्यापार धद्याला पोषक तेवढी गोष्ट चागली, त्याला मारक ती गोष्ट आम्हाला वर्ज्य पण आता अक्कलहुषारीन मारले का नाही एका दगडात दोन पक्षी ? दोनच का – ह्य – ह्य – ह्य – ह्य – –तीन चार पक्षी ! एकतर या निपुणेच्या कटकटीतून सुटलो दुसर तर किरणला धद्यात घेऊन त्याच्या पोटापाण्याचा नी लग्नाचा प्रश्न सोडवल्याच श्रेय घेतल तिसर म्हणजे तुला उजळ माथ्यान माझ्या घराचा नी सपत्तीचा उपभोग घ्यायच साधून दिल, पण सर्वात मुख्य म्हणजे आम्हाला स्वत ला ही चपाराणी मिळाली ! बोला आता, आहे का नाही अक्कल ? अक्कल असेल त्यान व्यापार करावा, घी खाव नी पैशान जगातल सुख मनमुराद लुटाव ! ह्य ह्य ह्य ह्य ''

"या कानी पडलेल्या शब्दानी माझ्या हृदयात चर्रर्र झाल पण त्याहीपेक्षा माझ मन जास्त विदीर्ण झाल, ते त्यापुढच्या दृश्यान दाराजवळ टेकून मी उभा असताना नुसत लोटलेल दार माझ्या गैरसावधपणात धक्का लागून एकदम आत उघडल गेल, आणि मी एकदम नकळत खोलीत गेलो.

'कोचावर गुलाबशेटच्या मिठीत चपक अस्ताव्यस्त लोळत होती नी शेजारच्या छोटया टेबलावर मद्याची बाटली नी पेले होते

दरवाजा एकदम उघडल्याच्या आणि माझ्या धडपडत आत जाण्याच्या आवाजान ती दोघ एकदम चमकून उठली चपकच्या डोळ्यात मदिरेचा रक्तिमा आला होता ती अजूनहि सुदर दिसत होती, परन्तु मला जाणीव

झाली ती इतकीच की, हे सौदर्य देवतेच नाही, तर, कुलटेच याच्या अभि-लाषान रौरव नरकाची शेवटी प्राप्ति होणार ! हे विषारी सौदर्य, पण नागि-णीच–तिच्या विळख्यात विषदश आणि मृत्यु याचीच जोड ! मी केवढ्या गर्तेतून वाचलो, मला क्षणभर वाटल

"पण गुलाबशेटकड पाहून मात्र माझ रक्त नसात सळसळ् लागल माझ्या डोळ्यावर खून चढ् लागला माझे पजे स्फुरू लागले वाटल – याच क्षणी या पजानी याच्या नरडीचा घोट घ्यावा पण गुलाबशेटच्या मद्यान धुद झालेल्या दृष्टीला इतक स्वच्छ कुठल दिसायला तो मग्रुरीन म्हणतो, 'मूर्खा न विचारता माझ्या खोलीत यायला तुला कुणी सागितल ? '

'माझ्या मुदेवान !'

'बर झाल, तुला पुढ माग कळायचच ते अनायासे कळल तुला शिक्षण दिल त्यान अक्कल आली असली तर तुला कळेल की, तुझ हित आहे शहाण-पणान गप्प बसण्यात ! आपला वकूब ओळखून भाडण कराव माणसान माझ्या कलान घेतलस तर तुला पुढमाग स्वत चा व्यापारधदा उभा करता येईल पण मुरुवानीची उमेदवारी माझ्या पाठबळान तुला करता येईल दुसर अस लक्षात ठेव की, ही चपकसारखी परी तुझ्यासारख्या निष्काचनाच्या पदरी पडण ही गोष्टच अशक्य आहे तुझ्याशी तिच लग्न करून देतो म्हटल तर त्याचा अर्थ केवळ लौकिकदृष्टचा जिलबीचा सैपाक कोणी करतो तो देवाला नैवेद्य मिळावा म्हणून नाही,तर नाव देवाच, पण प्रसादाचा उपभोग सैपाक करणाराला सर्व गोष्टीचा विचार कर नी शहाण्यासारखा वाग '

"क्रोधाच तुफान मनात उठल्यावर केवळ शब्दाच्या वाफेन जीभ त्याच किती शमन करू शकणार ? माझे हात वर गेले आणि गुलाबशेटच्या गळ्या-भोवती माझी बोट जाऊ लागली माझ्या मनातल्या तुफानाच उपशमन याच्या बळीन थोडस झाल असत पण त्याचा गळा मी दाबला नाही त्याच कारण म्हणजे त्याच्या दैवान तो निपुणाबेनशी जखडला गेला होता त्याला मारण्यान माझ्या मानभगाची भरपाई झाली असती तरी माझ्या मानलेल्या आईला त्यामुळ वैधव्य आल असत केवळ निपुणाबेनच्या विचारान माझा हात ढिला झाला नी तिच्या पुण्याईन तो पापी जगला मी शब्दहि बोललो नाही, पण तसाच बाहेर पडलो आणि रस्त्यान खूप खूप चालत

सुटलो रात्रीचा वारा थड होता त्यान माझ डोक हलके हलके थड होऊ लागल

"मी मनाशी विचार केला की, एवढ्या सगळ्या घटनेत वास्तविक माझ काय वाईट झाल ? ज्या गोष्टीन मी जन्मभर दु खात पडलो असतो ती गोष्ट होण्याच्या अगोदरच जर माझ्या डोळ्यावरची झापड निघाली आणि वस्तुस्थितीच्या यथार्थ दर्शनान मी सावध झालो तर ती गोष्ट दु खाची मानायची का आनदाची ? गुलाबशेटच्या सच्चेपणाबद्दल माझ्या मनात जी भ्रामक समजून मूळ धरत होती तिच निर्मूलन योग्य वेळी नाही का झाल ? आयुष्याच जर माझ्या समजुतीप्रमाण सार्थक करायच असल तर त्याच्यासारख्या छद्मी आणि धनाध माणसाच्यापासून अजिबात वेगळ निघण्यात माझ हित नव्हत का ?

"तशीच गोष्ट चपकशी होणाऱ्या विवाहाची जिची माझी ओळखसुद्धा नाही, अशा चपकच्या केवळ मादक सौदर्यावर हुरळून जाऊन तिच्याशी विवाह करण्यास मी तयार होण ही अविचाराचीच गोष्ट नसती का झाली ? मधुर पेयान भरलेला पेला म्हणून ओठाशी आणल्यावर तो निसटून पडून फुटावा आणि आपण सेवन करणार होतो ते पेय नसून जहर वीष होत हे जमिनीवर वाहणाऱ्या ओघळानी ध्यानात याव, असच नाही का हे ? हे समजून निराशेन हुदका द्यायचा का मरण टळल म्हणून सुटकेचा निश्वास सोडायचा ? मग खरोखर माझ या प्रसगान नुकसान झालच नाही काही नि मी सावध झालो ही खरी भाग्याची गोष्ट !

"अशा सुविचारान माझ मन शात झाल. उत्तररात्रीच्या स्वच्छ हवेचे छाती भरभरून मी श्वास घेतले माझ्या मनात उठलेले रज कण खाली बसून माझ मन साफ झाल होत, त्याचप्रमाण दिवसभर उडालेली धूळ खाली बसून या रात्रीच वातावरण स्वच्छ झाल होत मला न कळत माझ्या तोडून गाण्याची शीळ वाजू लागली नी मी घरी परतलो.

"पण मनाचा आनद व उद्वेग याच्याशी जगरहाटीचा मिलाफ झाला तर ते जग कसल ! मी मागच्या दरवाज्यान घरात शिरलो. गुलाबशेटच्या खोलीवरून जाण नको हा विचार, पण माझ पाऊल माजघरात पडते तो समोर कोण असाव माझ्या ? निपुणाबेन स्वत च लगबगा पुढ आली मी मनाशी

म्हटल या वेळी निपुणाबेन कशी उठली असावी, तो तिनच मला प्रश्न केला, 'किरण, काय केलस तू हे ?'

'मा, काय म्हणतेस तू ? काय केल मी ?'

'हे सगळे काय म्हणतात, नाही का ऐकलस तू ? ते म्हणतात तू चोरी केलीस शेटजीच्या खोलीतली तिजोरी तू उघडलीस नी त्यातला ऐवज तू पळवलास '

'–आणि त्या म्हणण्यावर तुझा विश्वास बसला, मा ?'

'माझा विश्वास नाही बसला, पण तू दिसत नव्हतास घरी अशा अपरात्री नेमका कुठ गेला होतास ?'

'मा, काय सागू तुला–गुलाबशेटशी बोलाचाली झाली माझी नी चपकशी विवाह करायचा माझ्या मनात नसल्याच मी कळवल त्यानतर जरा बाहेर फिरून आलो '

'मग या गोष्टी करायला दिवस का थोडा पडला आहे ? विवाह करायचा नाही तर दिवसा नाही का 'नाही' म्हणून सागता येत ? तू माझ्यापासून काही चोरून तर ठेवत नाहीस ? शेटजी तुझ्यावर इतके का चिडले आहेत ? त्यानी तर पोलिसात वर्दी दिली आहे की, तू मोठी चोरी करून पळालास म्हणून '

'मा, मी स्वतःच्या तोडान सागतो तुला की मी कुठल्या कपर्दिकेलाहि हात लावला नाही, तुझ्या गळ्याशपथ तो आरोप खोटा आहे माझ शेटजीशी काल भाडण झाल फार, पण ते दुसऱ्या काही कारणासाठी पण ते सगळ मला तुला सागता येत नाही आणि तेहि केवळ माझ्या मनात तुझ्या वात्सल्याची आठवण असल्यान तुझ्या हितबुद्धीनच मी घर सोडून जाणारच होतो तीच गोष्ट आता लौकर होईल, इतकच पण त्यानी पोलिसाना बोलावल असल तर मात्र मी इथच थाबतो. कारण कर नाही तर मला डर कसली ? उलट पळून जाण्यान सर्वांना वाटेल की, खरच मी मोठ्ठी चोरी केली! '

'नाही ! नाही ! " निपुणाबेन माझ्याजवळ येऊन म्हणाली, 'तुला शेटजीचा स्वभाव माहीत नाही, म्हणून तू अस म्हणतोस तुझ त्याच्याशी भाडण झाल्यावरून जर त्यानी जाणूनबुजून पोलिसाना बोलावण पाठवल

असल आणि तुझ्यावर चोरीचा आरोप केला असला तर त्याच्यातून सहजा-सहजी सुटण्याची तू आशाच करू नको त्याच्या मनात आली ती गोष्ट ते पुरी करतील त्याच्याजवळ आहे पैसा, आणि पैशाच्या पाठीमागे आहे अधिकार तू एकटा त्याच्याशी काय झुज देणार ? जा, जा ! आता क्षणाचाहि उशीर करू नको, किरण पळ ! दूर पळून जा पोलिसाच्या हाती लागू नको. त्यानी तुला तुरुगात घातलेल माझ्यान पाहावायच नाही. आणि त्याना थाबवण्याच सामर्थ्य तुझ्यात तर नाहीच नाही, पण माझ्यातहि नाही. पुढचा विचार पुढ पाहू पण आता तर लागलीच निघून जा या क्षणी तुझ्याबरोबर माझ्या मायेचा फक्त आशीर्वाद मात्र मी देते जा, बाळ जा !"

ज्या निपुणाबेनन मला इतके दिवस लहानाचा मोठा केल ती, तिच्या मनाची मी फार धोक्यात आहे अशी पुरी खात्री असल्याशिवाय मला आपणहून जायला सागेल, हे शक्य नव्हत तिला गुलाबशेटच्या दोषाची पूर्ण कल्पना होती अर्थात् ती त्या दोषाची कधीहि चर्चा करीत नसे तिच्या हातात जर मला मदत करण्याच एवढसुद्धा असत तर ते सर्व स्वत ला धोका पत्करून तिन केल असत म्हणून जेव्हा खुद्द निपुणाबेनन आपली माया आवरून निर्वाणीन मला लगोलग पळून जाण्याचा सल्ला दिला, तेव्हा परिस्थितीच्या गभीरपणाची माझी पुरी खात्री पटली तिच्या पायावर मी एकदा डोक टेकवल आणि वेगान तिथून तीरासारखा निघालो

त्याच वेळी तिथल्या गडीमाणसाच्या मी दृष्टीस पडायचा, पण कुणीहि मला पाहिल नाही तिथून मी चार दिवस वाघ मागे लागल्यासारखा चाललो होतो दिवस उगवला की, दिवाभीतासारख मला लपून बसाव लागे आणि रात्रीच्या अधारात मला मार्ग आक्रमावा लागे जिथ जिथ पोलीस असण्याचा सभव अशी ठिकाण मला काळजीपूर्वक टाळावी लागत खिशात पैसा नाही. पहिले दोन दिवस उपवास काढला नुसत्या पाण्यावर राहिलो तिसऱ्या दिवशी भुकेन पोटात एव काव काव केल की, काहीतरी करून थोड अन्न मिळवण मला भाग पडल.

आडवाटेच्या एका फतरूड दिसणाऱ्या चहाच्या दुकानात मी शिरलों, आणखी चहा नि पावरोटी मागवली ती सपेपर्यंत पैशाच काय करायच हा विचारसुद्धा माझ्या मनाला शिवला नाही. दुकान सोडून जाताना मी दुकान-

दाराला म्हणालो की, " माझ पैशाच पाकीट रस्त्यावर पडल असाव " खिसे चाचपत मी घाबरल्याचा बहाणा केला नी त्याला म्हटल, " तुझा दुकानचा छोकरा माझ्याबरोबर रस्त्यावर माझ पाकीट शोधायला दे पाच मिनिटापूर्वी होत तुझ्या दुकानात येताना त्या कोपऱ्यापुढ कुठतरी खाली पडल " मग आणखीन् घाबरल्याचा आविर्भाव करून म्हणालो, " गेल्या महिन्याचा पगार पाकिटात आहे सापडल तर तुझ्या मदतीसाठी तुला दोन रुपये देईन " दुकानदार साशक असला तरी माझ्या बरोबर शोधास त्याच्या दुकानचा छोकरा पाठवण्यास सागितल्यान त्याच्या मनात धीर आला असावा त्यान माझ्याबरोबर पैशाच पाकीट शोधायला आपल्या नोकराला पाठवल रस्त्यावर शोध केल्याचा बहाणा करून मी थोडा वेळ घालवला, तोडान नोकराशी बोलत, पैशाच पाकीट त्यान सापडून दिल तर, त्याला केवढ बक्षीस देईन, याच वर्णन केल पण शेवटी त्याच माझ्याकड लक्ष नाही अस पाहून रस्त्यान जाणाऱ्या बैलगाड्याच्या आडोशान मी तिथून निसटलो पण लौकरच मला कळून चुकल की, त्या दुकानदाराच्या पोरान मी निसटल्याच दुकानदाराला सागितल असाव दुकानदारान माझ्या नावान शख केला असावा कारण मी लपलो होतो त्या भितीच्या पलिकडून रस्त्यावरून जाणाऱ्या माणसाच्या तोडून त्याची चर्चा माझ्या कानावर पडली रात्र पडेपर्यंत मला तिथ थाबून राहाव लागल मनात सारखी भीति वाटायची, केव्हा पोलीस येतात नी आपल्याला पकडतात !

माझ्या मनात विचार आला की, पोलिसाच्या पासून पळून जाण्याचा जेमतेम तीन दिवस प्रयत्न करत आहे तो केवढी त्रेधा उडत आहे ! मग अशा तऱ्हेन नेहमी कस चालायच ? उघडपणान जगात कस फिरायच ? जर वेष पालटून, नाव बदलून फिरायच म्हटल, तर, इतकी वर्ष शिक्षण केल नी पदवी-परीक्षा पास झाली, ते सर्व जुन्या नावाबरोबरच नाहीस होणार मग काय त्या पदवीचा उपयोग ?, खरोखर माझ्याकड इतकासुद्धा दोष नसताना, मी निरपराधी असताना, माझ्या नशिबी ही काय साडेसाती लागली आहे एकाएकी की, मला एखाद्या गुन्हेगाराप्रमाण तोड लपवीत, उपाशीपोटी, हालअपेष्टात जन्म काढण प्राप्त व्हाव !

काल रात्री मी तेथून पुन. निसटलो आणि साऱ्या रात्रभर चालत राहिलो.

फिरून आज दिवसभर अन्नावाचून तडफडत लपून छपून राहाव लागल तिसरे प्रहरी चालू लागलो तो रस्त्याच्या आडबाजूस आल्यावर ही पाऊलवाट लागली आणि त्या पाऊलवाटेन येता येता या कड्यापाशी आलो आहे माझ मन निराशेन अगदी भरून गेल आहे काय हे जिण ! परत जाण्याची भीति वाटते कारण दरवडेखोर म्हणून मला पकडून आठदहा वर्षाची शिक्षा ठोठावली जाईल आणि त्या तुरुगवासानतर मग अन्न या जगात रहाण मला कस शक्य होईल ? एकदा तुरुगवासाचा डाग लागल्यावर माझ जीवन सदैव काळकुट्ट होऊन जाणार ! यातून सुटकेला काही मार्गच दिसत नाही ! आल्या पाऊलवाटेन परतलो तर हालअपेष्टानी भरलेल्या मानहानिकारक कारावासाकड मला जाव लागेल, केव्हा ना केव्हा तरी ! काय तिकड परत जाऊन उपयोग ?

आणि परत धोका पत्करूनहि ज्या जगात रहायची धडपड करायची ते जग तरी किती भिकारड आहे ! धन आणि अधिकार याच्या मदान धुद झालेल्याच्या हाताखाली बळजबरीन नमून राहायच, हे का जीवन झाल ?

धन आणि अधिकार या दोन्हीखेरीज ज्या एका गोष्टीन तरुण मनाला मोह पडतो, व जीवनात राम वाटतो, ती म्हणजे युवती पण ‘ प्रथमग्रासे मक्षिकापात: ’ या न्यायान जी पहिली युवती, माझ्याशी लग्न होणार अशा दृष्टीन, प्रथमच पाहिली नी जिच्या सौंदर्याची मनाला भुरळ पडली, तीच कुलीन नमून कुलटा आहे अस उघडकीस आल ! वर दिसणार सौंदर्य आतून कदाचित् किडलेलहि असू शकत हे कळल पहिला घोट कडू लागल्यावर, दुसऱ्याची चव पाहायलाहि मन घेत नाही इतकच नाही तर यदाकदाचित् पुढ चागली चव लागली तरी तिच्या आस्वादात सुद्धा पहिल्या घोटाच्या कटुपणाच्या आठवणीन उणेपणा येणार ! – चपक ! मला तिची आणि तिच्या साऱ्या जातीची शिसारी बसली तेव्हापासून स्त्री–सहवासाबद्दल माझ्या मनात घृणा उत्पन्न झाली !

मग जगात आहेच काय जगण्यासारख ? असल जीवन कशाला जगायच ? त्यापेक्षा याच कड्यावरून एक पाऊल पुढ टाकाव म्हणजे या कुजक्या डावाचा शेवट होईल ही कोडी फुटेल, नी माझी मुक्तता होईल !

त्या तरुणाने पुढे पसरलेल्या देखाव्याकडे पाहिले आता प्रश्न सुटल्याच्या

मोकळेपणाने त्याच्या मनाला त्या देखाव्याचा आस्वाद घेता येत होता थोडा. नतर त्याने वाकून ती तुटक्या कड्याची उभी दरड पाहिली पहिले शभर दोनशे फूट तर कडा थोडा आतल्या अगालाच वाकला होता त्यानतर थोडा तिरपा झाला होता पूर्वी केव्हातरी ढासळलेले लहानमोठे दगड त्या उतरडीवर कसा तरी आधार धरून अडकून बसले होते पण त्याना जरा थोडा धक्का लागण्याचा अवकाश की ते खाली गडगडू लागतील असे दिसत होते

त्याने शेजारचा एक लहान दगड उचलून कड्याखाली टाकला आणि तोडाने त्याने एक, दोन, तीन, चार–अक मोजले दगड टाकल्यापासून किती अकात खालच्या दरडीवर प्रथम आपटतो ते तो पाहात होता दगड खालच्या दरडीवर आपटून टण्दिशी उडाला इतक्या उचीवरून पडल्याने त्याला पुष्कळच वेग आला होता पहिल्या आपटीनतर वक्ररेषेने उडून तो आणखी खाली पडला नी मग पुढच्या उतारावरून आपटत आपटत तो पुढे दिसेनासा झाला तो किती वेळ तो दगड पडताना पहात होता !

किरणच्या मनात आले की, ' पहिली उडी मनाचा हिय्या करून टाकली एकदा की झाल, पहिल्या शभर दोनशे फुटाच्या उडीनतर खालच्या दरडीवर देह आपटेल त्या वेळीच त्या आघातान क्षणात प्राण जाईल कदाचित् तेथपर्यंत पोचण्याअगोदरच बहुतेक त्या वेगान, शरीराला घसटून जाणाऱ्या हवेच्या आवेगान, नी भीतिदायक अपेक्षेन शुद्ध जाईल

मग प्राण गेलेला माझा देह नी एखादा मोठा दगड यात काय फरक ? कुणास ठाऊक, कदाचित् मृत शरिरातून मुक्त झालेला माझा जीवच–क्षणभरापूर्वी स्वत चा मानलेला देह–आता विलग होऊन त्या उतरडीवरून ठेचकाळत, आदळत, आपटत, गडगडत जाताना पाहील ! ज्या देहात त्यानतर राहाण अशक्य होईल असा तो मृत देह जगाच्या दृष्टीन भूतकालात जमा होईल त्या देहाबरोबरच त्याची दु.ख नी सुख माग राहतील त्या पार्थिव शरिराचे अणुरेणू इतर पार्थिव गोष्टीत मिसळून जातील काही कालान कोल्ह्याच्या, लाडग्याच्या, गिधाडाच्या, भक्ष्यस्थानी कलेवर पडेल. पडेना का ! !

जगाच्या दृष्टीन 'किरण' मृतात जमा होईल. अनेकाच्याशी अनेक तऱ्हेचे येणारे सबध तुटतील. मग ना प्रेम ना द्वेष! ना अनुकपा ना भीति! ना आशा ना महत्त्वाकाक्षा ! ना सुख ना दु.ख !

"मी मग मला 'किरण' तरी कशाला म्हणायच नाव तरी देहामुळच येणारी उपाधि ना? चहाचा पेला असला तर त्याला धरायला कान हवा पेलाच फुटल्यावर त्याच्या नुसत्या कानाचा काय उपयोग? मग मी कोण? —मी—मी मुक्तात्मा! होय मुक्तात्मा!! या घाणेरड्या, दुष्ट, तिरस्करणीय जगाच्या तावडीतून सुटलेला मुक्तात्मा!!!"

"समुद्राकडून येणारा वारा त्या दरडीवर आपटून वर चढत कड्याच्या तुटक्या धारेपुढ एकदम घोगावून वाहात होता त्याच्या वर जाणाऱ्या झोतावर काही गिधाड उच घिरट्या मारीत होती या मृत देहावर जगणाऱ्या पक्ष्याना आपल्या भक्ष्याचा पूर्वीच सुगावा लागतो की काय न कळे गोल गोल चकरा मारीत ती गिधाड वरून आपल्या तीक्ष्ण नजरेन पाहात होती त्या उचीवरून खाली उतरून भक्ष्यावर बसायला त्याना इतकाहि वेळ लागला नसता"

किरणच्या लक्षात आले की आपला कोट मागे पडला आहे! तो हसून म्हणाला तशाहि मन स्थितीत, 'पडेना का? त्या कोटाला तरी आता माझा म्हणायच काय कारण?"

किरण त्या कड्याच्या टोकावर उभा राहिला त्याने एकदा दोनदा सभोवार दृष्टि टाकली, आणि हातानी तोड झाकून घेतले देवाचे नाव त्याच्या तोडी आले खरे भक्तीने नसेल कदाचित्! कोणतेहि काम उसळी घेऊन करायचे असले म्हणजे आपण एक, दोन,—तीन म्हणतो तसेहि ते असेल!—

काही दिवसानी कातकरी लोकानी वर्दी दिली असावी पण त्या कड्याच्या खाली पडलेले फाटके कपडे पोलिसानी जमा करून नेले त्यानी रिपोर्ट केला की, 'किरण नावाच्या तरुणाचे हे कपडे आहेत तो गुलाबशेट व्यापाऱ्याच्या घरून मोठी चोरी करून पळाला होता व पोलिस त्याच्या तलासातच होते

त्यालाहि लुबाडून आणखी कोणी जास्त निढावलेल्या चोरानी त्याला कड्याखाली टाकून त्याची विल्हेवाट लाविली, का तोच रात्री अधारात कड्याखाली पडला हे कळण्यास मार्ग नव्हता पण चोरीला गेलेले जडजवाहिर व पैसे सापडले नाहीत मात्र तो मेलेला माणूस म्हणजे 'किरण' एवढे खास,' असे पोलिसाच्या रिपोर्टात म्हटले होते नी तसेच वर्तमानपत्रात जाहीर झाले!

---

# प्रकरण : १–प्रभाशंकरांचें आकस्मिक निधन !

कराचीतल्या सर्व दैनिकानी त्या दिवशी आपापल्या वर्तमानपत्राचे खास अक काढले होते वर्तमानपत्र विकणाऱ्या पोऱ्याच्या हातात असलेले कोणतेहि पत्र घेतले, तरी त्याच्यात प्रभाशकर याच्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त होणाऱ्या समारभाचे कार्यक्रम, प्रभाशकर याचे फोटो, त्याच्या गुणवर्णनपर प्रमुख लोकाकडून लिहविलेले लेख याशिवाय दुसऱ्या कशाला जागा नव्हती 'सिंध ऑब्झर्व्हर' च्या के पुनियानी अग्रलेखात प्रभाशकर याच्या कराचीतल्या गेल्या वीस वर्षातील सार्वजनिक कार्याचा सविस्तर आणि मोठा सुदर आढावा घेतला होता कराचीतल्या सामाजिक, राजकीय वा आर्थिक घडामोडीत प्रभाशकराचा केवढा भाग होता आणि कराचीतले राजकारण हे किबहुना प्रभाशकराचेच स्वत चे राजकारण होते, हे कसे ते मोठ्या मार्मिकपणाने दाखवलेले होते.

'डेली गॅझेट' च्या रा तारापोर या सपादकानी आपल्या नेहमीच्या अतिशय गुणवर्णनपर भाषेत प्रभाशकर याची तुलना एखाद्या देवतातुल्य महात्म्याशी केली होती जणू काही हा अग्रलेख लिहिताना शब्दकोशातून माणसाच्या स्तुतिपर झाडून साऱ्या विशेषणाची यादी त्यानी उपयोगात आणली होती वाचणाऱ्या माणसाला लेखातील अपरपार स्तुति वाचून एखाद वेळ असेहि वाटू शकले असते की, 'वर्तमानपत्री जाहिरातबाजीचाच हा प्रकार दिसतो नाहीतर इतकी सर्व विशेषणे एकाच व्यक्तीला लावणे प्रामाणिकपणाचें व्हायचे नाही कारण माणूस कितीहि मोठा झाला तरी त्याच्यात त्याचे विशिष्ट असे अवगुण काही थोडे असत नाहीत असे असते की, काही मोठे गुण त्याच्या अगी फारच प्रभावाने वसत असतील आणि त्यामुळेच तर वास्तविक माणूस नावारूपाला येतो अशा नावलौकिक प्राप्त झालेल्या माणसाबद्दल गुणग्रहणपर लिहिताना जर त्याचे लहानसहान दोष अथवा खोडी याचे दिग्दर्शन केले तर त्याने माणसाच्या व्यक्तिमत्वाची जास्त चागली ओळख पटते इतकेच नव्हे तर दोष लपवून न ठेवल्याने लेखकाचा दृष्टिकोण पक्षपाती नाही हे दिसून गुणाची बेरीज भली मोठ्ठी झालेली दिसली तरी ती वस्तुस्थितीला धरून आहे, अशी वाचणाऱ्याची खात्री पटते पण यात पहावें तर

गुणाचीच नुसती स्तुति आणि तीहि ओतप्रोत ! एखादी व्यक्ति आवडायची म्हटली म्हणजे तिच्यातसुद्धा काही खोडी, काही दोष असलेले बरे वाटतात. माणसातसुद्धा सगळेच गुण आणि तेहि फार असले म्हणजे अति गोड पक्वान्ना-प्रमाणे त्या गुणाचीहि तोडाला मिठी बसते पौर्णिमेचा चद्र जर नुसता पाढरा शुभ्र असता तर तो कॅरममधल्या स्ट्रायकरच्या तुकड्याप्रमाणे पाढरा-फटक्क वाटला असता पण त्याला अद्‌भुतरम्यता येते ती त्याच्यावरच्या शशकासारख्या दिसणाऱ्या डागामुळे कपाळ नुसते गोरेपान बरे दिसत नाही, म्हणून त्यावर मध्ये गोदतात किवा कुकवाचा ठिपका देतात लहान मुलाचा निष्कलक गाल अति नितळ आणि शुभ्र वाटतो म्हणून त्याच्यावर काळ्या काजळाचा ठिपका देतात हेतु हा की, पूर्णत्वातहि कृत्रिम का असेना पण थोडी अपूर्णत्वाची तीट लावल्याने ते जास्त मोहक दिसते त्याचप्रमाणे व्यक्तीला सुद्धा थोडा दोष असावा, थोडी खोड असावी, असे वाटते '

'ससार–समाचार ', 'सिध–मराठा', ' कराची डेली ' यानीहि खास अक काढले होते ते सर्व पाहून कराचीच्या माहितगार माणसाला जर तुम्ही विचारता तर तो म्हणाला असता की, " ज्या अर्थी प्रभाशकर याच्या चरित्रा-बद्दल 'सिध ऑब्झर्व्हर'च्या के पुनियाच, 'डेली गॅझेट'च्या तारापोर याच आणि 'कराची डेली'च्या एम् यू अब्बासीच एकमत होत असेल तर प्रभाशकर हे फार मोठ्ठे माणूस आहेत, अस तेवढ्या एकाच गोष्टीवरून मानायला काही हरकत नाही कारण सहसा एकमेकाच्या मताच वावड असणारे हे तिघहि जेव्हा एखाद्या गोष्टीविषयी सहमत होतात, तेव्हा ती गोष्ट वादातीत आहे, हे खास ! "

वर्तमानपत्रात पहिल्या पानावर पुढील मजकूर होता " कराची शहराचे अध्वर्यु पुढारी, उद्योगधद्यातले महान् व्यापारी, समाजधुरीण, मुत्सद्दी, दानशूर श्रीमान् प्रभाशकर याना आज पन्नासावे वर्ष सपून एक्कावन्नावे वर्ष लागत आहे त्यानिमित्त त्याचे अभिनदन करण्यासाठी जे निरनिराळे सार्वजनिक व खाजगी कार्यक्रम ठरलेले आहेत ते असे--

सकाळी ७॥ वाजता थिऑसॉफिकल लॉजमध्ये जमशेट नसरवाजी मेहता याच्या अध्यक्षतेखाली सर्वधर्मीय सामुदायिक प्रार्थना.

८ वाजता श्रीरामकृष्ण मठामध्ये स्वामी प्रणवानद याचे प्रवचन व आशीर्वाद

९ वाजता कराची बदररोड एक्स्टेन्शनमध्ये 'कृस्तकुज' येथे साधु वासवानी याची प्रार्थना

९॥ वाजता कराची-कास्मॉपालीटन कॉलनीमध्ये प्रिन्सिपॉल गोखले याचे 'शातिकुज' बगल्यात अल्पोपाहार.

११॥ वाजता कराची म्युनिसिपल कॉर्पोरेशनमध्ये कॉर्पोरेशनची विशेष सभा.

दुपारी १ वाजता कराची क्लबात 'इडियन मर्चन्टस चेबर ऑफ कॉमर्स' तर्फे खाना

सध्याकाळी ४ वाजता केमारी येथे कराची पोर्ट ट्रस्ट व गोदीकामगार याच्या तर्फे सन्मान

सध्याकाळी ६ वाजता 'खालिकदीना' हॉलमध्ये कराची शहरवासीयाची जाहीर सभा व मानपत्र

सध्याकाळी ९ वाजता गव्हर्मेन्ट हाऊसमध्ये डिनर.

वेळेच्या अभावी ज्या अनेक सस्थाच्या विशेष आमत्रणाचा कार्यक्रमात समावेश करता आला नाही, त्या सर्वानी सध्याकाळच्या जाहीर सभेत आपापल्या सस्थेमार्फत मुद्दाम भाग घ्यावा, अशी विनति आहे

सेक्रेटरी,
प्रभाशकर सत्कार समिती,
कराची"

कार्यक्रमाच्या भरगच्चपणावरून प्रभाशकर याना कराचीला केवढी मानमान्यता होती, हे ध्यानात येत होते

वरच्या कार्यक्रमाची सुरुवात जरी ७ वाजता व्हावयाची होती, तरी असे अनेक इष्टमित्र होते की, त्याच्या मनात सार्वजनिक कार्यक्रम सुरू होण्यापूर्वी प्रभाशकर याच्या राहत्या बगल्यावर जाऊन त्याना समक्ष भेटून त्याच्याशी बोलल्याशिवाय त्याचे समाधान झाले नसते सार्वजनिक कार्यक्रम औपचारिकरीत्या जो काही व्हायचा असेल तो होईलच पण खासगी व्यक्तिश मैत्रीचा हा आवश्यक भाग होता, की अशा प्रभाशकर याना फार जवळ वाटणाऱ्या खास मित्रानी त्याना घरी भेटून त्याच्याशी हस्तादोलन करून अभिनदनाचे

दोनचार शब्द त्याच्याशी स्वत शी बोलावे आणि प्रभाशकराच्या खऱ्या मोठेपणाची कल्पना त्याच्या खास मैत्रीच्या परिवारात आपणास मानणाऱ्या हजारो चाहत्याच्या मोठ्या सख्येने बरोबर पटली असती कारण वर्तमानपत्रात काय, लिहिणाराने लाख शब्द लिहावे त्याला काही लागत नाही तसेच जाहीर कार्यक्रमातून चार स्तुतीचे शब्द कमी किवा जास्त, त्या विशेषणाना काही पैसे पडत नाहीत पण जेव्हा माणूस पदरचे आठबारा आणे खर्च करून तीन मैल दूर उठून जातो, आणि त्याच दिवशी ती व्यक्ति इतर समारभात भेटावयाची असूनसुद्धा, मग त्याच्या घरी जावयास वेळ मिळणार नाही म्हणून, भल्या पहाटे उठून त्याची समक्ष गाठ घरी घेऊ इच्छितो, तेव्हा त्याच्या मनात खरोखरच आदर आणि प्रेम असले पाहिजे.

प्रभाशकराच्या बगल्यावर जायला आठबारा आणे व्हिक्टोरियाला कराचीत सहज द्यावे लागले असते कारण त्याचा प्रासादतुल्य बगला जुन्या हवाबदराच्या टेकडीवर बाधलेला होता जुने हवाबदर अथवा "ओल्ड क्लिफटन्" कराची कॅन्टोन्मेटच्यापुढे तोन मैल सहज होते तिथे जायला ट्राम अथवा बसेस अर्थात् नव्हत्याच बसेस त्या बाजूला जात पण त्या फक्त सध्याकाळी लोकाच्या फिरावयास जायच्या सुमारास

प्रभाशकराना भेटायला जायचे तर कोणत्या बगल्यावर असा प्रश्न नवख्या माणसाला साधारण पडला असता कारण त्याचे बगले अनेक होते एक केमारीला होता, एक खारादरमध्ये असे, एक एक्स्टेन्शनवर असे सर्वांत मोठा जुन्या हवाबदरला होता, तर मलीरच्या बाजूला त्याची मोठी शेतीवाडी, मळा आणि बगला होता पण साधारणत: लोकाना एवढे माहीत असे की, बहुश ते जुन्या हवाबदरवरच्या बगल्यात राहत विशेष काही कामानिमित अथवा लहर लागली म्हणजे कुठेहि जाऊन राहिले तरी हवाबदरचा 'आभास' हा त्याचा मोठा बगला त्याचे नेहमीचे वसतिस्थान असे अधून मधून अचानक उठून ते मलीरला आपल्या शेतीवाडीवर जाऊन राहात पण ते मलीरला गेले, याचा अर्थ त्याना कुणालाहि भेटायची इच्छा नाही, व ते गावात आल्याशिवाय त्याची भेट व्हावयाची नाही, असा मानीत.

असा लहरीपणा प्रभाशकराच्यात खूपच असे. मग त्याचा उच्चार कुणी केलेला असो वा नसो, कुणालाहि न सांगता सवरता, कोणाचे कार्यक्रम इत-

लेले आहेत वा नाहीत याची यत्किंचित्‌हि फिकीर न करता, ते खुशाल उठून नाहीसे होत आणि काही दिवसाच्या अज्ञातवासानतर पुन कराचीत हजर होत अज्ञातवास इतक्याच अर्थाने की, ते प्रत्यक्ष त्याच्या मलीरच्या शेती-वाडीवर असत का तेथून आणखी कोठे जात, हे कळायला मार्ग नसे एवढेच काय पण खुद्द मलीरच्या बगल्यावर तरी ते काय करत,याचा कुणाला पत्ता नसे कारण तिथे सर्वांना मज्जाव असे तिथे जेव्हा काही फाजील चौकस लोकानी जाऊन अनाहूतपणे त्याना भेटण्याचा प्रयत्न केला तेव्हा कपौन्डच्या भितीच्या मुख्य दरवाज्यावरील दरवानाने ‘ आत जाण्याचा हुकूम नाही ’ एवढाच एक मत्र म्हणून त्याची बोळवण केल्याचे ऐकिवात होते

पण प्रभाशकराच्या अशा लहरीपणामुळे सुद्धा त्याच्यावर कुणाचा राग होणार नाही इतके त्याचे इतर गुण लोकाना प्रिय असत भेटीची ठरवलेली वेळ चुकल्यानतर पुन प्रभाशकराची गाठ पडल्यावर, त्याच्या तेजस्वी चेहऱ्या-कडे पाहिल्यावर पाहणाऱ्यावर त्याची एवढी मोहिनी पडे की, त्याच्यावर रागावणे अथवा भाडणे हे जवळ जवळ अशक्य कोटीतच बसे !

आज सकाळी ‘ आभास ’ बगल्यावर त्याच्या खास मित्राची गर्दी झाली होती बगला कसला, राजवाडाच होता खरा तो ! आजूबाजूच्या रेताड रगात ‘ आभास ’ आपल्या सौंदर्याने खरोखरच स्वर्गाचा आभास निर्माण करी त्याची सर्व बाधणी जोधपूरकडल्या लाल दगडाची केलेली होती बाहेरचे मोठे आवार, त्या सभोवतालची मोठी दर्शनी भित, यामुळे बगल्याला मोठा उठाव येई या भितीला अधूनमधून कोपऱ्यावर बुरूज होते त्याच्या-वरच्या महिरपि, कमानी आणि कळस यानी पौर्वात्य कारागिरीची सूचना एकदम मिळे आवारातील मोठा बगीचा फार रेखीव नी हिरवाचार दिसे त्याच्या अधूनमधून कारजी, पाण्याची लहानमोठी टाकी आणि लताकुज–पुष्पकुज विखुरलले होते नतर मुख्य इमारत सुरू होई त्याची बाधणी तर पुरे-पूर पौर्वात्य धर्तीवर होती मोठी दालने, कमानी, नक्षीकाम आणि खोदकाम केलेल्या जाळ्या आणि खिडक्या, मेघडबऱ्या, छोटे मोठे घुमट, शिखरे आणि कळस याच्या सुदर मिलाफाने प्रासादाला फारच अवर्णनीय शोभा येई. खालच्या मजल्यावर दुसरा, दुसऱ्यावर तिसरा, हे अशा एकाहून एक छोटचा होणाऱ्या आकाराने बाधलेले होते की पाहाणाराचे चित्त सर्व बगल्यावरून हलके हलके

नकळत खेचीत आणून, पण ते हमखास शेवटच्या कळसावर केंद्रित व्हावे अशी खुबीदार ती बाधणी होती कळस खरोखर सोन्याचा होता, का त्यावर सोन्याचा मुलामा दिला होता, याबद्दल सपत्तीवर भाळणारे लोक खूप वितडवाद घालीत पण इतके मात्र खरे की, समुद्रकिनाऱ्याच्या पार्श्वभूमिकेवर, आजूबाजूच्या रेतीच्या रगावर विरोधाने उठून दिसणाऱ्या तांबड्या प्रासादाच्यावर, सूर्याची प्रभा पडलेला तो सुवर्णकळस मोठा आकर्षक होता खास !

या 'आभास' बगल्याच्या खालच्या मोठ्या दालनात जी खास मित्रमडळी जमली होती असे म्हटले, त्याच्यात कराचीतले बहुतेक सारे शिष्ट लोक दिसत होते त्यामधे कॉंग्रेसपक्षीय वृद्ध व्यापारी हरिदासलालजी होते, व लालजी महरोत्रा होते, जेठी शिपाइमलानी होत्या, राष्ट्रीय मुसलमानाचे पुढारी खान बहाद्दूर अल्लाबक्ष होते, तर आपल्या स्थूल शरीरयष्टीने व विनोदी वृत्तीने सदैव हास्याची खसखस पिकवणारे खान बहाद्दूर गबोलहि होते सिंधी हिंदूचे पुढारी नोचलदास वझिरानी होते, त्याचप्रमाणे डॉ गिडवानी हे कॉंग्रेस पक्षाचे अध्वर्यु होते कामगाराचे पुढारी म्हणवणारे नारायणदास बेचर, पारशी जमातीतले दानशूर दिनशा, मुस्लीम लीगचे शेख अबदुल मजीद, एम् एच् गझदर व जी एम् सय्यद होते. मॉन्टफर्ड रिफॉर्मस् सुरू झाल्यापासून वर्षानुवर्षे ज्यानी मत्रिपदाचा जास्तीत जास्त उपभोग घेतला असे सर गुलाम हुसेन हिदायतुल्ला गजगतीने चालत होते कराचीतल्या शिक्षण सस्थामध्ये प्रामुख्याने सबध येणारे न्यायाधीश रूपचद बिलाराम, डी जे सिंध कॉलेजचे प्रिन्सिपॉल बुटाणी, व प्रो गुरबक्षाणी होते तर इजीनियरिंग कॉलेजच्या प्रिन्सिपॉलपदाशी विसगत वाटणारा पाढरा कुडता अगात घालून हिंडणारे प्रिन्सिपॉल गोखले होते तसेच श्रीमान् शेट शिवरतन मोहता होते त्याचप्रमाणे 'Young old man of Karachi' म्हणून ओळखले जाणारे एन् डी मलीक होते. व्यापार, राजकारण आणि समाजकारण या सर्वांतच पारमार्थिक दृष्टीचा मिलाफ करून, व्यवहार आणि धर्म याची सागड घालण्याचा प्रयत्न करणारे, वयोवृद्ध नागरिक जमशेद नसरवानजी मेहता हे होते. याखेरीज अनेक कमीज़ास्त माहिती असणारी माणसे जमलेली होती.

प्रभाशंकर ६।। 'ला नेहमी पोषाख करून भेटावयास सकाळी येणाऱ्या लोकांच्या मुलाखतीसाठी खाली येत आजच्या त्यांच्या वाढदिवसाच्या दिवशी नेहमीप्रमाणेच ते खाली आले की, त्यांचे समक्षच अभिनंदन करावे, अशा हेतूनेच खालच्या दालनात ही मंडळी वाट पहात होती साडेसहा होऊन जेव्हा पावणे सात वाजण्याची वेळ आली तेव्हा सर्व लोक चुळबूळ करू लागले कारण तेथून पुढच्या कार्यक्रमाला अनेकांना जायचे होते, तर कित्येकांना आपापली स्वतःची कामे होती ज्या वेळेला दालनात लावलेल्या मोठ्या घड्याळाचा काटा सहापन्नासावर आला, तेव्हा काही लोकांच्या मनात आले की, प्रभाशंकरांची लहरी स्वारी गावात आहे का मलीरला निघून गेली ? पण चौकशी करता, ते नक्कीच 'आभास' बंगल्यात होते, असे कळले त्यातील अधिरे लोक म्हणायला लागले की, "इतक्या लोकांना तिष्ठत ठेवणे बरोबर नाही, हे प्रभाशंकरांच्या कसे लक्षात येत नाही ! " लोकांची चुळबूळ लक्षात आल्यावर जमशेट नसरवानजी मेहतांनी नेहमीप्रमाणे हे अवघड काम पत्करले नमस्कार केल्यासारखे हाताचे पंजे एकत्र जोडून, पण बोटे एकमेकावर आपटीत द्रुतगतीने जमशेट पुढे गेले आणि त्यांनी प्रभाशंकरांच्या सेक्रेटरीस विचारले की, "प्रभाशंकरांना उशीर का लागला ? मी जाऊन त्यांना लौकर खाली येण्यास सांगणार आहे "

सेक्रेटरी म्हणाला, "त्यांना उशीर कसा लागला हे काही कळत नाही. माणसं आज भेटावयास येणार हे त्यांना माहीत आहे व म्हणून ते आज आपलं आन्हिक उरकण्यासाठी पहाटे चारासच उठले मी दहा मिनिटांपूर्वी डोकावून आलो तेव्हा त्यांच्या प्रार्थनामंदिरामधे ते बसलेले होते वाटलं तर आपणच चला म्हणजे फिरून डोकावून पाहू " असे म्हणून तो जिन्याची वाट दाखवून पुढे जाऊ लागला, व त्याच्या मागोमाग जमशेद निघाले

प्रार्थनामंदिराच्या दरवाज्यात येऊन जमशेदांनी कानोसा घेतला दार लोटलेले होते, ते त्यांच्या सेक्रेटरीने थोडेसे किलकिले केले व तो भीत भीत आत डोकावून पाहू लागला प्रभाशंकर प्रार्थनामंदिरात असताना, अथवा ज्या वेळी, कुणी आपल्याला व्यत्यय आणू नये अशी त्यांची इच्छा असे त्या वेळी जर एखाद्याने त्यांना आत जाऊन त्रास दिला, तर ते उसळून येत हे माहीत असल्याने सेक्रेटरी प्रार्थनामंदिरात पाऊल ठेवायला धजत नव्हता. तेथे दोन

मिनिटे उभे राहिल्यावर पायातील पादत्राणे चटकन् बाहेर काढून जमशेद आपण होऊनच आत शिरले त्याच्यामागोमाग सेक्रेटरीहि आत गेला

जमशेद नसरवानजी मेहता याची साधुपणाबद्दलची ख्याति व परमार्थ, राजकारण व समाजकारण यातील वडिलकीचा अधिकार एवढा मोठा होता की इतर लोकाना जे निर्बन्ध असत ते जमशेदाना नसत अगात पारशी फॅशनचा बद कॉलरचा खादीचा लाब कोट, त्याच रगाच्या खादीची लाब विजार, पायातील पाढरे कॅनव्हसचे शूज, डोक्यावरची घडीची साधी टोपी- असा त्याचा साधा पण नीटनेटका वेष पाहिला, पाढरे शुभ्र विपुल केस पाहिले आणि त्याच्या लालसर गोऱ्या तेजपुज चेहऱ्याकडे नी पाणीदार भेदक डोळ्याकडे पाहिले की, माणसाच्या मनात आदर नी विश्वास उत्पन्न झालाच पाहिजे त्याच्या व्यक्तिमत्वाच्या मोहिनीत कितीक लोक सापडलेले होते लोकाच्या आपल्यावरच्या विश्वासाच्या जाणीवेने जमशेद नेहमी वागत आणि त्याना मज्जाव असा कुठेच नसे

जमशेदानी दार पुरे उघडले आणि त्यानी प्रार्थनामदिरात पाऊल टाकले प्रार्थनामदिर मोठ्या दालनात होते त्याच्यात मोठमोठ्या खिडक्याना अपारदर्शक काचेची तावदाने बसविलेली असल्याने, आत उजेड हवा तेवढा असला तरी, आतून बाहेरचे काहीहि दिसत नसल्याने, आतल्या शाततेच्या वातावरणाला बाहेरचा उपसर्ग होत नसे प्रार्थनामदिराच्या साऱ्या भिती भगव्या रगाच्या होत्या आणि त्यावर कोणत्याहि तजबिरी वगैरे काही नव्हत्या जमिनीवर ताबड्या रगाच्या ग्लेज्ड् टाईल्सनी फरसबदी केली होती दालनाच्या पलिकडच्या भितीजवळ एक सगमरवरी चौथरा होता त्यावर पद्मासन घालून ध्यानस्थ बसलेल्या प्रशात मुद्रेच्या देवतेची मूर्ति होती ती मूर्ति कृष्णाची होती, रामाची होती, बुद्धाची होती वा विष्णूची होती, हे कळण्यास काही मार्ग नव्हता कारण राम म्हटला तर धनुष्य, कृष्ण म्हटला तर बासरी, विष्णु म्हटला तर शख–चक्र–गदा वगैरे त्या त्या देवताची खुणेची चिन्हे असतात ती त्या मूर्तीवर काहीच नव्हती कदाचित् प्रार्थना करताना, ध्यान केंद्रित करण्यासाठी केवळ मदत, व पावित्र्य आणि ईश्वराचे इतर अनेक गुण याचे केवळ एक द्योतक म्हणून त्या ध्यानस्थ देवतेची मूर्ति त्या चौथऱ्यावर स्थापली असावी !

चौथऱ्याच्या दोन्ही बाजूस दोन पुरुषभर उचीचे वजनदार, चकचकीत पितळेचे नदादीप पाजळत ठेवलेले होते त्याच्यामधल्या ज्योति सदैव तेवत ठेवलेल्या असत चौथऱ्यावर मूर्तीच्या पुढे पायाशी एक ताज्या फुलाचा लहानसा ढीग ठेवला होता त्याच्या शेजारी एका चादीच्या उदबत्तीच्या घरात चार उदबत्त्या जळत होत्या त्याचा वास फुलाच्या मद सुवासात मिसळून तिथे दरवळत होता चौथऱ्याच्या पुढे खाली फरशीवर एक चौकोनी दर्भासन घातलेले होते. त्याच्यावर खुरमाडी घालून, पुढे वाकून हात आणि डोके चौथऱ्याच्या कडेवर टेकून प्रभाशकर मूर्तीपुढे विनम्र स्थितीत बसलेले दिसले त्याचे काळे लाब केस चेहऱ्यावरून पुढे ओघळून त्याचा चेहरा त्याखाली झाकून गेला होता हाताचे पजे कपाळाच्या खाली असल्यामुळे तेहि दिसत नव्हते फुलाच्या ढिगाच्या उजव्या बाजूस रुप्याच्या हालकारतीत कापूर जळून खाली चौकोनी काळसर डाग पडलेला होता

दरवाज्यातून आत प्रवेश करून जमशेद चार पावले चालून पुढे आले पण प्रभाशकराचा सेक्रेटरी त्याच्या मागेच उभा होता ध्यानधारणा व योग इत्यादीमध्ये स्वत त्याचीहि गति असल्याने प्रभाशकराना ध्यानस्थ पाहिल्यावर उशीर होत आहे, हे ध्यानात असूनसुद्धा एकदम हाका मारणे त्याना रुचले नाही त्यानीहि प्रभाशकराना बोलावण्यापूर्वी आपणहि दोन्ही हात जोडले, नेत्र मिटले आणि क्षणभर तेहि ध्यानमग्न झाल्यासारखे दिसले

मग जमशेदानी एकाएकी डोळे उघडले—आणि ते तसेच मागे वळून प्रार्थनामदिराच्या बाहेर आले सेक्रेटरी त्याच्या मागोमाग आला त्याने विचारले, "काय झाल ? तसेच बाहेर का आलात ? " तेव्हा जमशेदानी त्याच्या खाद्यावर हात ठेवून म्हटले, "प्रभाशकर कालवश झालेले दिसतात. पण काही शिष्ट मडळीना बोलावून आणून सर्वानी पाहाण बर "

त्यानी जाऊन खाली जमलेल्या मित्रमडळीपैकी पाचसहा लोकाना बोलावून आणले ही सर्व मडळी पाय वाजवीत, मोठ्याने बोलत, घाईघाईने वर आली त्या सर्वानी जवळ जवळ एकदमच विचारले "जमशेद, प्रभाशकर कुठ आहेत ? "

जमशेदानी नुसता हात वर आकाशाकडे दाखवीत म्हटले, "ते गेले ! ते आपल्यात आता नाहीत ! " या बोलण्याचा अर्थ कुणालाच कळेना.

" म्हणजे काय ? म्हणजे काय ? " असे त्यानी पुन विचारल्यावर जमशद म्हणाले, ' प्रभाशकराना देवाज्ञा झाली ! ते कालवश झाले आहेत ! ! "

आणि यानतर गलबला आणि गोधळ याला सुरुवात झाली त्या सहापैकी काही लोक प्रार्थनामदिरात शिरले, तर काही हतबुद्ध होऊन जागच्या जागी-' हे काय झाल बुवा ! काय हा विचित्र योगायोग ! " इत्यादि नुसते आश्चर्योद्गार काढीत उभे राहिले, तर इतर काही गर्दीगर्दीने खाली जाऊन हावभाव करीत व अर्धवट वाक्यानी सर्व लोकाना ही आश्चर्यकारक बातमी केव्हा नी कशी सागू, असे होऊन बोलू लागले बघता बघता, एकाकडून दुसऱ्याला, दुसऱ्याकडून तिसऱ्याला, असे होत होत ही आश्चर्यकारक अघटित घटना वणव्याप्रमाणे पसरत पसरत सर्व कराचीभर होण्यास थोडा अवधि लागला

बरोबर काय झाले, याचा कुणालाच फारसा उलगडा नव्हता बरेच लोक तर्क करीत, व त्याच्यात आपल्या पदरचा मीठमसाला घालीत, त्यामुळे थोड्याच वेळात जे अनेक लोक ' आभास ' बगल्याकडे जमू लागले, त्याना खरोखर काय झाले, याचा पत्ता नव्हता .

मनुष्यस्वभावाला दैनदिन कार्यक्रमाच्या सारखवटपणामुळे कुठलीहि नवी चव आवडते पण त्यात अशी काही अद्भुत घटना झाली म्हणजे तर त्या गोष्टीचे चर्वितचर्वण करून तिची चव जिभेवर पुष्कळ वेळ घोळत ठेवणे त्याला बरे वाटते आताच पहाना ज्या प्रभाशकराचा एक्कावन्नावा वाढदिवस उत्साहाने करण्याचा सर्वांनी चग बाधला होता त्यानाच नेमक्या वाढदिवसाच्या सकाळी अशा विचित्र परिस्थितीत मृत्यु यावा, ही किती चमत्कारिक गोष्ट ! जे कार्यक्रम आणि समारभ प्रभाशकर याना जास्त आयुरारोग्य चितण्यासाठी ठरवलेले होते, त्याचे रूपातर दुखवट्याच्या सभेत व्हावे, हा केवढा दैवदुर्विपाक ! ही बातमी कळल्यावर लोक टोळक्या टोळक्यानी ' आभास ' बगल्यावर जमू लागले या मृत्यूमुळे खरोखर हानि झाली, सार्वजनिक आयुष्यातील एक स्थितप्रज्ञ माणूस गेला, या विचाराने काही माणसे हळहळत होती. तर मोठा प्रसिद्ध माणूस वारला, आज सर्व बाजारहाट, कोर्टकचेऱ्या बद राहणार, मोठी पाहाण्यासारखी स्मशानयात्रा निघेल, निरनिराळ्या पुढाऱ्याची चागली भाषणे होतील ती आपण समक्ष हजर राहून पाहिली, ऐकली पाहिजेत, कारण असे डोळ्याचे पारणे फिटणारे प्रसग काही नेहेमी

घडत नाहीत, अशी अभूतपूर्व स्मशानयात्रा कधी काळी व्हायची ती पाहिलीच पाहिजे, अशा विचाराने पुष्कळ बघे लोक जमत होते. प्रभाशकराना मोठे का मानीत, त्याची थोरवी कशात होती या विचाराचा त्याना गध नव्हता, तर केवळ नवलाईचा प्रसग समक्ष पाहायला मिळणार एवढीच कुतुहलाची गोष्ट होती

इतर बहुतेक लोक कोणत्याच विशेष विचाराने आलेले नव्हते अशाना स्वत चा असा काहीच विचार असत नाही त्याना इतरानी जो सुचवावा तो त्याचा विचार एखाद्या वक्त्याने 'वासासि जीर्णानि यथा विहाय नवानि गृण्हाति नरोपराणि। तथा शरीराणि विहाय जीर्णा, न्यन्यानि सयाति नवानि देही' असा भाषणाचा सूर काढला असता, व 'मरण प्रकृति शरीरिणाम्' म्हणून अश्रु ढाळणे बरोबर नाही असे म्हटले असते तर या लोकानी माना डोलवून डोळे टिपले असते नी रडणे थाबवले असते पण दुसऱ्या एखाद्या भावना चेतविणाऱ्या वक्त्याने 'प्रभाशकर गेले! हिमालयाच्या शिखराच्या रागेत ज्याप्रमाणे गौरीशकर सर्वात धवल नी उच्चतम तसे ते होते असा माणूस शतकामध्ये एखादा होतो! केवढी आमची पुण्याई की आमच्यामध्ये त्याचा जन्म गेला पण त्याच्या निधनाने आम्ही सर्व पोरके झालो आहो आमच्या डोळयातून अश्रूच्या गगायमुना कितीहि वाहिल्या तरी आमच दु ख हलक होणार तरी कस?' असे गहिवरलेल्या कठाने विचारल्याबरोबर या लोकाच्या डोळयाना अश्रूच्या शब्दश धारा लागल्या असत्या

बहुजन मत म्हणून ज्याला म्हणतात ते शाडूच्या चिकण मातीसारखे असते त्याला वाकवावे तसे ते वाकते, घडवावे तसे घडते चागल्या कारागिराच्या हाती त्याच्यातून विघ्नहर्त्या मगलमूर्तीची घडण होऊ शकते, तर दुसऱ्या एखाद्या कुभाराच्या हाती गाजा नाही तर अफीण पिण्याला त्याची चिलीमहि बनू शकते

थोड्याच वेळात 'आभास' बगल्याच्या आवारात, त्याच्या भोवताली, मोठा जनसमर्द जमला होता

इकडे प्रार्थनामदिरामध्ये बरीच शिष्टमडळी जमली पण त्यात घरची माणसे अशी काहीच विशेष नव्हती प्रभाशकराच्या नात्याची अशी कुणीच माणसे नव्हतो प्रभाशकराचे पूर्वी लग्न झालेले होते, ते विधुर होते, का

अविवाहितच होते हे कुणालाच माहीत नव्हते त्याची कौटुबीय अशी कुणीच मडळी नव्हती त्याचे खासगी आयुष्य ही एक लोकाना रहस्यमय गोष्ट होती कुणालाच त्याबद्दल फारशी माहिती नव्हती

त्यानी वाढवलेली व मानलेली दोन माणसे मात्र असत त्याच्या घरी एक तरुण विद्यार्थी असे त्याला म्हणत शिरीष तर दुसरी एक तरुण मुलगी असे तिचे नाव ‘ स्रग्धरा ’ होते

जेव्हा प्रभाशकर कालवश झाले असे वाटून ही सर्व माणसे प्रार्थनामदिरात शिरून पुढे गेली, व प्रभाशकराना मूर्तीपुढे नम्र झालेल्या स्थितीतून उठवून हलविण्यासाठी त्याना उचलू लागली, त्या वेळी सर्वांच्या तोडातून आणखी एक आश्चर्योद्‌गार निघाला कारण प्रभाशकराच्या हातांखाली चौथऱ्यावर एक रिव्हॉल्वर असल्याचे आढळून आले ! या नव्या घटनेने लोकाच्या कुज-बुजीला नवीनच भरती आली ज्या स्थितीत रिव्हॉल्वर सापडला, त्यावरून साहजिकच लोकाच्या मनात कुतूहल निर्माण झाले प्रभाशकरानी प्रार्थना-मदिरात आपल्याबरोबर रिव्हॉल्वर का नेले ? त्याचा हेतु काय असावा ?

ही नवी घटना बाहेर जमू लागलेल्या लोकाना जसजशी कळू लागली तसतशी त्याच्यामध्येहि वाच्यता सुरू झाली बाहेरच्या सर्व लोकाना आत घडलेली प्रत्येक गोष्ट समक्ष पाहता न आल्यामुळे ऐकिवात आलेल्या सत्यतेच्या अशावर तर्क आणि कल्पना याचा पाक घालून त्याचा मन मानेल तसा हलवा ते फुलवीत लोकाच्यामध्ये असे बोलणे आता सुरू झाले की, प्रभाशकराच्या मृत्यूत काहीतरी मोठे रहस्य दडलेले आहे

कोणी विचारीत, ‘प्रभाशकराना आत्महत्या करण्याची जरूर पडली अस कोणच मानसिक दु ख त्याना टोचत असाव ?’ एवढा मानमान्यतेस पोचलेला मोठा माणूस जेव्हा जगातून मागच्या दाराने गुपचूप बाहेर पडतो, तेव्हा जगाला शहाजोगपणाने तोड दाखविण्याचे धैर्य त्याला होत नाही जग आप-ल्याला आपण जे आहो असे मानते, आणि आपण वस्तुस्थितीत जे असतो, त्यामधे जर तफावत असली तर ती तफावत जगाच्या ध्यानात येण्यापूर्वीच लोकापुढून काळे करावे, असे माणसाला वाटते कारण आपल्या वागणुकी-तला दुटप्पीपणा उघडकीस आल्याने आपली मानखडना होईल असे त्याला भय वाटते. मोठ्या प्रसिद्ध माणसाच्या अशा कितीक गोष्टी असू शकतील

की, ज्याच्या प्रसिद्धीमुळ त्याना सकट पडेल श्रीमान् माणसाला दिवाळखोरी येण, प्रामाणिकपणाचा आव आणणारा माणूस लफगा ठरण, साधुत्वाचा आव आणणारा माणूस नीच ठरण, नीतिमान म्हणून प्रसिद्ध असलेला माणूस व्यसनी अथवा बाहेरख्याली ठरण, अशा कारणानी कित्येक लोकानी आत्महत्या केल्याची उदाहरण आहेत

आत्महत्या नसली तर दुसरी शक्यता खुनाची ! मोठ्या माणसाला शत्रूना काय तोटा ? त्याचा मोठेपणा ज्याना पाहवत नाही असे शत्रु असतत त्याच्या अस्तित्वामुळे ज्याच्या वाटेत मोठी धोड असते, व ती नाहीशी करण्याला या व्यक्तीलाच जगातून उठवले पाहिजे असे ज्याना वाटते, असे शत्रु असतात अशा शत्रूपैकी कोणी तर नसेल केला प्रभाशकराचा खून ?

तिसरा सभव म्हणजे साहजिकपणाने मृत्यु येणे पण हा सभव फार फार दूरचा कारण नेमक्या वाढदिवसाच्या दिवशी देवापुढे बसलेले असताना मरण येणे, ही इतकी अद्भुत गोष्ट की, तिची शक्यता अत्यत कमी. शिवाय अशा मरणात बातमीदाराना अथवा लोकाना चमचमीत बातमीचे खाद्य कुठे मिळते ? मोठ्या माणसाचे मरण हे जरी ठळक बातमीच्या सदरात जमा होत असले, तरी ते बेचवच त्यापेक्षा जास्त खुसखुशीत बातमी म्हणजे मोठ्या माणसाचे मरण रहस्यपूर्ण घटनेने होणे, या अद्भुत रहस्याच्या पिपासेने साध्यासुध्या सरळ गोष्टीतून जिथे माणसे मुद्दाम रहस्य उकरून काढायचा प्रयत्न करतात तिथे प्रभाशकराना ज्या तऱ्हेने मृत्यु आला त्या तऱ्हेत रहस्यमय कोडीच्या कोडी लोकाना आढळावी, यात काय नवल ?

आता आज स्मशानयात्रा निघते का नाही, का या मृत्यूचे गूढ उकलण्यासाठी ही गोष्ट पोलिसाच्या हाती सोपवावी लागते, का मृत्यूत्तर वैद्यकीय तपासणी करायची पाळी येते, हे कुणाला कळत नव्हते

पण शेवटी आश्चर्याची गोष्ट अशी की, वरिष्ठ पोलीस अधिकारी वगैरे येऊन, त्यानी खुद्द कमिशनरसाहेबाच्या कानावर गोष्ट घालून खुद्द त्याच्या विचाराने नेहमीप्रमाणे स्मशानयात्रेला परवानगी दिली यामुळे लोकाच्या रहस्यशोधक बुद्धीला वाव न मिळता मोठी स्मशानयात्रा निघाली पण प्रभाशकराच्या मृत्यूवर आणखीन् प्रकाश पडायला हवा, त्याशिवाय त्याच्या

मृत्यूची घटना सहीसाफ आहे अशी कुणाची खात्री झाली नव्हती आणि हे रहस्य न कळल्याचे शल्य लोकाच्या मनात डाचत राहिले

वर्तमानपत्रात अधिकृतरीत्या एवढी एकच बातमी सरकारकडून छापावयास दिलेली होती

“कराचीचे प्रसिद्ध नागरिक श्रीमान् प्रभाशकर याना ‘आभास’ बगल्यावर आज सकाळी देवाज्ञा झाली त्याच्या एकावन्नाव्या वाढदिवसानिमित्त अनेक सार्वजनिक कार्यक्रम आखलेले होते त्यासाठी घरून निघण्यापूर्वी सकाळीच त्याच्या प्रार्थनामदिरात ते कालवश झालेले आढळून आले ‘आपल्या मरणाबाबत घातपाताची शका घेण्याचे कारण नाही, व दुसऱ्या कोणाचाहि सशय घेण्याचे कारण नाही ’ एवढे प्रभाशकर यानी लिहून ठेवलेले आढळले. त्याच्या मृत्यूनिमित्त शोकप्रदर्शनार्थ जे काही सार्वजनिक कार्यक्रम होतील त्यात सर्वाना भाग घेता यावा म्हणून, व त्याच्या स्मृतीला मान देण्यासाठी सर्व सरकारी ऑफिसे, शाळा-कॉलेजे, बॅका वगैरेचे व्यवहार दोन दिवस बद राहातील ”

या म्हणण्याची सत्यता मला पुढे प्रभाशकराच्या चरित्रात दिसून आलीच. पण त्याहीपेक्षा जवळ म्हणजे माझ्या स्वत च्याच बाबतीत मला त्याचे प्रत्यंतर आले प्रभाशकर याच्या अद्‌भुतरम्य नी रहस्यपूर्ण चरित्राचा उलगडा करायचा ज्या वेळी मी निश्चय केला, त्या वेळी ही गोष्ट किती अवघड होईल याचा मी विचार करीत बसलो नाही, तर मनात विचार आल्यावर तो पार पाडायचा, अशी पक्की खूणगाठ मनात बाधली, आणि कार्याला सुरुवात केली मी जर त्यावेळी विशीपचविशीच्या उमेदीत नसतो तर मी अशा विचित्र कामाला हात घालण्याचे साहस केलेच नसते कारण त्या वेळी माझ्या मनात मला काय शोधायचे आहे, याचीच नीट कल्पना नव्हती, मग ते शोधायचे कुठे व कसे याची कल्पना असणे तर दूरच राहिले

मी प्रभाशकराच्या एकावन्नाव्या वाढदिवसाच्या वेळी आणि अर्थात्‌च त्याच्या मृत्यूच्या दिवशी कराचीतच होतो त्या सर्व घटनेने माझ्या मनावर एवढा परिणाम झाला की या अद्‌भुतरम्य चरित्राच्या माणसाची पूर्ण माहिती आपण जमवावी, अशी माझ्या मनाने उचल खाल्ली

तरुण माणसे फक्त तरुणीच्याच प्रेमात पडू शकतात, असे नाही तरुण माणसे एखाद्या कार्याच्याहि प्रेमात पडू शकतात ज्यामुळे माणसाचे मन खेचले जाईल अशा प्रेमाखेरीज इतर कितीक गोष्टी असू शकतात त्याच्याबद्दल इतका बोलबाला होत नाही, म्हणून त्या गोष्टी इतक्या चटकन् लक्षात येत नाहीत नाहीतर प्रत्यक्ष आयुष्यात प्रेमाच्या आकर्षणाचा कवीनी गाइलेला बडिवार ज्यापुढे लटका ठरेल अशी कार्याची ओढ आणि तळमळ तरुण मनाला लागलेली कितीक उदाहरणे आढळतात माझेच पहा ना मी या स्वनियोजित कार्याच्या असाच प्रेमात पडलो अगदी तहानभूक विसरून मी या कार्याला स्वत ला वाहून घेतले

तुम्ही विचाराल की प्रभाशकराचे चरित्र शोधून काढायची मला एवढी सुरसुरी का यावी ? याचे उत्तर मी देऊ शकतो पण त्याने तुमचे समाधान होईलच होईल अशी मात्र मला हमी देता येत नाही आणि त्याचे कारण प्रेमात पडणाऱ्या माणसाच्या उत्तरासारखेच वेडसरपणाचे वाटेल प्रेमात पडणारा माणूस, का प्रेमात पडला हे सागू लागला तरी इतराना ते समर्पक कुठे वाटते ? वास्तविक कोणच्या गोष्टीने कुणाचे चित्त वेधले जाईल, आणि

किती प्रमाणात, याला काहीच नियम-निर्बंध नाही माझ्या या कार्याला वाहून घेण्याबद्दल थोडेसे असेच झाले

ज्या वेळी इतर बधे लोकाच्याबरोबर मी 'आभास' बगल्यात प्रभाशकराचे अत्यदर्शन घ्यावयास गेलो त्या वेळी त्याचे शव मागे तक्के लोड ठेवून जवळ जवळ बसलेल्या स्थितीत ठेवले होते प्रार्थनामदिरातले पवित्र वातावरण, तिथली ध्यानस्थ देवतेची मूर्ति, आणि त्यापुढे ठेवलेल्या प्रभाशकराच्या मृत देहावरचा भाव या सर्वाचा माझ्या मनावर फार परिणाम झाला माझ्या मनाला वाटले की, 'आभास' बगल्यासारखा प्रचड बगला स्वत च्या कमाईवर जो इतक्या अल्प कालावधीत बाधू शकतो, त्याच्या बुद्धीचे बळ काही थोडे थोडके असू शकणार नाही कारण जगात माणसाच्या यशात दैवाचा वाटा असू शकेल, पण ज्या न्यायाने 'दैवमेवात्र पचमम्' म्हणतात, त्या न्यायाने दैवाचा वाटा माणसाच्या यशात एक पचमाश धरता येईल पण बाकीचा उरलेला मोठा भाग माणसाच्या कर्तृत्वगारीला द्यायला नको का ?

असा कर्तबगार माणूस इतर अनेक बाबतीत इतर श्रीमताप्रमाणे पैशाची उधळपट्टी करणे शक्य असताना, या प्रार्थनामदिरासारखे साधे प्रार्थनामदिर बाधून त्यात ध्यान, मनन, चितन करीत बसतो, ते का ?

इहलौकिक यश ज्याच्या आवाक्याबाहेर आहे, त्यानी वेदाताच्या गोष्टी सागितलेल्या मी ऐकल्या आहेत ज्या लोकाच्या अगी एक दमडीहि मिळविण्याची कर्तबगारी नाही, अशानी मारलेल्या स्वार्थत्यागाच्या गप्पा माझ्या परिचयाच्या आहेत पण ज्या प्रभाशकराच्यासारख्या माणसाच्या आधीन लक्ष्मी आणि सरस्वती दोन्ही झाल्या आहेत, त्याचे मन त्या दोन्हीच्या आस्वादात न रमता जास्त कष्टमय उपासना–मार्गाला का लागावे, याचें मला आश्चर्य वाटत होते

प्रभाशकराना टेकवून बसवले होते ते जणू काही पद्मासन घालून ध्यानस्थ बसावे, तसे दिसत होते त्याच्या अगावर घातलेल्या झिरझिरीत रेशमी उत्तरियातून त्याची कृश पण पीळदार आणि बाधेसूद शरीरयष्टि सहज दिसत होती. त्याच्या डोक्यावरून लाबसडक काळे कुळकुळीत केस बरोबर मधे विभागून, चेहऱ्याच्या दोन्ही बाजूस कानावर मानेवरून वर आणि खाद्यावर रुळत होते. एकावन्नाव्या वाढदिवसाच्या वेळी माणसाच्या डोक्याच्या केसात

पांढरा केस एकहि दिसू नये, ही गोष्ट सर्वसामान्य नाही पण त्याहीपेक्षा त्याच्या मुद्रेवरचा भाव पाहून मला जास्त विचार पडला ते कालवश झाले होते, असे सर्व म्हणत होते, म्हणून मानणे भाग होते पण त्याच्या चेहऱ्यावर होती ती प्रेतकळा नव्हे त्याची मुद्रा होती ध्यानस्थ बसलेल्या योग्याची चेहऱ्यावरचा भाव इतका शांत, समाधानी, कृतकृत्य होता की, स्थितप्रज्ञाची लक्षणे वाचून तो कसा दिसतो म्हणून मला कुणी विचारले, तर मी प्रभाशंकराच्या मुद्रेकडे बोट दाखवले असते मला त्याच्या मुद्रेवरून वाटले की, जीवनाच्या गूढ प्रश्नाचे उत्तर या माणसाला सापडलेले असावे ! माझ्या मनाला हुरहूर लागली की, खुद्द याच कराचीत हाच मोठा पुरुष गेली कित्येक वर्षे चालता बोलता हिंडत असून मला त्याचा परिचय करून घेण्याची बुद्धि कशी झाली नाही ? त्याच्या परिचयाने आपल्याला केवढा लाभ झाला असता ! ज्ञानाचा मार्ग दिसला असता ! पण या सर्वांची जाणीव मला व्हावी अशा वेळी की, त्या माणसाच्या तोंडून यापुढे अवाक्षरहि निघणे शक्य नाही !

याच विचाराने भारून जाऊन मी प्रार्थनामंदिरात मागे सरून भिंतीला टेकून किती वेळ उभा राहिलो त्याचे अंत्यदर्शन घेण्यासाठी येणाऱ्या हजारो स्त्री-पुरुषांच्या प्रवाहातून बाजूस सरून मी एका कडेला उभा राहिलो होतो एकानंतर एक लहान मोठे स्त्रीपुरुष, सर्व जातीय व सर्व धर्मीय, त्याच्या शवापुढे क्षणकाल नमून पुढे जात होते कित्ती कित्ती वेळ मी ते पाहात उभा राहिलो !

मला वाटले, जिथे ॲमेझॉन नदी दक्षिण ॲटलांटिक महासागराला मिळते तिथे उभे राहिल्यावर शोधक बुद्धीने निघालेल्या जगप्रवाश्याला माझ्यासारखेच वाटत असेल दक्षिण ॲटलांटिक महासागर जसा मोठा आणि प्रचंड तसा हा मृत्यु आहे त्याला ज्याप्रमाणे हा महानद येऊन मिळतो त्याचप्रमाणे प्रभाशंकराच्या जीवनाचा प्रवाह येथे मृत्यूमधे मिळाला आहे ॲमेझॉन नद एवढ्या जोराने समुद्रात मिसळतो की त्याच्या मुखाच्या साठ मैल पुढे समुद्राचे खारे पाणी मागे सरून तिथे फक्त गोड पाणीच सापडते त्याप्रमाणे इथे प्रभाशंकराच्या अंतकाली झालेले आहे. त्याचा जीवनप्रवाह मिळताना त्याच्या प्रचंड आवेगाने प्रत्यक्ष मृत्यु जणू मागे सरकला ! या मृत्यूमुळे तेथे जमलेले सहस्रावधी जीव त्याचीच नव्हते का साक्ष देत ? ज्या वेळी लहानसा ओहळ समुद्राला मिळतो त्या वेळी त्याची कुणी दखलहि

घेत नाही तो ओहळ समुद्रात मिसळताना तो कुणाला कळतहि नाही त्या-उलट प्रभाशकराच्यासारखा प्रचड जीवनप्रवाह मृत्यूच्या समुद्रात जेव्हा मिसळू लागतो तेव्हा मृत्यु तो प्रवाह सहजासहजी आत्मसात् करू शकत नाही त्या प्रवाहामुळे केवढी उलथापालथ होते! समुद्राच्या पाण्यात केवढी खळबळ होते! प्रभाशकराच्यासारखे आयुष्य मृत्यूमधे विलीन होताना मागे एवढ्या स्मृति, एवढी कीर्ति ठेवते की, जीवनप्रवाहाला सपुष्टात आणण्याचे मृत्यूचे जे मुख्य कार्य ते अशा बाबतीत सहजासहजी साध्य होत नाही अशी महान् व्यक्ति जाते, पण मागे मोठी कीर्ति ठेवून मृत्यूला आव्हान देत देत !

पण वर उपमा दिलेल्या अॅमेझॉन नदाच्या मुखाजवळ उभा राहाणाऱ्या प्रवाश्याला ते विस्तीर्ण पात्र पाहून नुसता अचबा वाटत नाही तर त्याच्या मनात आणखी विचार येतो की एवढा मोठा जलौघ एकत्र जमण्यापूर्वी तो केवढ्या मोठ्या प्रदेशावरून वाहात आला असला पाहिजे ! किती शेकडो योजने अतर आक्रमून हा जलौघ आला असला पाहिजे किनीक पर्वत, दऱ्या आणि खोरी, जगले यामधून या नदाने आपला मार्ग चोखाळला असेल ! ज्या मानाने जलौघ मोठा, त्या मानाने त्याने आक्रमण केलेले क्षेत्रहि मोठे म्हणून नदमुखाजवळ थाबण्यापेक्षा त्या नदाच्या प्रवाहाच्या अनुरोधाने आत वर शोध करीत गेल्यास केवढा मोठा पूर्वी न पाहिलेला प्रदेश आपल्या दृष्टीस पडेल ! या विचाराने प्रेरित होऊन प्रवाश्याला शोध लावीत अत प्रदेशात जाण्याची उत्कट इच्छा होते

माझ्या मनात बरोबर हाच विचार आला ज्या प्रभाशकराचे अत्यदर्शन एवढे प्रभावी होते, त्याचे जीवनचरित्र केवढे रोमाचकारी असले पाहिजे ! त्याच्या जीवनयात्रेचे मी जर परिशीलन केले तर आपण केवढे ज्ञान आणि अनुभव याचे धनी होऊ ! विशेषत प्रभाशकराच्या अज्ञात पूर्वचरित्राच्या रहस्याने माझ्या शोधक बुद्धीला प्रतिबध न होता उलट जास्त स्फुरण चढले आणि मी त्याच वेळी मनाशी निर्धार केला की, या महाभागाच्या चरित्राचा प्रवाह कोठून कोठून कसा कसा वाहात गेला ते हरप्रयत्नाने आपण शोधून काढूच काढू त्याकरिता श्रम व तनमनधन याची केवढीहि किमत द्यावी लागली तरी हरकत नाही आणि प्रभाशकराच्या शवापुढे नत होताना याच माझ्या निश्चयात मी त्याच्या आत्म्याचा आशीर्वाद मागितला !

सर्व बातमीचा साठा ज्याच्या जवळ नेहमी असतो असे मानतात त्या वृत्तपत्रीय बातमीदाराच्याकडे मी प्रथम धाव घेतली त्या वेळी मला असे आढळून आले की, कराचीतल्या सर्व दैनिकानी प्रभाशकराच्या एकावन्नाव्या वाढदिवसानिमित्त जे खास अक काढले आणि त्यात त्याचे जे मोघम गुणवर्णन केले, त्यापेक्षा विशेष जास्त माहिती त्या कुणालाच नव्हती बहुतेक सर्व माहिती माझी मलाच शोधून काढावी लागणार हे मला कळून चुकले

मी दोनचार दिवसानी जमशेदाच्या बगल्यावर त्याना भेटावयास गेलो त्याच्या बाहेरच्या व्हराडयात इतर पुष्कळ माणसे भेटावयास आलेली बसली होती कारण कराचीत कुणाहि माणसाला कसल्याहि तऱ्हेचा प्रश्न पडला तरी विश्वासाने आणि हक्काने जसे घरच्या वडिलधाऱ्या माणसाकडे जाऊन तो त्याचा सल्ला घेतो, त्याप्रमाणे येऊन लोक आपल्या अडचणी जमशेदाना सागत व त्याचा सल्ला घेत आणि जमशेदाचीहि थोरवी अशी की ते शात चित्ताने सारे ऐकून घेत आणि सल्ला देत त्याच्या एवढ्या मोठ्या माणसाला स्वत ची अशी किती तरी कामे असतात आणि त्यानी इतर अनेक प्रसिद्ध व्यक्तीच्या प्रमाणे वेळ नसल्यामुळे कुणाची भेट घेतली नसती वा ‘ अशा लोकाच्या खाजगी बाबतीत आपण सल्ला देऊ शकत नाही,’ असे ते म्हणते तर ती गोष्ट वाजवी झाली असती पण जमशेदाचे तसे नसे जगापेक्षा आपण कोणी वेगळे आहो, ही भावनाच त्याची नसे त्यामुळे आपपर भाव न बाळगता ते कुणाचीहि दु खे वा सकटे आपलीच मानून त्याचा परिहार करायला सर्व तऱ्हेने मदत करीत आणि विनावेतन चागला उपदेश किवा मदत मिळाली तर ती कुणाला नको असते ?

सकाळी उठून जमशेद खाली येण्याची बरीच माणसे आपापल्या कामासाठी वाट पाहात होती माझ्या मनात आले की, काय हे सारे लोक विनाकारण याना सतावतात ? त्यानी तोडाने काही म्हटले नाही तरी इतर लोकानीच स्वत.चे स्वत. समजून, त्याचा वेळ उगीच घेणे बरे नाही, हे या लोकाच्या कसे ध्यानात येत नाही ? मग माझ्या स्वत च्या ध्यानात आले की प्रत्येकाला स्वत चे काम तेवढे महत्त्वाचे आणि इतराची कामे क्षुल्लक वाटतात मी स्वत तरी माझ्याच कामात मदत मागायला नव्हतो का आलो ? मग इतराना नावे ठेवायला मला हक्क कसा पोचतो ? या विचाराने मी

मनाशी हसतो तो जमशेद माझ्यामागून तिथे व्हराड्यात आले नी माझ्या खाद्यावर हात ठेवून म्हणाले,

"काय रे श्रीधर, का आलास ? "

मी चटकन् उठून उभा राहात म्हटले– "तुमच्याशी बोलायच होत "

'मग, बोल की "– ते म्हणाले

आजूबाजूला बसलेल्या लोकाच्याकडे दृष्टिक्षेप करीत मी म्हटले, " माझ्या कामाला जरा वेळ लागेल आपल्याशी सवडीन बोलायच आहे. आणि जरा एकीकड बसून बोलल तर बर होईल "

जमशेदाना ही वाक्ये ऐकायची नेहमीची सवय असेल कारण प्रत्येकजण अशीच सुरुवात करत असेल

पण त्याबद्दल काहीहि न दर्शविता त्यानी मला व्हराड्याच्या आतल्या बैठकीच्या खोलीत नेत म्हटले– " बस आताच मला सवड आहे काय तुला सागायच आहे ते साग "

" माग सागितल्याप्रमाण मी प्रभाशकराच पूर्वचरित्र शोधून काढून ते कदाचित् लिहिणार आहे, " असे त्याना सागितले तेव्हा ते म्हणाले–" छान, चागली कल्पना आहे लिही की "

" पण मला तुमची मदत पाहिजे आहे "

" कोणच्या तऱ्हेन ? "

" तुम्हाला त्याच्याबद्दलची जी सारी माहिती आहे ती तुम्ही मला सागाल का ? "

जमशेद हसून म्हणाले– " मला त्याच्याबद्दल जेवढी माहिती आहे तेवढी सागेन ती माहिती मलाच काय कराचीतल्या बहुतेक लोकाना असेल कारण कराचीत प्रभाशकराच वास्तव्य बरीच वर्ष होत "

" त्या माहितीबद्दल मी नाही म्हणत, जमशेद ती मी इतर लोकाच्याकडून काढीन पण प्रभाशकर कराचीला येण्यापूर्वीच्या त्याच्या आयुष्याची हकिकत मला हवी आहे "

" मग ती मला कशी माहीत असणार ?–" त्यानी विचारले

" कारण सर्वजण तुम्हाला विश्वासान स्वत.बद्दल सागतात. "

" विश्वासान सागतात याचाच अर्थ त्यानी विश्वासान सागितलेल्या गोष्टी

मी इतर कुणाजवळ बोलू नयेत,असा नाही का होत ? नाही तर विश्वासान सागण्याचा हेतु काय ? "

"नाही जमशेद ! माझा उद्देश केवळ कुणाच्यातरी खासगी बाबतीत नुसत्या चाभारचौकशा करायचा नाही प्रभाशकर ही फार मोठी व्यक्ति होती, ही माझी खात्री झाली त्याच्या चरित्राच्या माहितीन माझ्या मनात नेहमी उभ्या राहाणाऱ्या, 'जीवनाचा अर्थ काय ? ' या माझ्या प्रश्नाच उत्तर कदाचित् मिळेल, अस मला वाटत त्याची सर्व अशी माहिती कुणालाच दिसत नाही, म्हणून ज्याना ज्याना ती असेल त्याच्या त्याच्याकड जाऊन ती काढायची, अस मी ठरवल आहे म्हणून तुम्हाला जी माहिती असेल ती विचारायला मी मुद्दाम आलो. 'प्रभाशकराची गति योगाभ्यासात होती, ' अस काही म्हणतात. आणि तस असल तर समव्यवसायी या नात्यान तुम्हाला त्याची बरीच माहिती असण शक्य आहे त्याच्या पूर्वचरित्रावर प्रकाश पडेल, अशी सुद्धा माहिती तुम्हाला कदाचित् ठाऊक असेल "

जमशेद म्हणाले, " ठीक आहे, श्रीधर मला आहे ती माहिती मी तुला सागेन पण त्या अगोदर त्याच्या चरित्राची इतर सर्व माहिती तू स्वत ला उपलब्ध करून घे, आणि मला येऊन साग, मग तिच्यातले चुकलेले दुवे मी बसवून देईन "

थोडयाशा असमाधानाने मी त्याना विचारले, "ती माहिती आता नाही का सागता यायची ?"

जमशेद म्हणाले, " सागता येईल, पण सागण योग्य नाही व्हायच, कारण कोणचहि ज्ञान ते कळण्याला योग्य अशा परिस्थितीत कळल्यान फायदा होतो भलत्या वेळी ते कळल्यान त्याचा विपरीत अर्थ होण शक्य असत म्हणून मला असलेल्या माहितीचा ती लोकाना कळून विपर्यास होऊ नये म्हणून मी ही काळजी घेत आहे "

मी त्याचा आशीर्वाद मागितला आणि नमस्कार करून आपल्या कामाला निघालो

जमशेदाच्या भेटीनतर मी खूपच वेळ म्हणजे काही वर्षे या स्वेच्छेने स्वीकारलेल्या कामावर खर्च केली पण आता मला सागायला फार समाधान आणि थोडा अभिमानहि वाटतो की माझे हे कठीण कार्य मी तडीस नेऊ

शकलो मला या कार्यात काय अडचणी आल्या, कुठे कुठे प्रवास करावा लागला, कोणकोणत्या माणसाचे पत्ते शोधून काढावे लागले व त्याच्याकडून कशाकशा युक्तिप्रयुक्तीनी मला हवी असलेली माहिती तुकड्यातुकड्यानी जमा करावी लागली, हे सर्व तुम्हाला ऐकविण्यात काहीच हशील नाही म्हणून मी जमा केलेली सर्व माहिती एकत्रित करून व सगतवार लावून तुम्हाला निवेदन करीत आहे म्हणजे तुम्हाला समजावयाला सोयीचे होईल आणि जमशेदाना सागण्यापूर्वी मी जुळविलेल्या साखळीचे पुन एक पारायण झाल्याने सर्व दुवे व्यवस्थित बसले आहेत, अशी माझी खात्री होईल मग त्यात उरलेले दोन दुवे घालावयाचे राहिले. ते जमशेदानी सागितल्यावर हा चरित्रग्रथ पुरा होईल

---

# प्रकरण : ३–समुद्रजीवनाची थोडी मधुर चव

'गरज ही शोधाची आई आहे' अशा अर्थाची एक इग्रजी म्हण आहे पण विचार केल्यावर असे दिसते की, या आईला एकच नव्हे तर अनेक अपत्ये आहेत उदाहरणार्थ, गरजेमुळेच प्रावीण्य येते ज्याप्रमाणे भूक भागवण्यासाठी अन्नाची आयात करणे इग्लडला भाग पडले आणि त्यामुळे दर्यावर्दीपणात इग्लिश लोक पुढे आले, ज्याप्रमाणे जपानी लोक गरजेमुळेच उत्तम दर्यावर्दी झाले, त्याचप्रमाणे आपल्या देशाच्या जवळसुद्धा आपल्या उबरठ्यापाशीच एक दर्यावर्दी जमात निर्माण झालेली आहे

हिदुस्थान खडाच्या दक्षिण द्वीपकल्पातून अरबी समुद्राच्या दिशेने जर दरवाज्याबाहेर पाऊल टाकले तर सिलोनच्या उबरठ्याबाहेर लागलीच पुढे मालदीव बेटे आहेत या मालदीव बेटातले लोक फार उत्तम खलाशी म्हणून नावाजलेले आहेत कारण त्याच्या बेटाचा सर्व व्यापार बाहेर जगाशी फक्त समुद्रमार्गाने चालू शकतो

मालदीव बेटे ही स्वतत्र असली आणि त्याचा स्वत चा राजा असला तरी परचक्रापासून सरक्षण करण्यासाठी मदत व्हावी व पूर्वीच्या समुद्रावर सत्ता गाजवणाऱ्या बलिष्ठ राष्ट्राशी सलोख्याचा सबध राहावा म्हणून मालदीव

बेटाच्या राजाने इंग्लंडच्या राजाचे मांडलिकत्व मान्य केले होते व त्याचा संबंध सिलोनच्या गव्हर्नराशी येत असे. मालदीव बेटाचा सिलोन देशाशी पुष्कळ व्यापार चालतो व दरवर्षी मालदीव बेटातून एक पडावाचा काफिला नजराणा घेऊन तो सिलोनच्या गव्हर्नराला पोचविण्यासाठी येत असे. तसेच हे पडाव लखदीव बेटाकडे व अरबी समुद्राच्या दोन्ही बाजूस असलेल्या हिंदुस्थान व आफ्रिका यांच्या किनारपट्टीवरच्या बंदरात येत जात असत.

इब्राहीम हा खरा मालदीव बेटाचा रहिवासी. त्याने आठवण असल्यापासून लहानपणीच समुद्र पाहिला. प्रथम समुद्राच्या किनाऱ्यावर हिंडणे, त्यानंतर समुद्रतीरच्या उथळ पाण्यात डुंबणे, असा त्याचा समुद्र–परिचय झाला. बारा वर्षांचा झाल्यापासून तो मच्छिमारी बोटीवर बाहेर जाऊ लागला आणि नंतर काही वर्षांनी मालदीव बेटाहून परदेशी जाणाऱ्या पडावांवर तो काम करू लागला. त्याच्या बापजाद्यांनी हाच दर्यावर्दीपणाचा धंदा केला असल्याने इब्राहीम अभिजात दर्यावर्दी झाला होता. सरावाने एखाद्या धंद्यात पारंगतता आली तरी ती कष्टसाध्य व थोडी क्लिष्ट असते, पण अभिजातपणामुळे आलेल्या पारंगततेत सुगमता, सहजिकता आणि सफाई जास्त उठून दिसते. इब्राहीमच्या बाबतीत तरी तेच झाले होते. तोहि मोठा पारंगत, अनुभवी आणि कुशल दर्यावर्दी झाला होता. त्याचा पडाव घेऊन तो अरबी समुद्रभर सफरी करी. पडाव मोठा असला तरी छोट्या आगबोटीच्या मानाने तुलनेने लहानच होता. इब्राहिमचे आपला छोटा पडाव हाकारीत अरबी समुद्रातून नेण्याचे कसब पाहिले की काही शतकापूर्वी छोट्या गलबतातून साती समुद्रातून जलपर्यटण करून जगप्रदक्षणा करणाऱ्या दर्यावर्द्यांची आठवण होणे अस्वाभाविक नव्हते. तेहि असेच दर्यावर्दी होते. त्यांची गलबते लाकडाची असली तरी त्यांची शरीरे पोलादी, छात्या निधड्या आणि मने वज्रासारखी असत. धाडशीपणाने ते सफरी करीत. इब्राहीममध्येहि दर्यावर्द्यांचे हे गुण होते.

इब्राहीमचा पडाव कोकणपट्टीच्या किनाऱ्याकिनाऱ्याने दक्षिणेकडे चालला होता. पहाटेची वेळ होती. दिवस चांगल्या मोसमाचे असल्याने आकाशातला तारान् तारा मोजून घ्यावा, अशी स्वच्छ हवा होती. मतलई वारा किनाऱ्यावरून हलके हलके वाहात होता. त्यामुळे इब्राहीम नाखव्याने आपला पडाव किनारपट्टीच्या दोनतीन मैल अंतरावरून चालविला होता. पडा-

वाच्या मागच्या बाजूस सुकाणाजवळ असलेल्या छोटया डेकवर एक बेठे छप्पर घातले होते. माऱ्या पडावावर हा गच्चीचा भाग तेवढा सर्वात सोयीस्कर आणि मोकळा होता या असल्या छोटया पडावावर फारशी जागा कुठली असायला ? त्याची सारी भिस्त दोन डोलकाठयावर व त्याच्यावर उभवल्या जाणाऱ्या दोन मोठया त्रिकोनी शिडावर पुढच्या मोठया त्रिकोनी शिडाचे एक टोक जिथे नाळेपाशी खेचले जाई तिथेच नाळेवर फडकणाऱ्या जिबशिडाचा आरंभ होई पडावाच्या पुढे पाण्यातून नाळ आकाशात खोचलेल्या कटारीसारखी तिरपी, उंच वर निघे तिच्या टोकाच्या आणखी वर जिब-बूम दहा बारा फूट पुढे येई जिबशिडाचे एक टोक जिब-बूमच्या टोकाला बांधलेले असे, तर दुसरे टोक पुढच्या डोलकाठीच्या माथ्यावर पडावाच्या मागच्या बाजूला मागची छोटी डोलकाठी नी त्यावर मागचे त्रिकोनी शीड असे पडाव सारी शिडे उभारून चालू लागला म्हणजे निळया आकाशावर पांढऱ्या शिडाच्या छोटया मोठया त्रिकोनाकृति शोभून दिसत

पडावाचा मधला सर्व भाग माल लादण्यास वखारीसारखा वापरीत फक्त मागच्या छपराखाली डेकच्याखाली जेमतेम वाकून उभे राहाता येईल असा लाकडी माळा बांधलेला असे हा लाकडी माळा, त्याच्यावरचे गच्चीवजा डेक, आणि त्यावरचे छप्पर या जागेत बोटीवरचे आठदहा लोक उठत बसत. एका माणसाला सुकाणाच्या दांड्यावर बसवून बाकीचे सारे खलाशी छपराखालच्या डेकवर झापी गेलेले होते सुकाणाशी बसलेला माणूस उकिडवा खाली बसून अर्धवट पेंगत होता त्याने एका धोतरामध्ये आपले डोके आणि शरीर गुरफटून घेतले होते मोठया कष्टाने तो अधून मधून जेमतेम डोळे उघडी व आजूबाजूस समुद्रावर नजर टाकी पण लागलीच पहाटेच्या समुद्रावरच्या गार वाऱ्यात व खोल शांततेत झोपेने त्याच्या पापण्या जड होत आणि त्याला न कळत तो चार डुलक्या घेई

पडावावरची जलपर्यटने आगबोटीपेक्षा फार निराळी बोलून चालून आगबोट व्यापारी कंपनीची असल्यामुळे बोटीच्या कप्तानाला लौकर लौकर सफरी करून जास्तीत जास्त किफायत करवून देणे भाग पडे आगबोटीचा कप्तान झाला तरी त्याला कंपनीच्या किनाऱ्यावरच्या अधिकारीवर्गाकडून पुष्कळ सासुरवास होतो. सफरीला वेळ किती लागला, कसा लागला, का लागला,

किती कोळसा खर्च केलात, इत्यादि अनेक गोष्टींची नोंद करून त्याला कपनीची खात्री करून द्यावी लागते की त्याने कमीत कमी खर्च करून कपनीला जास्तीत जास्त नफा मिळवून दिला आहे त्याशिवाय आगबोटीला अनेक शास्त्रीय नौकानयनाची साधने बसवलेली असल्यामुळे जास्त वक्तशीर आणि हुकमी पर्यटण करावे लागते वाफेच्या इजिनाने फिरणाऱ्या पख्यावर आगबोट चालल्याने हवेची फारशी दखलगिरी कप्तानाला घ्यावी लागत नसे

पण पडावाची तशी गोष्ट नव्हे एकतर पडाव आकाराने फारच छोटा आणि त्याची मालकी सर्वस्वी त्याचा नाखवा इब्राहीम याच्याकडे तेव्हा इब्राहीमला जाब विचारणारा अल्लाखेरीज दुसरा कोणीच नसे इब्राहिमच्या मनाला वाटेल त्याप्रमाणे तो आपला पडाव हाकारी कुठे जास्त थाबावेसे वाटले तर तो जास्त थाबे, एखाद्या ठिकाणाहून लवकर निघण्याची मर्जी लागली तर तो लवकर निघे बदरामध्ये मिळणारा माल कोणता घ्यावा, त्याची किमत किती येईल, पुढच्या कुठल्या बदरी त्याला जास्त किमत येऊ शकेल व त्याला स्वत ला जास्तीत जास्त किफायतशीर पडेल या सर्व गोष्टीचे आडाखे तो मनातल्या मनात बाधी आणि निर्णय घेई मोठी व्यापारी कपनी असली म्हणजे त्या व्यवस्थेचे फायद्याबरोबर तोटेहि येतात कपनीची अनेक नोकर माणसे असल्याने मालक अथवा व्यवस्थापक केवढाहि कुशल असला तरी कपनीचे काम सर्व नोकर माणसाच्या सर्वसाधारण कामावर आणि कुवतीवर ठरते, पण इब्राहीमच्या बाबतीत तसा काही प्रकार नव्हता बोर्ड ऑफ डायरेक्टर्सपासून ते चपराशापर्यंत सारी सस्था त्याच्याच एकट्याच्या डोक्यात सामावलेली असे भागीदार सारा तोच आणि मॅनेजिंग एजटहि तोच कारकून नाही, पत्रव्यवहार नाही, फायली नाहीत की महत्त्वाची कागदपत्रे ठेवण्याची पोलादी कपाटे नाहीत. इब्राहीमचा सर्व व्यवहार बोलण्यावरच चाले आणि उत्तम स्मरणशक्तीच्या योगाने त्याच्या डोक्यात त्याला लागणारी सारी माहिती व्यवस्थेने ठेवलेली असे त्याच्या जाकिटाच्या अगासरशी घट्ट बसणाऱ्या आतल्या दोन खिशात त्याच्या गलबताच्या नोंदीचे दाखले व काही फार जरूरीचे कागदपत्र राहात तर त्याच्या कमरेच्या रुद आणि खोल कशात त्याची सारी सपत्ति कसलेली असे

पडावावर कोणत्याहि तऱ्हेची मोजदाद करण्याची वा नौकानयन करण्या-

साठी लागणारी साधने नव्हती पडावावर ना घड्याळ ना सेक्स्टट (ताऱ्याचे वेध घेण्याचे यत्र ) ना दुर्बीण कालमापन ही गोष्ट अर्थशून्य होती. ज्याप्रमाणे इब्राहीमच्या भोवतालचा समुद्र अफाट पसरलेला होता व त्यात फुटाचे मापच नव्हते आणि चार मैल इकडे काय वा तिकडे काय काही फरक नव्हता, त्याप्रमाणे कालाचाहि अथाग सागर त्याला सचाराला मिळत होता. कजूषपणाने अथवा विनाकारण जिवाचा आटापिटा करून हातातल्या घड्याळाकडे पाहून मिनिटामिनिटाने कार्यक्रम आखणे त्याला जाचक झाले असते श्रीमत माणूस रुपये आण्याची कधी मोजदाद करतो का ? इब्राहीमच्याहि खिजगणतीत तास नसत रात्रदिवस, मध्यान्हीपूर्वीचा दिवस, दोन प्रहर आणि सायकाळ अशा स्थूल भागामध्ये दिवस कामासाठी वाटता येई

सूर्याचे, ताऱ्याचे वा चद्राचे वेध घ्यावयाचे अशा शास्त्रीय खोल पाण्यात शिरणे, त्याचा पडाव खोल पाण्यावर हाकारण्यासाठी, त्याला कधी जरूर वाटले नाही नाही म्हणायला उत्तरध्रुवाचा तारा आणि ज्याला आपण सप्तर्षि म्हणतो ते एक नक्षत्र त्याच्या माहितीचे होते उत्तर गोलार्धात असताना तेवढ्याने त्याचे रात्री काम भागे, तर विषुववृत्ताच्या दक्षिणेस असताना त्याच्या माहितीतील 'सदर्न क्रॉस' या तारकासमूहाचा त्याला उपयोग होई रात्रींच्या वेळी दक्षिण आणि उत्तर या दिशा त्याला त्याच्यामुळे कळत, तर दिवसा सूर्यावरून पूर्व, पश्चिम दिशा ध्यानात येत एवढ्या चार मुख्य दिशा, आणि त्याच्या जुन्यापुराण्या लहरी, होकायत्राने दाखविलेल्या थोड्या दिशा, एवढ्यावर त्याचे काम सहज भागत असे पण इब्राहिमची खरी भिस्त कशावर असली तर त्याच्या किनारपट्टीच्या तोडओळखीवर. मालदीव बेटापासून निघाल्यावर कोणकोणत्या अतरावर कोणत्या क्रमाने बदरे, भूशिरे, बेटे, खाड्या येत हे जर तो सागू लागला तर सिलोनपासून मलबार किनाऱ्यावरून कोकणपट्टीने काठेवाड, सिध, मकरान, इराणचे आखात, अरबस्तान, आफ्रिका असे ओळीने वर्णन करणे त्याला शक्य होते. किनारपट्टीची खडान् खडा माहिती त्याला होती यावरून तुमच्या ध्यानात येईल की इब्राहिमच्या पडावावर तो नुसता मालकच नव्हे तर त्या पडावाचा खरा प्राण होता त्याच्या बुद्धीवर सारा पडाव चाले त्यामुळे त्याच्या पडावावर इब्राहिमची अनियत्रित व अमर्याद सत्ता चाले म्हणूनच वर म्हटले.

आहे की इब्राहीम मानीत असे फक्त अल्लाला मग त्याला वादळाची, प्रतिकूल वाऱ्याची, खवळलेल्या समुद्राची भीति वाटत नसे कारण बोलूनचालून या सर्व गोष्टी अल्लाच्या मर्जीवर आहेत असा त्याचा सरळ, माधा पण पक्का विश्वास होता आणि जोपर्यंत दिवसातून पाच वेळा तो न चुकता नमाज पढे व काफिर लोकाच्याशी सबध न ठेवी तोपर्यंत अल्लाची आपल्यावर गैरमर्जी होण्याचे त्याला काही कारण दिसत नसे अल्लाला खुष ठेवल्यावर मग तो कसाहि वागला तर त्यात काय बिघडले ?

सुकाणाशी बसलेला खलाशी पेगतापेगता त्याला काही वेळ झोप लागली त्याचा सुकाणाच्या दाड्यावरचा हात झोपेत लटका पडला व सुकाण एका बाजूस झुकून, पडाव एका बाजूस वळू लागला पडावाची गति फार कमी असल्याने वारा जर प्रतिकूल नसला, तर तो चालवायला फारशी काळजी लागत नसे. गाडीवान नाही का रस्त्याने जाताना गाडीवर रात्रीचे झोपत ? रस्ता सरळ असला तर बैल सरावाने आपल्या आपण चालत राहातात वास्तविक आत्तासारख्या वाऱ्यात पडाव सहज सरळ दिशेने चालणे शक्य होते पण का कुणास ठाऊक, सुकाण थोडेसे एका बाजूस झुकू लागले, व सुकाणी खलाशी झोपी गेल्याने पडाव वळू लागला ते ध्यानातहि आले नाही

पडाव हलके वळता वळता इतका वळला की, वारा डाव्या बाजूने होता तो नाळेसमोर येऊन शेवटी उजव्या बाजूस झुकला वारा नाळेसमोर आल्यानतर रिकामी शिडे प्रथम सैल झाली, आणि उजव्या बाजूस आल्यानतर, शिडाच्यावर जोर आल्यावर, शिडाचे ताण आता पूर्वीच्या उलट झाल्याने एकाएकी डोलकाठीला व पडावाला हिसका बसला शिडाचा थाट बदलून उलटा झाला त्यामुळे दोऱ्याचे ताण करकरले, डोलकाठ्या कुचकुचल्या व पडाव उलट्या बाजूस झुकल्यामुळे डेक्चा उतारहि बदलला गाढ झोपेतूनहि इब्राहीम चटकन् जागा झाला त्याने लावून दिलेल्या जहाजाच्या दिशेत अथवा शिडाच्या व्यवस्थेत फरक झाला तर तो चटकन् ध्यानात येण्याची इब्राहिमची मोठी विचित्र पण अचूक शक्ति होती. इब्राहीम उठला व सुकाणाकडे जाऊन त्याने अगोदर सुकाणाचा दाडा हाती घेतला आणि मग लाथेने झोपलेल्या खलाशाला ठोकर मारीत त्याने इरसाल शिवी देत

म्हटले, " अबे काफर, सुकाणू धरायला तुझा बाप आला होता की काय, म्हणून तू असा गाफीलपणान झोपी गेलास ? "

हाताने पडाव हलके वळवीत त्याने पूर्वमार्गावर आणला शिडे पहिल्या-सारखी झाल्यावर व वारा पूर्वीप्रमाणे डाव्या बाजूवर घेतल्यावर त्याने शिडाचे ताणे हवे तसे नीट खेचून पुन बाधून घेतले पण हे सर्व करवून घेईपर्यंत तोडाने त्याच्या जिभेचा असा पट्टा चालला होता की जरी हा चूक केलेला खलाशी मोठा डोकेबाज नव्हता तरी त्याच्याहि मद्दड डोक्यात आपण केवढी मोठी चूक केली याचा लख्ख प्रकाश पडला

जरी इब्राहिमने खलाशाला शिव्याची लाखोली मोजली आणि सारी चूक केवळ त्याचीच होती असे बोलून दाखविले, तरी सुकाणाच्या दाड्याला हात घातल्याबरोबर इब्राहिमच्या लक्षात आले की सुकाणू एका बाजूस जड होऊन झुकू लागले आहे सुकाणामध्ये बाहेरच्या बाजूस किनाऱ्यावरून वहात आलेल्या गवताची पेंढी, तुटके जाळे वा असेच काहीतरी अडकल्याने ते एका बाजूस जात आहे असे त्याला वाटले त्याने डोकावून खाली पाहिले पण स्वच्छ दिसण्याइतका अजून उजेड नव्हता इब्राहिमने खड्या आवाजात आरोळी मारून निजलेल्या सगळ्या खलाशाना मागे बोलाविले नाही तरी पहाट झालीच होती इब्राहिमची पडावावर अशी शिस्त असे की त्याने बोला-विल्यावर खलाशी असेल तसा धावत येऊन समोर उभा राहिला पाहिजे खलाशी झोपलेले असले तरी त्यानीहि खडबडून जागे व्हावे व क्षणात समोर यावे असा त्याचा कटाक्ष असे आणि तो आपण दिलेला हुकूम ऐकू आला नाही अशी सबब कुणालाहि सागता येऊ नये अशा तऱ्हेने भरल्या छातीने, एका दमात असा आरोळी ठोकी की झोपलेलाच खलाशी काय पण गर्तेत गाडलेला खलाशोसुद्धा उठून समोर उभा राहिला असता

इब्राहिमच्या सागण्याप्रमाणे दोन खलाशानी एक दोर बोटीच्या सुकाणा-वरून मागे बाहेर सोडला त्यावरून खाली उतरून सुकाणूत अडकलेली वस्तु काढून टाकण्यास एक खलाशी गेला पण जितक्या लवकर तो खाली उत-रला, तितक्याच लवकर किबहुना जास्तच गर्दीने तो पुन्हा दोरावर चढून आला आणि म्हणाला, " पेंढीबिढी नाही, भूत लोबकाळत आहे सुकाणूला ! "

" भूत असल तर त्यालाहि काढून समुद्रात फेकून दे. मी सागितलेल काम

पुर केल्याशिवाय तू परत वर कसा चढतोस ?" असे म्हणत इब्राहिमने उजवा पाय सुकाणावरून बाहेर काढून, वर येणाऱ्या खलाशाच्या डोक्यावर ठेवून त्याला पुन्हा खाली दाबले नाखुषीने पण नाइलाजाने खलाशी पुन खाली उतरला

परतु या वेळी त्याने खालून खूप जोराने किचाळी फोडली "अरे धावा धावा ! मला वाचवा ! माझा पाय धरून हे भूत मला पाण्यात ओढीत आहे " त्याच्या किचाळचा ऐकल्यावर इब्राहिमने दुसऱ्या दोघाना उतरून पाहाण्यास सागितले " भूत कसल, " तो म्हणाला, " असेल एखादा मोठा मासा त्याचा पाय चावीत जा, इस्माइल, हातातल्या मार्लिन स्पाइकन (लोखडी अणकुचिदार छोटचा पहारीने) तो मासा हाकल आणि त्या बेवकूफ माणसाला वर आण "

इस्माइल हा बाकीच्या खलाशात जास्त धीट आणि हुशार होता इस्माइलने खाली गेल्यावर नीट पाहून, ओरडून सागितले, " भूत नाही नि मासा नाही, पण एक माणूस सुकाणाला लटकत तरगत आहे. त्यानच याचा पाय धरला आहे पण हा माणूस थकून बेशुद्ध व्हायला टेकला आहे. दोर जरा सैल सोडा म्हणजे त्याच्या कमरेभोवती आणि खाद्यावरून बाधतो म्हणजे त्याला तुम्हाला वर हबेसता येईल. "

दोरी बाधून झाल्यावर त्या माणसाला बाकीच्यानी वर खेचला. त्या माणसाची शुद्धि जवळ जवळ जाण्यापूर्वी सुकाणावर आणि नतर पहिल्या खलाशाच्या पायावर धरलेली पकड अशी घट्ट होती की ती उकलायला इस्माइलला खूप प्रयास पडले डेक्वर उचलून घेतल्यावर पाहातात तो तो माणूस नुसता पचा गुडाळलेला होता. त्याच्या अगात इतर काही कपडे नसल्याने तो कोण असावा याचा कयास चटकन करणे शक्य नव्हते. अगावर काही जागी खरचटून, तर पोटरीवर व दडावर बहुतेक माशाने मासाचा लचका तोडण्यासाठी चावल्याने जखम होऊन रक्त वहात होते त्याची दाढी व मिशा वाढल्या होत्या, केस अस्ताव्यस्त वाढले होते, आणि ओले झाल्यामुळे चेहऱ्यावर चिकटून त्याच्यावरून पाण्याचे थेब ठिपकत होते

सुकाण दुसऱ्यावर सोपवून इब्राहिमने त्याच्या खालच्या लाकडी पेटीत असलेले काही मलम काढून या माणसाच्या जखमावर लावले, त्या बाधल्या

आणि डेक्वर एका बाजूला त्याला पडू दिले इस्माइलला सागून एक जुने काबळे त्याने त्याच्या अगावर पाघरूण घातले, आणि सारेजण आपापल्या दिनक्रमाला लागले

उन्ह पडले, आणि चागले तापू लागले हवेतला गारठा निघून गेला हवा लख्ख असल्याने थडीहि नव्हती व उष्माहि नव्हता मोकळ्या लख्ख उन्हात कितीहि बसले तरी त्याचा ताप वाटत नव्हता उलट त्या मोकळ्या उन्हात नाहून निघाल्याने जिवाला जास्त आनदच वाटत होता समुद्रावरच्या लख्ख हवेत नि उन्हात अशी आरोग्यवर्धक जादू असते की, माणसाचे गात्र नि गात्र त्यामुळे ताजेतवाने आणि उल्हसित होऊन जाते. काबळ्याखाली पडलेल्या मोधळ्यात आता चेतना दिसू लागली तो कुशीवर वळला आणि त्याच्या अगावरचे काबळे बाजूस पडले त्याचे सारे शरीर उन्हात शेकून निघत होते तो इतका गाढ झोपलेला होता की सूर्य मध्यान्हीवर आला व पश्चिम आकाशात खाली उतरू लागला, आणि शेवटी मावळला, तरी त्याला जाग आली नाही त्याला कोणी उठविलेहि नाही ती रात्रहि तशीच गेली डेक्वर तो केव्हाचा निजला होता त्याचे शरीर अस्ताव्यस्त पसरले होते लाकडाच्या डेकवर, मोकळ्या हवेत, काही न घेता आकाशाखाली निजणे फार चागले असते त्याने शरिराला विश्राति मिळते समुद्रावरच्या मोकळ्या प्राणवायूने श्वासाश्वासागणिक त्याच्या रक्तातून नवजीवन येत होते आणि थकल्या भागलेल्या त्याच्या शरिराची गात्रे ताजीतवानी होत होती गाढ झोपेमध्ये त्याचे श्रमलेले मन जगाच्या उपाधीपासून दूर अलिप्त झाले होते त्याचा आणि शरिराचा जणू काही सबधच नव्हता तो चोवीस पचवीस तासाच्या वर झोपला होता दुसऱ्या दिवशी पुन्हा सूर्याने डोके वर काढले तेव्हा सूर्याच्या नजरेला हा माणूस कालच्याच जागी निजलेला आढळला सूर्य हसला आणि खळखळणाऱ्या लाटानी खिदळून त्याला साथ दिली, 'आमच्या मनात असले तर आम्ही एखाद्याला तारू, आणि मनात नसले तर त्याला मारू. आम्ही पृथ्वीची पचमहाभूते, आमच्याच मर्जीने आणि सयोगाने हे प्राणिमात्र होतात आणि आमच्याच मर्जीने आणि फारकतीने त्याचा अत होऊन ते पुनः आमच्यात मिसळून जातात. आम्हीच या प्राणिमात्राचे जीवन, आणि आम्हीच त्याचे अतक.' असा काही त्या गाण्याचा अर्थ होता, आणि हे गाणे जेथे जेथे

सृष्टीशी एकतान होता येते, तेथे तेथे समजस माणसाला ऐकू येऊ शकते या सृष्टिगानाचा सूर खोल आणि गभीर असतो ते हृदयाचा ठाव घेते त्या गाण्याची उठावणी मोठी आकर्षक वाटली तरी त्याचा थाट दु खपूर्ण वाटतो पण त्याने निर्माण होणारा रस शेवटी आनदपूर्णच ठरतो

इस्माइलला इब्राहीम म्हणाला, "जा आणि त्या नव्या माणसाच्या जखमाच्या पट्टया सोडून पाहा, तोवर मी येतो " इस्माइल गेला तो तो माणूस डोळे उघडून आजूबाजूला पाहात पडला होता इस्माइलने उर्दूमिश्रित हिंदुस्तानी भाषेत त्याला विचारले, "काय रे, तुझ नाव काय ? कुठला तू ? तुझी होडी बुडली का काय ? "

पण त्या माणसाने तोडातून चकार शब्द काढला नाही तो इस्माइलकडे सथ नजरेने पाहात राहिला त्यावरून आपण बोललो त्याचा अर्थ त्याला कळतो की नाही, याचा बोध इस्माइलला होईना त्याच्या सथ अर्थशून्य पाहाण्यात वेडाची तर झाक नाही, असे इस्माइलला वाटले पण त्याबद्दल जास्त विचक्षणा न करता इस्माइलने त्या नव्या माणसाच्या जखमा उघडून पाहिल्या जखमामध्ये कोणत्याहि तऱ्हेचा चिडकेपणा आला नव्हता, उलट जखमावर नवे मास वाढू लागून त्या भराभर भरून येणार अशा स्वच्छ दिसत होत्या त्या तो परत बाधणार इतक्यातच इब्राहीम तेथे पुन आला त्याने जखमावर नजर टाकली आणि तो म्हणाला, "ठीक आहे या जखमा भरायला काहीच वेळ लागणार नाही हा माणूस दिसायला अगान फाटका दिसत असला तरी चागल्या ठणठणीत तब्बेतीचा दिसतो " त्याच्या छातीला हात लावून पाहात इब्राहीम पुढे म्हणाला, "याला तापबीप काही आलेला नाही काहीं दिवस विश्राति मिळाली की आपोआप ठीक होईल काय रे तुझ नाव ? "

"मी तेच त्याला विचारत होतो " इस्माइल म्हणाला, "पण त्याला माझ्या बोलण्याचा बोधच होत नाही अस दिसत दुसऱ्या एखाद्या भाषेत त्याच्याशी बोलून पाहा "

घारीसारख्या शोधक नजरेने त्याकडे थोडा वेळ निरखून पाहून इब्राहीम म्हणाला, " काही गर्दी नाही पडू देत त्याला त्याच्याजवळ पाणी ठेव एका डबड्यात म्हणजे झाल त्याला भाषा येत असली व धसक्यान वाचा बसली असली तर आपोआप पुढ तो बोलू लागेल भाषा येत नसली तरी काही.

बिघडत नाही तितकीच त्याची वटवट कमी होईल दिसायला जरी मर-तुकडा दिसत असला तरी कामाला हलके हलके येईल उपयोगी आणि नसलाच उपयोगी होत तर त्याची विल्हेवाट लावायला काय उशीर ? " शभर रुपयाचा खुर्दा, थैली एकदम उलटी केल्यामुळे, फरशीवर खणखणून पडावा तसा मोठयादा खळखळत इब्राहीम आपल्याच विनोदाने हसला

त्या माणसाने जरी चेहऱ्यावर काही दाखवले नाही तरी त्याला बोध होत नव्हता असे नाही पडल्या पडल्या सगळीकडे पाहात तो सर्व वस्तु-स्थितीचे पूर्ण आकलन करून घेत होता तो पडाव, त्यावरची खलाशी मडळी, त्याचा कार्यक्रम, हे सर्व तो निरखीत होता आणि त्याचे चाललेले सवाद लक्षपूर्वक ऐकत होता जवळ आणून ठेवलेले पाणी तो प्यायला तोहि सबध दिवस त्याने तसाच पडून घालवला दुसरे दिवशी सकाळी मात्र तो उठून बसला तेव्हा इस्माइल आणि दुसरे दोघे खलाशी त्याच्याशी पुन बोलू लागले आज त्याने पूर्वीसारखे गप्प न बसता उत्तर दिले पण ते उत्तर कुठल्याच भाषेमध्ये नव्हते हातवारे करत खुणानी व तोड उघडून लहान-मोठा चीत्कार केल्यासारख्या आवाजानी तो आपल्या म्हणण्याचा अर्थ समजा-वण्याचा प्रयत्न करत होता

" तरीच, तरीच, हा लेकाचा मुका आहे. म्हणूनच काल मी प्रश्न विचारल्या-वर बोलत नव्हता पण निदान याला ऐकू तरी येत आहे नाहीतर मुकेपणा आणि बहिरेपणा ही व्यगे जोडीन राहतात "

मुक्याने किचाळत पोटावर जोरजोराने चापटचा मारत व तोडावर जुळव-लेली बोटे लावत त्याने आपल्याला भयकर भूक लागली असल्याचे दर्शवले इस्माइल म्हणाला, " थाब जरा, आमचा नमाज पढून झाल्यावर देईन तुला खायला अल्लाची आठवण केल्याशिवाय काफीर लोकाप्रमाण आम्ही तोडात अन्न घालत नाही "

त्यानतर त्या खलाशानी दोरी बाधलेल्या एका जुन्या डबडयाने पडावा-बाहेरून समुद्राचे पाणी शेंदून काढले प्रथम त्यानी ओणवे बसून एक एक पाऊल धुतले त्यानतर दोन्ही हात कोपरापर्यंत धुतले. ओला हात एकएकदा दोन्ही गालावरून फिरविला, एकदा उघडया पजाने हनुवटीखालून दाढी उचलून ती कुरवाळली, बोटाने दाढीमिशाचे केस विचरल्यासारखे केले,

दोन्ही हाताच्या अगठ्यानी दोन्ही कानामागे एकदा साफ केले आणि पश्चिमेकडे तोड करून खुरमाडी घालून डोक्याला छोटया टोप्या घालून ते नमाज पढू लागले

मागून इतक्यात इब्राहीम आला त्यानेहि एक रेशमी पाढरा रुमाल डोक्यावर गाठ मारून बाधला, एक जुनी चटई डेकवर हातरली आणि त्या दुसऱ्या खलाशाच्या शेजारी तोहि नमाज पढू लागला

नमाज पढताना अल्लापुढे आपली प्रतिष्ठा विसरून सर्वानी एकाच दर्जाने येणे हो त्याची सवय उठून दिसत होती. जगाला विसरून व दिनक्रम काही वेळ बाजूस सारून अगदी अनन्यभावाने त्याना नमाज पढताना पाहून वाटले असते की, याची धर्मभावना जितकी तिखट तितकीच ती परधर्मीयाला असहिष्णु होणे साहजिक सर्व धर्मांची शिकवण सहिष्णुतेने वागावे, अशीच वास्तविक असावयाची पण नेहमी अनुभव तर असा येतो की माणूस आपला धर्म जितका कसोशीने आणि कर्मठपणाने पाळतो तितका, आपण पुण्यवान् ईश्वराचे जास्त लाडके आणि इतरापेक्षा जास्त शरीफ श्रेष्ठ असा, दभ त्याच्या मनात माजू लागतो आणि या दभाच्या पोटीच त्याच्यासारखे न वागतील त्याना धर्मलड, हीन व तुच्छ लेखून, त्याना अत्यत असहिष्णुतेने वागवण्याची वृत्ती बळावते मुका माणूस बसल्याबसल्या न्याहाळून पाहात होता. त्याच्या लक्षात ही गोष्ट आली असावी तो थोडासा तोडातल्या तोडात हसला आणि त्याने काही निश्चय केला असावा.

हाताच्या व पायाच्या बाधलेल्या जखमामुळे त्याला उठून उभे राहाणे अजून शक्य नव्हते पण तो डेकवरून फरडत फरडत जेथे पलिकडे इब्राहीम आणि त्याचे खलाशी नमाज पढत बसले होते तेथे आला नमाज पढणारे खलाशी खुरमाड्या घालून दोन्ही हात उघडे माड्यासरपट ठेवून, मान एका खाद्यावर वाकडी धरून तोडाने प्रार्थना पुटपुटत होते मधेच ते शरीर आणि डोके माड्यासरपट नमवून वाकत पुन पहिल्यासारखे बसत मग ते उठून उभे राहात, हात गुढग्यावर टेकून थोडा वेळ पुढे वाकून ओणवे होत पुनः सरळ होत, पुन. खाली बसत.

मुका तोडाने प्रार्थना म्हणणे तर शक्यच नव्हते, पण तो तोडाची उघडझाप करूं लागला आणि प्रार्थनेची कवाईत त्याच्या बाधलेल्या जखमानीं

करता येईल तेवढी करू लागला बाकीच्या खलाशानी व इब्राहीमने जेव्हा या मुक्याला कष्टाने, शरीर चटकन वाकत नसताना व हातपाय नीट टेकता येत नसतानाहि नमाज पढण्याचा प्रयत्न करताना पाहिले त्या वेळी त्या सर्वांनी समाधान उघड उघड दाखविले बाकी काही का असेना हा माणूस निदान मुसलमान तरी आहे, काफीर नाही, तेवढ्या एका गोष्टीने खलाशाच्या मनात मुक्याबद्दल आपलेपणाची एक भावना उठली तो मुसलमान नसता तर त्याच्याबद्दल जो दुजाभाव, तेढ आणि तिरस्कार त्याच्या मनात सहजासहजी निर्माण झाला असता तो आता टळला त्या पडावावरच्या आयुष्यात, त्या छोटयाशा जगात सामील होण्याचा 'पासपोर्ट'च मुक्याला मिळाला ! प्रार्थना सपल्यावर इस्माइलने मुक्याला खावयास आणून देण्यास सैपाकाचे काम करणाऱ्या खलाशास सागितले आणलेले अन्न अगदी साधे होते. कोंड्यासकट असलेल्या जाड कणिकेची मोठी चपाती—एकच चपाती पण परातीएवढ्या आकाराची—शार्क माशाच्या जाड वाळवलेल्या मासाचे शेकून भाजलेले दोन तुकडे आणि तीन चार खजुराच्या बिया एवढेच पदार्थ जेवायला होते

मुक्याला एवढी कडकडून भूक लागली होती की, तो पडावाच्या गनवेलला (डेकवर येणाऱ्या कडेला) टेकून चपाती पुढ्यात घेऊन आनदाने बसला माशाचे तुकडे आणि खजुराच्या बिया चपातीवरच ठेवलेल्या होत्या. त्यासाठीं थाळी वगैरे काहीच नव्हती चपातीचे तुकडे मोडून सावकाश सावकाश चावीत मोठ्या चवीने तो कितीक वेळ खात बसला होता. पण त्याला दुसरे काम करावयाची गर्दी नसल्याने कितीहि वेळ लागला तरी हरकत नव्हती. जेवण झाल्यावर डबडेभर पाणी तो गटागटा प्यायला माणसाच्या मूळ गरजा वास्तविक किती थोड्या असतात आणि त्यातलीहि सर्वांत पहिली गरज म्हणजे पोटाला अन्न !

पुढच्या चार दिवसातच मुका उत्तम हिंडू फिरू लागला. तो मोठ्या समजस आणि चौकस बुद्धीने खलाशी काम करताना पाही आणि कुणी सागितलेले नसताहि त्याना त्याचे काम करू लागे. त्याला बोलता आले नाही तरी तो अस्ताव्यस्त हातवारे करीत, शरीर वेगाडीत, तोडाने किंचाळत, लहानमोठे आवाज काढीत बोलण्याचा प्रयत्न करी. हे पाहून सारे खलाशी खद्खदून हसत. हा मुका ही त्याना एक मोठी चालतीबोलती करमणूक झाली

होती पडावावर आल्यापासूनच्या थोड्या दिवसात तो सर्वांच्यात इतका मिसळून गेला होता की तो ज्या तऱ्हेने पडावावर आला त्यातील विचित्रपणा कुणाला आता वाटेनासा झाला. आपल्यातील एक असा ते त्याला मानू लागले

दिवस चागल्या हवेचे असल्यामुळे पडावावर काम फार नव्हते खलाशी मडळ आपले काम करून उरलेला बाकीचा सारा वेळ स्वस्थ बसून घालवी वाऱ्याला अनुकूल अशी शिडे पुढे मागे ओढावी, सुकाणू धरावे, दिवसातून दोन वेळ वर सागितल्या तऱ्हेचे अगदी साधे अन्न खावे एवढीच सध्या दिनक्रमामध्ये मुख्य कामे होती दुसऱ्या कुठल्या दोराची तोडे मिळवायची, मासे पकडण्याच्या तुटलेल्या जाळ्याची दुरुस्ती करावयाची, फाटक्या शिडाना टाके मारावयाचे ही ठेवणीची कामे वेळ सापडल तसतशी सवडीने ते उरकीत पण त्या सर्वांमध्ये हसत खेळत चकाटचा पिटण्यास त्याना भरपूर वाव मिळे

जमिनीवरच्यासारखी जिवाची निष्कारण धावपळ त्याना करावी लागत नव्हती निष्क्रीयता उपभोगायला त्याना हवी तेवढी सवड होती आपले सध्याचे जीवन इतके निष्कारण धामधुमीचे व धावपळीचे झाले आहे की माणसाला फुरसत कशी ती सापडतच नाही. माणूस सकाळपासून तो सध्याकाळपर्यंत राबत राहातो घड्याळाचा काटा एखाद्या वाघासारखा माणसाचा पाठलाग करीत असल्याने ही धावपळ कशाकरता, याचाच उलगडा बहुतेक त्याला नसतो

'हौशी मोटारवाला' कोण ? याचे एका कुत्सित माणसाने वर्णन केले होते जो पागल एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी मोटारीने अत्यत वेगात जाऊन पोहोचतो की, पोहोचल्यानतर वाचविलेल्या वेळात आपण इतक्या लवकर कशाकरतां आलो हा कूट प्रश्न सोडवायला त्याला सवड मिळते तो मोटारवाला

माणसाचीहि सध्या धादल अशीच चालते त्याला क्षणाचीहि कधी उसत मिळत नाही स्वस्थ बसायला. आणि शभर वर्षे पुरवून वापरण्याच्या आयुष्याचा चाळीस पन्नास वर्षांतच तो चट्टामट्टा करून टाकतो. वर म्हटलेल्या मोटारवाल्याप्रमाणें त्याच्या मृत्यूनतर त्याच्या लक्षात बहुतेक येत असेल की

एवढी गर्दी करून आपण मिळविले तरी काय ? सहस्त्रावधि वर्षे वाहणाऱ्या गंगा नदीच्या तीरावर राहाणारा भाविक, तामलीमध्ये गंगाजळ भरून ठेवू लागला तर ते कृत्य जितके हास्यास्पद होईल, तितकेच हेहि धादलीचे वर्तन हास्यास्पद नाही का ? काल हा अनादि अनंत आहे त्याच्या काठावर बसून मिनिटे आणि सेकंद मोजणे अर्थशून्यच गंगातटाकी आचमने कोणी पळी-पळीने करीत नाही

नेपोलियन म्हणे दिवसाचे अठरा एकोणीस तास काम करी, आणि कामाच्या धादलीत केव्हातरी दहा पंधरा मिनिटे हुकमी झोप घेई गरीब बिचारा ! रोज नऊ तास जरी तो झोपता, तरी दूरदृष्टीने विचार केल्या-वर, त्यात काही बिघडले का असते ? जिवाचा एवढा आटापिटा करून त्याने शेवटी मिळविले काय ? एवढ्या अनंत कालौघात शेवटी तोहि गडप होऊन गेला बरे, युरोपातील सर्व राष्ट्रांच्या आवळ्याची एकच मोट बांधून स्वतःच्या हाती ठेवण्याचे त्याचे प्रयत्नहि निष्फळ झाले त्याच्या कामाच्या रगाड्याचा व धादलीचा उपयोग ना त्याला ना लोकांना

मुक्याच्या मनात त्या खलाशी मंडळीचे संथ आयुष्य पाहून असेच विचार येत होते त्या स्वच्छंद मोकळ्या वातावरणात राहू लागल्यापासून, नवी दृष्टि लाभावी त्याप्रमाणे मुक्याला झाले होते. त्याच्या भोवतालच्या सर्वच गोष्टी प्रचंड होत्या भोवतालचा समुद्र केवढा अमर्याद, त्यावर जागेची टंचाई नाही त्यातले निळेभोर पाणी अमर्याद, त्याच्यात दुर्भिक्ष नाही वर आकाश अनंत, त्याचा अंत दिसायला डोळ्याची शक्तीच अपुरी त्र्याण्णव दशलक्ष मैल म्हणे सूर्य आहे पृथ्वीपासून, आणि सर्वात जवळचा तारा इतका दूर की उजेडाच्या प्रचंड गतीने विचार करता, माणसाच्या जन्मक्षणी त्या ताऱ्यावरून निघणारा किरण त्या माणसाच्या दृष्टीस पडण्याच्या क्षणापर्यंत त्या माणसाचे आयुष्य त्र्याहत्तर वर्षांचे झालेले असते जेथे गणितज्ञाचे गणित लटके पडते, एवढी ही अनंत जागा आणि या सर्वांची बरोबरी करणारे दुसरे मोठे तत्त्व म्हणजे काल ! तुतीच्या छोट्या पानावर बसून पान खाणारी अळी, अंड्यातून बाहेर आल्यापासून स्वतःला रेशमी कोशात गुरफटून घेई-पर्यंत स्वतःला कृतकृत्य झाली असे मानते, आणि त्यानंतर त्यापुढच्या अव-स्थेत आणखी एकदा फुलपाखराच्या रूपाने क्षणकाल फुलावरून तरंगत एखाद्या

पक्ष्याच्या भक्ष्यस्थानी पडून नाहीशी होते त्या अळीला तिचे आयुष्य मोठ्या महत्त्वाचे वाटत असेल इतिहासाच्या भाषेत म्हणावयाचे झाले तर 'सुवर्णाक्षरात लिहिण्यासारखा काल' पण जो माणूस अळीचे आयुष्य क्षुद्र मानतो त्याचे तरी आयुष्य मोठ्या वृक्षाच्या आयुष्याच्या तुलनेने किती छोटे! नद्या–पर्वताच्या आयुष्याच्या तुलनेने वृक्षाचे आयुष्य क्षुद्र, पृथ्वीच्या आयुष्याच्या तुलनेने नद्या–पर्वताचे आयुष्य क्षुद्र, आणि सूर्य मालिकेच्या आयुष्याच्या तुलनेने पृथ्वीचे आयुष्यहि क पदार्थ ही सारी चढती भाजणी शेवटी अनतात दिसेनाशी होते असा हा प्रचड कालौघ!

खुरट्या जागेत राहणारा माणूस खुरटा निपजतो हे जर खरे, तर या अनादि अनत मोठ्या तत्त्वाच्या जास्त निकट सान्निध्यात माणूस जास्त पूर्ण वाढ झालेला व्हावा हा सभव तितकाच खरा नाही का? आता प्रत्येक खलाशी म्हणजे मनुष्यत्वाचा नमुनेदार पुतळाच काही होत नसला तरी त्यालाहि आणखी कारणे असतात पण सृष्टीच्या निकट सान्निध्यात राहाण्यात मनुष्याच्या विकासाला जास्तीत जास्त वाव मिळतो, हा निष्कर्ष काही खोटा नाही

ज्या वेळी खलाशी मडळी मिसळून काम करीत नसत त्या वेळी डेकवर स्वस्थ चित्ताने लोळत मुका सथपणे विचार करीत पडे अशी विचार करण्याची सधि यापूर्वीच आपल्याला कशी मिळाली नाही याचे त्याला आश्चर्य वाटे. जीवनक्रमाच्या हैदोसधुल्ल्यातून काही काल बिलकूल अलिप्त होऊन जास्त साकल्याने सर्व गोष्टीचा विचार करणें ही केवढी उद्बोधक सधि आहे!

"ए मुक्या!" इब्राहीम ओरडून म्हणाला, "जा पडावाच्या तळाशी त्या दोघाच्या बरोबर, आणि तळाच जमलेल पाणी काढून टाका ते काढल नाही तर लादलेल्या मालाच्या तळाच्या थराला लागेल" मुक्याने किंचाळून दुसऱ्या दोन खलाशाचे लक्ष आपल्याकडे वेधले आणि त्याना हाताने खुणावून तो दर्शवू लागला, "चला"

मुका कोठून, कसा आला इत्यादि गोष्टीची उत्तरे त्याच्या मुकेपणात अगोदरच गडप झालेली होती. एवढेच काय, त्याचें नावहि कुणाला कळले नव्हते पण त्याच्या व्यगदर्शक विशेषणालाच आता त्याच्या नावाचे रूप

प्राप्त झाले. लोक त्याला ' ए मुक्या ' म्हणून हाक मारीत आणि तोहि त्या नावाला उत्तर देई

पडाव लाकडाच्या फळयाचा केलेला असल्यामुळे लाकडाच्या फळया पाण्यात राहून भिजून भिजून घट्ट फुगलेल्या राहात त्याचे ताब्याच्या खिळया-नी बाधलेले साधे कितीहि बेमालूम केले तरीं त्याच्यामध्ये अगदी छोटया फटी राहातच राहात त्याच्यामधून समुद्राचे पाणी सदैव थोडे थोडे आत येत राही आणि ते सर्व बाजूनी निथळत दुसऱ्या मोठया डोलकाठीच्या तळाशी असलेल्या खोल खड्डयात साठून राही पडावाच्या तळाशी लाकडाच्या फळया आडव्या टाकून फलाट केलेले असे त्यावरच्या जागेत फलाटावर टेकून एका-वर एक रचत पडावाच्या अगदी वरच्या कडेपर्यंत माल लादीत पडावाच्या तळातल्या खड्डयात जमलेले पाणी वारवार उपसून बादलीने बाहेर काढून टाकावे लागे

कुठलेहि काम सागितले इब्राहीमने, तरी मुका चटदिशी उठून ते करू लागे एवढेच नव्हे, तर अळटळ न करता, अथवा काम कौशल्याने अगाबाहेर टाकून दुसऱ्यावर न लादता, कुठल्याहि कामातील जो जास्तीत जास्त किचकट, अवघड वा घाणेरडया कामाचा वाटा तोच करावयाला मुका स्वत कडे स्वखुषीने नेहमी घेई इब्राहीमच्या चाणाक्ष नजरेतून ही गोष्ट सुटली नाही इतर सामान्य खलाशाच्यापेक्षा या मुक्याची तऱ्हा फार वेगळी तो जास्त बद्धीचा व हुषार आहे हे त्याच्या ध्यानात आले.

मुक्याने बादली हातात घेऊन, डोलकाठीच्या खड्डयात उभे राहून, घाणे-रडे पाणी उपसावयास सुरुवात केली तो त्या घाणेरडया पाण्याच्या बादल्या उपसून वर उभ्या असलेल्या दुसऱ्या खलाशाच्या हाती देई, वरचा खलाशी डेकवरच्या खलाशाच्या हाती देई आणि डेकवरचा खलाशी समुद्रात बालदी रिती करून पुन खाली तळाशी देई एखाद्या यत्रासारखे हे त्या तिघाचे काम सुरू झाले कोणतीहि गोष्ट वारवार केली की त्या आवर्तनातून एक तऱ्हेची तालबद्धता निर्माण होते घरे बाधताना तिसऱ्या मजल्यावरचे काम चालू अस-ताना बाबूच्या शिडया बाधून त्याच्यावर पायऱ्या पायऱ्याने मजूर लोक उभे राहातात आणि जमिनीपाशी हातात दिलेलें भरलेले चुन्याचे घमेले प्रत्येकजण वरच्याच्या हातात देता देता कसे भरदिशी तिसऱ्या मजल्याच्या उचीला

पोहोचते ते पाहिले आहे का तुम्ही ? त्या सर्व कामामध्ये एक तऱ्हेची साखळी उत्पन्न होते. ते सारे काम यंत्राने चालल्यासारखे आणि तालबद्ध दिसू लागते आणि सुरुवातीला जरी ते मनोवेधक वाटते, तरी लवकरच त्याच्या आवर्तनानी त्यातून कटाळवाणेपणा उत्पन्न होतो त्या साखळीत काम करणाऱ्याना निराळा विचार करावा लागत नाही, पण त्याच्या हातून काम त्याकडे लक्ष न द्यावे लागता आपोआप होते मुका बालद्या भरून देता देता असेच यांत्रिकपणाने काम करू लागला, आणि पुन त्याचे मन विचारात गुगू लागले

पडावाच्या तळाच्या या गटाराला बिल्ज् म्हणतात तिथल्या कुबट, अधाऱ्या जागेत पाण्याला अतिशय घोरिष्ट घाण येत होती आजूबाजूच्या ओल्या लाकडावर झुरळाचा बुजबुजाट झाला होता मोठाली झुरळे शेकडोनी मोजता आली असती तेथे त्या अधारात थोडा वेळ उभे राहून डोळयाच्या बाहुल्या परिपूर्ण विस्तृत झाल्यानतरच त्या बिल्ज्मधल्या आजूबाजू डोळयाना नीट दिसू लागत झुरळेच झुरळे, खडोगणती झुरळे त्याच्या त्या थव्याकडे पाहून मनात अतिशय घृणा उत्पन्न व्हावी त्या गटाराच्या घाण दुर्गधि पाण्यात, त्या अगदी अधाऱ्या राज्यात या झुरळाची वसाहत होती जेथे माणसाला घृणा वाटेल अशा ठिकाणी हे कृमि राहात होते एवढेच नव्हे, तर त्या गलिच्छ वातावरणात त्याना स्वर्ग वाटत होता तेथेच ते जन्मत होते, वाढत होते, अडी घालत होते आणि मरून त्याच गटारात पडत होते बादली भरून वर उभ्या असलेल्या खलाशाच्या हातात. मुका ती ज्या वेळी देई त्या वेळी त्या अधारातून वर त्याला पाढऱ्या शुभ्र आकाशाचा एक एवढासासा तुकडा दिसे त्याच्या मनात आले, ‘ चागल्या गोष्टी नि वाईट गोष्टी या जगात किती जवळजवळ नादतात ! थोडया वेळापूर्वी मी डेक्वर असताना मोकळी हवा लख्ख ऊन, निरभ्र आकाश आणि अफाट समुद्र याच्या सान्निध्यात होतो ते वातावरण स्वर्गतुल्य आहे, तर त्याच पडावाच्या तळाशी या अधाऱ्या गटारात या कृमिकीटकाचे दुसरे साम्राज्यच आहे दोन्हीहि निर्माण केलेली आहेत देवानेच पण ज्याला जे मानवते ते तो घेतो वरची मोकळी हवा आणि ऊन यातहि या कीटकाना असणे शक्य आहे, पण ती गोष्ट त्याना धार्जिणी नाही, कारण त्याचा पिडच असा बनलेला की या नरकातच त्याचा सारा आनद सामावलेला. जग अपार आहे आणि सर्व तऱ्हेचे आहे, त्यात जीवाश सहस्रावधि

गजबजत आहेत पण जो तो आपल्या आवडीने आपल्याला हवे ते वातावरण शोधून घेतो आकाशात संचार करणारा बगळा पडावाचा पाठलाग करीत मोकळ्या हवेत स्वच्छंदाने पंख न हलविता तरंगत राहातो मोकळ्या हवेत, उन्हात राहाणे आणि मोकळ्या समुद्रावरच्या पृष्ठावर अधूनमधून दिसणाऱ्या माशाला सफाईने झेप घालून वरच्या वर अल्लद टिपून घेणे ही त्याच्या आयुष्याची रीत, तर या गटारात दुर्गंधीमध्ये, अंधारात कुजणे हे या कीटकाचे आयुष्य. या गटाराच्या पाण्यात आणि बाहेरच्या मोकळ्या खाऱ्या दर्यामध्ये अंतर केवढे, तर लाकडाच्या एका फळीइतके—म्हणजे दोन बोटे पण हे दोन बोटाचे अंतर खरोखर केवढे महदंतर ठरते !

अशा विचारात तो किती वेळ तरी गुंगला असता पण डेक्‌वरून इस्माइलने त्याना वर बोलावले आणि मोठ्या खुषीने हे घाणेरडे काम टाकून ते वर आले

इब्राहीम डाव्या बाजूला उभा राहून इस्माइलशी बोलत होता त्याच्या बोलण्यावरून मुक्याच्या लक्षात आले की डाव्या बाजूला दिसत होते तेच कन्याकुमारीचे भूशिर, हिंदुस्थानचे सर्वात दक्षिणेकडचे टोक किनाऱ्यावरच्या टेकड्या उंच असलेल्या सूर्याच्या प्रखर उन्हात स्पष्ट दिसत होत्या त्यांचे उतार येऊन समुद्रतीरात मिळून गेले होते समुद्रतीराच्या थोड्या वर कन्याकुमारीचे देवालय दिसत होते हिंदी लोकांच्या संस्कृतीमध्ये ज्या आसेतुहिमाचल यात्रेला फार प्राधान्य दिले आहे, त्या यात्रेतील हे एक टोक आहे येथून हिंदुस्थानच्या मोठ्या खंडातून दूरचा प्रवास करून यात्रेकरूने गंगेला आणि नंतर वर गंगेच्या उगमापर्यंत जावयाचे असते ज्या कन्याकुमारीच्या तीर्थावर लोक जमिनीवरून जातात ते तो समुद्रातून पाहात होता

पडाव सरळ दक्षिणेकडे जसजसा पुढे जाऊ लागला तसतशी मुक्याच्या मनात थोडी कालवाकालव झाल्याशिवाय राहिली नाही 'चांगला असो वा वाईट असो, पुढारलेला असो वा मागासलेला असो, हाच माझा हिंदुस्थान देश !' तो सोडून अज्ञात समुद्रावरून अज्ञात बाह्य जगाच्या या मोठ्या सफरीवर निघताना मुक्याला वाईट वाटल्याखेरीज राहिले नाही तो अनिमिष नेत्रांनी त्या देखाव्याकडे बराच वेळ पाहात राहिला 'हिंदी महासागराच्या तीरावर हिंदमाता ढोपरभर पाण्यात उभी आहे आणि सहस्रावधि

वर्षे तिच्या अगाखाद्यावर खेळत वाढणाऱ्या मनुष्यजातीरूपी बालकाचा विकास होताना पाहात आहे,' अशी कल्पना तो देखावा बघून मुक्याच्या मनात आली 'आणि तिच्या पायाशी डाव्या बाजूस लकेची घागर तिने ठेवली होती कितीक युगे तिला तिष्ठावे लागेल, कारण मनुष्यजातीचा विकास ही गोष्ट तिच्या धीराची खरी परीक्षाच घेईल इतकी कठीण आहे!' मागच्या डोलकाठीला टेकून तो पाहात उभा राहिला. अतर वाढत वाढत किनारपट्टीची रूपरेखा समुद्रामध्ये मिसळून जाईपर्यंत तो ते दृश्य पाहात होता बोलूनचालून मुका होता ना? 'आणि जरी मला बोलता येत असत, तरी मला वाटणारी भावना ही शब्दात बसविण शक्यतेच्या कोटीत नाही-या भावनेला शब्दच नाहीत!' तो मनात म्हणाला, आणि खेदपूर्वक विनो-दाची एक अस्पष्ट लकेर त्याच्या चेहऱ्यावर दिसली

---

## प्रकरण : ४ – माल्दीव बेटांत पडलेली मोहिनी

हिंदुस्थानच्या किनाऱ्याचा आडोसा मागे राहिल्यावर हिंदी महासागरा-च्या खोल पसाऱ्याला सुरुवात झाली आता वाराहि जोरावला आणि लाटाहि जास्त मनमोकळ्या पसरू लागल्या किनाऱ्याजवळच्या सथ पाण्यात पडाव चालू असताना त्याच्या गतीत जो सथपणा होता तो जाऊन पडाव आता जास्त हेदकाळू लागला अधून मधून वर आलेल्या लाटेच्यावरचा फेसाळ तुरा, वारा आपल्या धारेने वरच्यावर कापून, त्याचा शिडकाव पडावावर करी आता जेवणाची वेळ झाली होती आणि सैपाकी बाकीच्याना अन्न देताना गमतीने मुक्याला म्हणतो, 'का रे, तुला जेवण हव का नको? कारण बहु-तेक नवख्याना समुद्र लागतो आणि किनाऱ्याकिनाऱ्यान पडाव चालताना गमजा करणारे लोक किनारा सोडून असे दूर समुद्रावर आल्यावर सुकट माशासारखा चेहरा करतात त्याना अन्न जात नाही"

समुद्र लागणे ही एक चमत्कारिक गोष्ट आहे त्याशी चागल्या वा वाईट तब्बेतीचा काही सबध नाही. कुणाला समुद्र लागतो आणि कुणाला लागत नाही मुका हा समुद्र न लागणाऱ्या सुदैवी प्राण्यात गणला जाणारा होता.

पडावाच्या हलण्याने त्याच्या पोटात ढवळू लागले नाही, की त्याची भूक कमी झाली नाही सैपाक्याच्या विचारण्याला उत्तर म्हणून त्याने आपली नेहमीची एक चपाती तर घेतली, एवढेच नव्हे तर खुद्द सैपाक्याच्या पुढ्यातली त्याची चपातीहि त्याने आणखी हिसकावून घेतली तो धावत उड्या मारीत जाऊन दूर बसला आणि तेथे मजेत खाऊ लागला त्यामुळे खलाशी मडळात हास्याची खसखस पिकली एवढेच नव्हे तर मुका हा चागला खलाशीहि आहे ही गोष्ट कळल्याने त्याबद्दल झालेल्या इतराच्या अनुकूल ग्रहात जास्त भरच पडली

पडावावर माल पुरा लादलेला असल्याने त्याना कोलबो बदरात जाण्याची गरज नव्हती, आणि ते मालदीव बेटाच्या दिशेने सरळ निघाले

पुढचे एकदोन दिवस आकाश ढगाळले होते, वाराहि जोरावला होता आणि पडावावरच्या आयुष्यातल्या गैरसोयी जास्त ध्यानात येऊ लागल्या पण मालदीव बेटे येईपर्यन्त मुक्याची एकदर चालचलणूक पाहून इब्राहीमच्या मनात आले होते की आपल्या कारस्थानात ओढण्यायोग्य हा माणूस ठरेल तो हुषार आहे, चागला दर्यावर्दी आहे आणि इतराच्यापेक्षा जास्त असा त्यामधला मुख्य गुण म्हणजे त्याचा मुकेपणा हाच त्याच्या मुकेपणामुळे इतर लोक ज्याप्रमाणे बोलून कारस्थाने फोडण्याचा सभव असतो तसा तो याच्या बाबतीत बिलकूल उरत नाही.

इब्राहीमच्या मनात अलिकडे एक नवीनच इच्छा उत्पन्न झाली होती आणि ती म्हणजे चटकन् श्रीमत व्हावयाची इतक्या अनेक वर्षे तो दर्यावर्दीचा धदा करीत होता, पण त्या कष्टाच्या मानाने त्याला सपत्ति फारशी मिळाली नव्हती त्याच्या मनाला वाटू लागले होते की केवळ आपला एक पडाव घेऊन हिडण्यात फारशा सपत्तीचा लाभ तर नाहीच, पण तितका मानमरातबहि नाही त्यापेक्षा पाच सहा पडावाचा मालक आपण व्हावे, आणि मिळविलेल्या सपत्तीचा उपभोग घेत मालदीव बेटात प्रतिष्ठित, सधन माणूस होऊन राहावे, अशी त्याला इच्छा वाटत होती. आफ्रिकेच्या किनाऱ्यावर लवकर श्रीमत होण्याचा एक व्यापार चालू होता, तो काही दिवस केला तर पाच सहा पडाव खरेदी करण्याइतकी सपत्ति चटकन् आपण जोडू शकू हे त्याने अजमावले होते ताबड्या समुद्रातल्या व अरबस्तानातल्या बदरात भेटलेल्या त्याच्या परिचयाच्या इतर पडावाच्या नाखुद्यानी त्याला ही गोष्ट सुच-

विलीच होती या वेळी मालदीव बेटात गेल्यावर या नव्या व्यापारात पडण्याचे त्याने ठरविले होते

दोन अडीच दिवसानी मालदीव बेटे त्याच्या दृष्टिपथात आली मोकळ्या समुद्रात विषुववृत्ताच्या जवळ असणारी ही बेटे म्हणजे सृष्टिसौदर्याचे मोठ नमुनेच असतात छोटया छोटया बेटाचा झालेला असा हा द्वीपसमूह आहे. आजूबाजूच्या निळ्या समुद्रातून हो छोटी बेटे उठून दिसतात अगठ्या ठेवण्यासाठी छोटया डब्या असतात ना, तशी डबी उघडल्यावर निळ्या-भोर किनखापी कापडावर सोन्याची खडे बसविलेली अगठी जशी दिसते तशीच ही बेटे दिसत होती. अगठीप्रमाणेच त्या बेटाचा आकार चद्रकोरी-प्रमाणे होता, आणि त्या वर्तुळाच्या मध्ये बाहेरच्या समुद्रापासून सुरक्षित असे बदर झालेले असे किनारा शुभ्र वालुकामय होता, आणि त्याच्याभोवती नारळीच्या झाडाची दाट गर्दी होती पाणी खोल, निळेभोर आणि इतके स्वच्छ होते की त्यात चार पाच पुरुष खोल अगदी उत्तम दिसत होते आणि तसे दिसत होते म्हणूनच बेटाच्या आतल्या बदरात पडाव सुरक्षितपणे नेणे शक्य होते. इब्राहीमच्या पडाव चालविण्याच्या कौशल्याची चुणुक मुक्याला तेथे दिसली इस्माइलच्या हातात सुकाणू देऊन इब्राहीम सुकाणाजवळच उभा राहिला होता त्याने मागच्या उच डोलकाठीवर एका खलाशाला चढून बस-ण्यास सागितले होते तेथून तो खलाशी समुद्रातल्या लख्ख पाण्यात दिसणारे खडक पाहून त्या खडकाच्या मधून जाणारी निरुद वाट कशी आहे ते सागत होता त्या खलाशाच्या सागण्यावरून, आणि बेटावरच्या त्याच्या ओळखीच्या काही खुणा ध्यानात धरून त्याच्या उपयोगाने, त्या छोटया निरुद वाटेतून सुकाण थोडे या बाजूला थोडे त्या बाजूला वळविण्याचे हुकूम तोडाने इस्मा-इलला देत, इब्राहीमने आपला पडाव बदराच्या आत कौशल्याने नेला बदरा-च्या आतले पाणी तर एखाद्या आरशासारखे सथ आणि लख्ख होते. किनाऱ्याच्या जाववेल तितके जवळ जाऊन त्याने एक नागर टाकला आणि पडावाची शिडे आवरून घेऊन खलाशानी ती बाधून टाकली

किनारा इतका जवळ होता की तेथून जरा मोकळ्या आवाजाने खड्या सुरात बोलले तर ते किनाऱ्यावर ऐकू यावे किनाऱ्यावर लोकाचा घोळका,

आलेला पडाव पाहाण्यासाठी जमला होता. छोटया छोटया होडग्यातून पुष्कळ लोक पडावाभोवती आले, आणि त्यातून उतरून इब्राहीम बेटावर गेला

जाण्यापूर्वी इब्राहीमने इस्माइलला सागितले होते कीं सगळी आवरासावर करून झाल्यानतर दुपारी त्याने मुक्याला बरोबर घेऊन बेटावर यावे. त्याप्रमाणे सारी आवरासावर करून दुपारी इस्माईलबरोबर मुका बेटावर गेला.

इस्माइल बरोबर असल्याने मुक्याची माहिती वगैरे कोणी विचारली तरी तोच सागत असे परका माणूस बेटावर आला तर बेटावरचे लोक त्याला भरपूर अगत्य दाखवितात आणि त्याचे आतिथ्य करतात, पण तो अतिथिसत्कार बोलूनचालून परक्याचा असतो, म्हणजे त्याच्यातील परकीयतेची भावना जाणवल्याशिवाय राहात नाही. एवढेच काय, पण बाहेरच्या आलेल्या बोटीवरच्या खलाशाना बेटावर रात्री ते राहूसुद्धा देत नाहीत कारण, न जाणो हे खलाशी बेटावरच्या पोरीबाळीत मिसळून त्याच्या जातीत भ्रष्टता आणावयाचे पण मुक्याच्या बाबतीत तसा प्रश्न आला नाही, कारण इस्माइल आणि इब्राहीम हे मालदीव बेटाचेच रहिवासी असल्याने व त्याच्याच बरोबर त्याच्याच खात्रीने आलेला हा माणूस असल्याने मुक्याला जास्त मोकळेपणाने हिडावयास मिळू शकले.

सध्याकाळी इब्राहीमच्या सग्यासोयऱ्यानी थाटाची मेजवानी केली होती. सग्यासोयऱ्यात बेटावरचे जवळ जवळ सारेच लोक होते. कारण या बेटावरच्या छोटयाशा जमातीमध्ये आपसात लग्ने झाल्याने जवळ जवळ सर्वजण एकमेकाचे कोणते ना कोणते तरी नाते सागू शकत समुद्रतीराच्या जवळच नारळाच्या झापानी केलेल्या झोपडयाच्या बाहेरच्या मोकळया अगणात मेजवानीचा बेत होता मध्ये ठेवलेल्या एका मोठ्या अजस्र ताटात भात, मासे, मास, कोबडीचे मास इत्यादि गोष्टीचा केलेला पुलाव होता त्यावर ताजा नारळ तुकडे करून घातला होता त्या ताटाच्या भोवताली सर्वजण वाळूत बसले होते आणि मधल्या ताटातून सर्वजण घास घेऊन जेवू लागले तोड भरभरून ते मोठे घास घेत आणि भरल्या तोडाने चावत चावत एकमेकाशी सभाषणहि करीत. जेवावयाची आणि बोलण्याची त्याना एवढी घाई झालेली होती की एक दुसऱ्यासाठी त्याना थाबविता येत नव्हते; त्यामुळे बोलताना तोडातून कोबलेला भात काही बाहेर पडे पण तेथे अन्नाचे दुर्भिक्ष नव्हते आणि म्हणूनच

आनदाने सर्व ताव मारून जेवण झोडीत होते. जेवण झाल्यावर लोक जरा जास्त पागून गप्पा छाटीत बसले होते, त्या वेळी इब्राहीमनें मुक्याला आपल्याजवळ एका बाजूस बसवीत त्याला म्हटले, " तू माझ्या पडावावर आल्यापासून आजवर तुझी चालचलणूक व तुझ काम पाहून माझा तुझ्याबद्दल चागला ग्रह झाला आहे. तू मुका असलास तरी इतर खलाशाच्या मानान तुझ्यात फारच जास्त बुद्धि आणि हुषारी आहे आणि म्हणूनच माझ्या धद्यात तुला हाताशी धरण्याचं मी मनाशी योजिल आहे परतु ते सर्व करण्यापूर्वी आणि मी तुझ्यावर विश्वास टाकण्यापूर्वी तू स्वखुषीन आणि आनदान माझ्याबरोबर काम करावयास तयार आहेस हे मला कळल पाहिजे कारण, मी माझ्याकडून तुला शिकविण्यात आणि तुझ्यावर विसबण्यात, तुझी स्वत ची तयारी असल्याशिवाय, अर्थ नाही. आहे का तुझी कबुली ? "

मुक्याने काही उत्तर केले नाही तो सथपणे बसला होता मनात तो या सर्व बोलण्याचा अजमास घेत होता

इब्राहीमने पुन आग्रहाच्या बोलण्याला सुरुवात केली, " हे पाहिलस आमच बेट केवढ सुदर आहे ! सगळे लोक केवढे उमदे आहेत तुला ना घर ना दार, आणि त्यात तू मुका, तुला घर करून रहाण कुठहि गेलास तरी अवघड पण मी जर ती गोष्ट मनावर घेतली तर तुला आमच्या या जमातीमध्ये सामील करून घेईन तुला स्वत ला मी वर्षानुवर्ष कष्ट करून मिळविलेली दर्यावर्दीपणाची विद्या शिकवीन माझ्या माहितीन आपण असा धदा करू की हा हा म्हणता आपल्याला सपत्ति मिळेल, एवढच नव्हे तर तुझ्या मालकीचा एखाददुसरा पडावहि तुला भाड्यान देऊन चालविण्याची वा स्वत चालविण्याची शक्यता येईल मग या बेटावर घर करून तू इतमामान राहू शकतोस. का कशी काय आवडते तुला ही कल्पना ? "

मुक्याच्या तोडून अजूनहि काही आवाज आला नाही त्याला कशाचीच गर्दी नव्हती, एवढेच नव्हे तर इब्राहीमने सुचविलेल्या ज्या कल्पनेस इतर एखाद्याने एका पायावर आपली खुषी दाखविली असती, त्या सूचनेला मुक्याच्या मनांत कुठलाच विशेष उत्साह दिसला नाही आणि त्यामुळे उलट मुक्याचें सहकार्य मिळविण्याची इब्राहीमला जास्तच उत्कट इच्छा झाली.

" मी काय म्हणत आहे ते तुला समजत तरी आहे का ? "

मुक्याने मुंडी हलवून 'हो' म्हटले

"मग तुला उत्तर द्यायला काय झाल? आहे का कबुली तुझी मी काय म्हणतो त्याला?"

उत्तरादाखल शेवटी मुका हसला. त्याने मनात विचार करून ठरविले होते, "काय हरकत आहे? पाहू तरी दैवाचा खेळ. जगापासून अलिप्त राहावयाच कशाकरता? जे काय होईल ते पाहू, आणि जे जे कराव लागेल ते करू" मग त्याने नेहमीप्रमाणे हातवारे करीत किचाळत 'हो' म्हटले आणि त्यामुळे इब्राहीमला सुद्धा मनापासून आनद झाला

तो मुक्याला म्हणाला, "तू माझ्या जमातीबरोबर आगोदरच जेवलेला आहेस, आणि तुला कुणीच परका मानीत नाही अस तुला दिसेल तर जा आणि मोकळेपणान बेटावर हवा तिथ हिड आपण इथ महिना दीड महिना राहू प्रथम सगळा माल पडावावरून उतरवू, मग पडाव किनाऱ्यावरून ओढून पाण्याबाहेर चढवू त्याची तळाची साफसफाई रगरगोटी करून काही फळयाची दुरुस्ती वगैरे करावयाची असल्यास ती करू, कारण आपल्याला फार दूरच्या सफरीला जावयाच आहे. ते झाल्यावर शिड, डोलकाठ्या याचीहि तन्दुरुस्ती पाहिली पाहिजे. त्यानतर माल भरून घेऊन भरपूर गोड पाणी व रसदहि आपल्याला बरोबर घेतली पाहिजे इतक होईतो महिना दीड महिना सहज लागेल, त्यानतर इस्माइल, तू आणि काही दोघे तिघे विश्वासू हुषार खलाशी असे मिळून या सफरीवर निघू तेव्हा आता उघड्या समुद्रावर तरगणार माशानी अर्धवट खाल्लेल एक प्रेत, अस स्वत ला न मानता इब्राहीमचा एक विश्वासू भागीदार असे स्वत ला मानून वागायला लाग बेटावर वाटेल तिकड हिड, सगळ्याच्यात मिसळ आणि खुषीन राहा"

मुक्याला मनात मोठी मौज वाटली. 'कुणाच नशीब कुठ उदयाला येईल याचा काही नेम नाही,' तो मनात म्हणाला त्याला या मालदीव बेटावर येऊन दहा पधरा दिवस झाले होते पण इतक्यातच तिथल्या बेटावरच्या साऱ्याची त्याच्याशी ओळख झाली होती ओळखीला तरी काय लागते? इतर माणसाना, आपण त्याना काही त्रास देणार नाही, आपण निरुपद्रवी आहोत असे कळले आणि ते त्याच्या मार्गाने जातील, तुम्ही तुमच्या मार्गाने जाल अशी खात्री झाली आणि परस्पर सद्भावना मनात आहे याची जाणीव

झाली म्हणजे झाली ओळख ! नाहीतरी ओळखीचा दुसरा अर्थ काय ? एरवीहि जगात कोणी कुणाचा भार घेत नाही घेऊ म्हटला तरी कुणी कुणाचे आयुष्य काही सर्वच्या सर्व उसने जगू शकत नाही प्रत्येकाचे आयुष्य वेगळे जो तो आपापल्या मार्गाने जाणार आणि आपापले आयुष्य जगणार आणि असे आपापले मार्ग चोखाळीत असताना जेव्हा जेव्हा एकमेकाशी सबध येतील तेव्हा तेव्हा तो सुखकारक होईल असे करणे हेच तेवढे कुणाच्याहि हातात असू शकते ज्याचे जीवनप्रवाह एकमेकाशी अतिशय निगडीत झालेले असतात; अशा पतिपत्नी सबधापासून तो निरनिराळ्या परीनी थोड्याथोड्या जास्त जास्त अतरावर असणाऱ्या सबधाना नाती गोती म्हणतात तशाच इतर सबधी लोकाना आपण इष्टमित्र म्हणतो पण हे सर्व कमीअधिक परस्पर ओळखीचेच प्रकार परतु जेथे माणसाचे जीवनमार्ग एकमेकाच्या स्वार्थाने एकमेकाशी सघर्ष निर्माण करतात व सद्‌भावनेचा लोप होतो तेथे ओळख सपून शत्रुत्व सुरू होते पण प्रेम काय, ओळख काय किवा शत्रुत्व काय, माणसाच्या परस्पर सबधाचीच ही निरनिराळी रूपे होत

दहा पधरा दिवसात मुका मोकळ्या मनाने मालदीव बेटात हिडू शकत होता बोलून चालून मुका असल्याने भाषेचा प्रश्न अजिबात उरलाच नव्हता त्याच्या बाबतीत आणि खाणाखुणाची भाषा तर सार्वजागतिक आहे त्याची वृत्तीहि जास्त उल्हसित होती त्याच्या तोडावर हास्य असे आणि लोकाना माणूस हवाहवासा वाटण्याला तोडावरच्या हास्यासारखे दुसरे साधन नाही

पडावाचे काम चालूच होते त्यातहि मुका भरपूर भाग घेई हे सर्व काम करताना त्याला मोठा आनद होई काम नवे असल्याने त्यात नाविन्याची गोडीहि होती आणि त्यातसुद्धा कोणीहि डोक्यावर बसून काम करून घेणारा नव्हता त्यामुळे कामात सक्तीने उत्पन्न होणारा कटाळा येत नव्हता एवढेच नव्हे तर, खुशीचे काम असले आणि ते हौसेने केले तर त्यासारखा आनद दुसरा नाही असे मुक्याला आढळून आले खपून केलेल्या शारीरिक कामामुळे मनालाहि कशी विश्राति मिळते, जिवाला कसा विरगुळा पडतो हे त्याला समजू लागले काम जसे पुरे झालेले दृष्टीसमोर दिसते तसतशी आपल्या अगात असलेल्या सृष्टिनिर्मात्याच्या अशाची आपल्याला प्रचीति येऊ लागते आपण केवळ जीवनाच्या नर्मदेत यदृच्छया वाह-

णारे अचेतन गोटेच नव्हे, तर आपल्यात कर्तृत्व आहे आणि आपल्यात स्वयप्रेरणा आहे हा विचार माणसाला आपली माणुसकी पटवून देण्याला कारणीभूत होतो दिवसभर खपून झाल्यावर मुका बेटावरच्या एका जरा दूरशा झोपडीजवळ--कारण तेथून सृष्टिसौदर्य फार उठून दिसे--जाऊन बसत असे. तेथून सारे पचवीस तीस कदम दूर असलेल्या समुद्राच्या पाण्यात तो पोहत असे समुद्रतळाशी चमकणारे रगीबेरगी दगड, चित्रविचित्र आकाराचे कोरल, शख आणि शिपा यामुळे सृष्टीच्या बहुविधतेची त्याला गम्मत वाटे. तो वाळूत लोळे वा शेजारच्या अगणित नारळाच्या झाडापैकी एकावर चढून ताजी शहाळी तोडून तो समाधानाने त्यातले पाणी पिई, कोवळे लुसलुशीत खोबरे खाई सध्याच्या त्याच्या आयुष्यक्रमात पैसा ही गोष्टच तो विसरला होता त्याच्या दिनक्रमात तो एक न लागणारा पदार्थ, एक निरर्थक शब्द झाला होता

जगात पैसा ही सुधारणेची एक चालती बोलती खूण मानली जात होती आणि पैशाशिवाय सुधारणा शक्य नाही हे समीकरण निर्माण झाल्याने, त्याच्याच पुढची पायरी जास्त पैसा तेथे जास्त सुधारणा असे जग मानू लागले पण हे खरे नाही, मुक्याला वाटले

माणसाचा सर्वांगीण विकास अप्रतिहत व्हावा म्हणून जी राजकीय, आर्थिक व सामाजिक स्थिति सर्वांत जास्त सोयीस्कर होईल तिला म्हणायचे सुधारणा इतिहास, कला, शास्त्रे नि साधने याचे समजसपणाने परिशीलन करून अशी नमुनेदार स्थिति बुद्धयाच जमवून आणावी लागते मनुष्यजातीच्या जीवन प्रवाहाच्या तीरावर बाधलेला चिरेबदी घाट म्हणजे सुधारणा! घाटामुळे प्रवाहाच्या गतीला बाध तरी नाहीच येत, पण तटाकावरची माती धुपून न गेल्याने पात्र अस्ताव्यस्त पसरत नाही प्रवाहाची दिशा घाटामुळे हव्या त्या वळणाला चिकटून राहाते येईल त्या प्रत्येक पुराच्या आवेगाने प्रवाहलहरी बनून आजूबाजूचा प्रदेश वाहवून वा दूर जाऊन उजाड होण्याचे टळते. प्रवाहाच्या वळणात निश्चिति येते घाटामुळे मनुष्यजीवनप्रवाहाला योग्य वळण देणारा घाट म्हणजे सुधारणा!

पण सुधारणेचा विपर्यासच नाही का झालेला? केवळ छानछोकीचें वागणे, नव्हे नव्हे त्या निरर्थक गरजा उत्पन्न करून ठेवून त्या भागविण्याच्या

प्रयत्नात कुचबणे, अतिरंजित कृत्रिमपणाने खाणे, बोलणे, वागणे नि राहाणे असा भलताच अर्थ सुधारणेला आलेला नाही का ? अशा सुधारणेने कल्याण कुठले व्हायला ?

वर वर आकर्षक आणि सुंदर वाटणाऱ्या स्वरूपाखाली माणसाचा स्वभाव जर पूर्वीइतकाच असंस्कृत आणि रानटी राहाणार असला तर याला सुधारणा म्हणावयाचे का कुधारणा ? कोणतीहि सुधारणा जर माणसाच्या बाह्य स्वरूपातच केवळ फरक करणार असली तर त्या सुधारणेला काहीच किंमत नाही केवळ खऱ्या सुधारणेसाठी पैसा हे साधन असले तर तो त्याचा खरा उपयोग, नाहीतर त्याला एक उपाधीच म्हणावयाचे या संपत्तीने माणसाची मने कशी विकृत होतात याचा मला पुरा अनुभव आलेला आहे तो मनात म्हणाला, 'या बेटावरचे मोकळे आयुष्य अनुभवत असताना इतके दिवसाच्या हालअपेष्टामधून थोडी सोडवणक झाल्यासारखे वाटत होते ' त्याच्या जिवाला मोठे सुख वाटू लागले होते येथे तो वाळूतून उठला आणि जवळच्या एका झोपडीपाशी गेला झोपडीच्या दरवाजापाशी एक सोळा सतरा वर्षाची तरुण मुलगी बसली होती तिने त्याला जेवण आणून दिले तो जमिनीवर मांडी ठोकून बसून जेवत असता ती त्याच्याकडे निरखून पाहात होती या मुलीशी त्याचे लग्न करून द्यावे, असे इब्राहिमने तिच्या आईबापाच्या संमतीने ठरविले होते. या माल्दीव बेटातल्या आपल्या सग्यासोयऱ्यातच याची सोयरीक करून दिली तर मुक्याला आणखी एक पाश निर्माण होईल, असा त्याचा हेतु आईवडिलांच्या संमतीमुळे ती मुलगीहि मुक्याकडे ' आपला हा नियोजित वर ' अशा दृष्टीने पाहू लागली होती तो मुका आहे, हे तिला ठाऊक झाले होते पण त्याखेरीज इतर काही व्यंग त्याच्यात तिला दिसले नाही उलट त्याला तेथे समाधानाने जेवत बसलेला पाहून तिच्या मनात आले की, याची गौरवर्ण रेखीव चेहरेपट्टी, कृश पण बांधेसूद शरीरयष्टी यामुळे तो त्याच्या बेटावरच्या जमातीतील इतर पुरुषापेक्षा किती तरी जास्त सुन्दर दिसत आहे तिला तर वाटले की आपल्या बहिणी, मैत्रिणी याना आपल्या सुदैवाचा हेवा वाटेल कारण नाही तरी ती सर्व जमात आपल्यातल्या आपल्यात लग्ने करीत असल्याने त्याच्यामध्ये अतिशय सारखेपणा होता त्या कटाळवाण्या सारखेपणात असा नवखा तरुण लाखात एक असा दुर्मिळ आणि दुष्प्राप्य वाटला असता त्याने आपल्या-

पुढची थाळी बाजूस सरकवली झोपडीच्या खांबाला मागे सरकून तो टेकला आणि पाय ताठ पसरून आरामात बसला

त्या मुलीने घरातून एक कसलेसे तारा बसविलेले तुणतुण्यासारखे वाद्य आणले. त्या वाद्याला एका बाजूस असलेल्या भोपळ्यावर ती डाव्या हाताने ताल देऊ लागली आणि उजव्या हाताने त्या थोड्या तारा छेडू लागली. त्या वाद्यातून निघणारे सूर अगदी मोजके होते अरबी अथवा तुर्की सगिताच्या धर्तीवर त्याचा थाट होता ते ऐकून 'अरेबियन नाईटस्' मधल्या सुरस आणि चमत्कारिक अशा वातावरणात आपण जात आहो, असे वाटे नतर त्या वादनाबरोबरच ती मुलगी गाऊ लागली झोपडीच्या पुढे त्याच्या आणि समुद्राच्या मध्येच असलेल्या एका नारळीच्या झाडाच्या बुध्याशी ती टेकून बसली होती तिचा आवाज मोकळा पण बारीक होता तिच्या शरीरबाध्याप्रमाणेच तिचा आवाजहि बाधेसूद आणि सडसडीत होता त्याच्यात स्थूलपणा नव्हता तिच्या आवाजाला झार होतो तिच्या गाण्याचा अर्थ त्याला कळत नव्हता पण तिच्या गाण्यातील नादमाधुर्य त्याला सुखावह वाटत होते. त्याचा काही का अर्थ असेना! ती नारळीची झाडी, त्यापलिकडे दिसणारा शुभ्र रेतीचा किनारा, त्यावर खळखळत येणाऱ्या बारीक लाटा आणि त्यापुढचा पसरलेला मोकळा समुद्र, या सर्व सुदर देखाव्याला परिपोषक होईल असे ते गाणे होते त्या सर्व सृष्टिसौदर्यात ते सहज मिसळून जात होते तो बसला होता तेथून पश्चिम दिशा अगदी समोर होती आणि मावळायला आलेला सूर्य त्या झाडाच्या मागे आल्याने प्रकाशावर नुसत्या छायाकृति दिसत होत्या. सूर्यबिबाच्या आणि त्याच्यामध्ये असलेल्या झाडालाच ती टेकून बसलेली असल्यामुळे तिच्या व झाडाच्या आकृतीमधल्या रेखीव रेषा मात्र दिसत होत्या. हा देखावा पाहून त्याच्या मनाला क्षणभर आपण सत्यसृष्टीत आहो की नाही याचीहि शका वाटू लागली, इतका तो देखावा मायावी वाटत होता त्याचे मन शात झाले होते आणि त्या शाततेतून मोठे सुख निर्माण होत होते ती शातता इतकी खोल होती की, जगातील बऱ्यावाईट गोष्टीचा त्याला अजिबात विसर पडला त्याच्या मनाला निर्व्याज आनद वाटू लागला त्या आनदाची मुळे वरवरची नसून कशात तरी खोल रुजलेली होती, असे त्याला वाटले. कुठल्यातरी अतिशय मूलग्राही तत्त्वाच्या ज्ञानाशिवाय असा आनद

निर्माण होणे शक्य नाही, असे त्याला वाटले तो देखावा आणि मनाला होणारा आनद आणि शाति याची सागड बरोबर कशी बसते, हे कोडे त्याला अजून परिपूर्ण उलगडलेले नव्हते पण त्याच्या मनात अधुक प्रकाश दिसू लागला होता 'याच दिशेने गेल्यावर कोठेतरी मला तो चिर–आनद सापडेल' असे त्याला वाटत होते

सूर्यबिब उतरता उतरता पश्चिम क्षितिजाच्या समुद्रधारेवर टेकले ते नेमके त्या गात बसलेल्या मुलीच्या मागे पिवळे लालसर दिसत होते नारळाच्या झाडाच्या फाद्याचा वर पुजका दिसत होता त्याची पाने एकाद्या चवरीसारखी पिजारली होती. त्याच्या लाब झापाच्यामधून सूर्याचे ऊन दिसत होते नारळाच्या झाडास तिरकस रेषेच्या तळाशी त्या मुलीची चेहेरेपट्टी दिसत होती तिचे मोकळे केस वाऱ्यावर भुरभुरत होते, तिचे उच कपाळ, तेथून निघणारी लाब नासिका, ओठाचा महिरपि कस, हनुवटी, त्याखालची मान, याची आकृति सूर्यबिबाच्या पिवळ्या तबकडीतून कापून काढून उरलेले सूर्यबिब पश्चिम क्षितिजावर खोचून ठेवले होते जणू काही, असे त्याला वाटले

त्याने मागे कधी काळी वाचलेल्या 'उमरखय्याम'च्या 'रुबाया'ची आठवण झाली त्याला

**"तरुतळीं मजलागीं रम्य एकांत रानीं,**
**मिळत जरि चपाती, वारुणी काव्यवाणी,**
**त्वमपि निज मदंकीं नंदिनी दंग–गानीं,**
**विजन वन तरी मी नंदनोद्यान मानी ॥ "**

त्या पुस्तकातील वरील ओळीच्या अर्थपोषक काढलेले चित्रहि आता त्याला आठवले पण त्या वेळच्यापेक्षा त्या कवितेचा अर्थ त्याला या क्षणी जास्त समजला होता. आणि त्या कवितेला अनुलक्षून असा देखावा, तो आता पाहात असलेल्या देखाव्यापेक्षा जास्त यथार्थ दुसरा असणे शक्य नाही, ही त्याची खात्री पटली.

मग त्याच्या मनात आले की, कवि ज्या वेळी कविता करतो, लेखक ज्या वेळी वर्णून दाखवितो वा चित्रकार जेव्हा चित्र काढून दाखवतो तेव्हा ते केवळ मार्गदर्शनाइतकेच नसते का? त्या कलावताच्या मनात असणारा

भावार्थ वर्णन करण्याचा त्याचा तो एक मर्यादित प्रयत्न असतो तो भावार्थ प्रत्यक्ष जीवनात कोठे सापडेल याचा जणू काही तो छोटा पत्ता असतो पण त्या भावार्थाची खरी प्रचीति पाहावयाची असेल, आणि त्याचा गर्भितार्थ पुरेपूर समजावून घ्यावयाचा असेल तर रसिकाला त्या पत्त्याची नोद आपल्या स्मृतीत करून ठेवावी लागते आणि मग केव्हातरी कुठेतरी अचानक प्रत्यक्षात त्या भावार्थाची आणि आपली गाठ पडते आणि मग आपल्या मनात एकदम आठवण येते मग त्या चित्रकाराचे चित्र आठवते, कवीचें काव्य आठवते, लेखकाचे वर्णन आठवते आणि मग मनात वाटते, 'होय किती बरोबर, किती सार्थ आहे हे!' नुसते सार्थ आहे एवढेच नव्हे, तर त्या कलावताच्या मर्यादित कलेने दाखवला गेला त्यापेक्षा कितीतरी जास्त सत्य आणि गूढार्थ येथे भरलेला आहे आणि त्याची पुरेपूर कल्पना तो स्वत पाहिल्याखेरीज येऊ शकत नाही

या विचारात तो तरगत असताना जसजसा सूर्य क्षितिजाखाली मावळला आणि समुद्रात बुडून गेल्यासारखा दिसला, तसतशी मुक्याचीहि तद्री लागता लागता, त्याची जागृति गाढ समाधानाच्या आणि सुखाच्या झोपेत बुडून गेली तो गाढ झोपी गेला

सूर्यास्तानतर सधिकाल फार वेळ टिकला नाही विषुववृत्ताजवळच्या या प्रदेशात सधिकाल फार थोडा वेळ टिकतो रात्र पडली आणि त्या मुलीचे गाणेहि त्यातच केव्हातरी सपले

त्याला जेव्हा जाग आली, तेव्हा त्याच्या ध्यानात आले की, ज्या खाबापाशी टेकून आपण सूर्यास्त पाहात होतो तिथेच जमिनीवर आहो त्याला त्या बारीक रेतीमध्ये एखाद्या मऊ गादीप्रमाणे आरामशीर झोप लागली होती हवेमध्ये थोडासा गारठा आला होता, पण तो सुसह्य होता तो गारठा फक्त इतकाच होता की, आपले अग उघडे आहे, हे ध्यानात यावे वर नारळाच्या पानाच्या जाळीतून जागोजाग आकाश दिसत होते, फाद्याच्या काळ्या सावल्या आणि त्याच्या अधूनमधून दृष्टीस पडणाऱ्या तारका आणि त्यानी मद प्रकाशित झालेले आकाश याचा मधुर मिलाफ झाला होता. खुद्द त्या बेटावरच्या थोड्या माणसाची हालचालहि बद पडल्याने, तेथील शातता इतकी खोल आणि स्तब्ध होती की अधूनमधून आलेल्या वाऱ्याच्या झुळकीने नारळी-

च्या झाडाची पाने हालली तरी तो आवाज फार मोठा वाटे त्याची झोप पुरी झाली होती त्याला ताजेतवाने वाटत होते या शाततेत आपल्या हृद-याची धडधड सुद्धा त्याला फार मोठ्यादा ऐकू येत होती अधूनमधून काही काजवे लुकलुकत त्या झाडाच्या सावलीतल्या अधारात उडत होते.

त्याच्या मनात का कुणास ठाऊक एकदम एकटेपणाची बोचणी वाटू लागली कुठलेहि सृष्टिसौदर्य असो वा गाढ आनद असो, त्याच्याहि उपभोगात पुन मनाला एकटेपणाची जाणीव का यावी, आणि हुरहूर का वाटावी ? या एकटेपणाचा उगम आपल्या बुद्धीत आहे का रक्तात आहे, हे त्याला कळेना केवळ कल्पनेने आणि मनाने उत्पन्न होणारी ही अस्थिरता आहे, का त्याचा उगम आपल्या तारुण्यात आहे, याची त्याला भ्रात पडली कारण त्याला सुख अपरपार झाले होते त्याच्या मनावर सध्या कुठलेहि दु ख वा दडपण नव्हते सगळीकडे पसरलेल्या एवढ्या प्रचड शातिसागराचा तो आस्वाद घेत होता मग फिरून या अपरपार सुखाच्या पृष्ठभागावर एकटे-पणाचे बोचक तरग का उठावे ?

तो कुशीवर वळला आणि त्याचा पसरलेला डावा हात कशावर तरी पडून तो चमकला त्या क्षण स्पर्शाने त्याला कळले काय होते ते तीच गाणे म्हणणारी मुलगी त्याच्या शेजारी गाढ झोपली होती याच्याशीच आपले लग्न होणार ही खात्री झाल्यावर, तिने आपला पति म्हणून त्याला अगोदरच मानले होते आणि ती विश्वासाने येऊन त्याच्या शेजारीच निजली होती. त्याने भीतभीत उजव्या हाताने तिच्या झोपलेल्या चेहऱ्यावरून हात फिरवला. तिने उठून जागे व्हावे, असे त्याला वाटत नव्हते

त्याला त्याच्या प्रश्नाचे उत्तर सापडले ही एकलेपणाची भावना त्याच्या बुद्धीत जन्मलेली नव्हती तिचा उगम त्याच्या रक्तातच होता कारण अगो-दरच त्या मुलीच्या केवळ स्पर्शाने त्याच्या अगातले रक्त इतके सळसळत वाहू लागले होते की आपल्या हृदयाच्या होणाऱ्या धडधडीने जणू काही त्या तरुण मुलीची झोप मोडून ती उठेल, असे त्याला वाटले तारुण्यसुलभ वासना, आणि जगाच्या मोहातून अलिप्त राहाण्याची त्याच्या बुद्धीची धडपड याच्यात मोठा झगडा उत्पन्न झाला होता. त्याच्या शेजारी, त्याच्या पुढ्यात, त्याच्या करपाशात ती तरुणी होती. त्याने आपल्या मनावरचा बुद्धीचा ताबा थोडा

सैल सोडण्याचा अवकाश की, ती त्याची होऊ शकली असती तिच्या रूपाने साऱ्या जगातले मोह आपल्याला पुन आपल्या पाशात अडकवत आहेत, असे त्याला वाटले

त्याचा प्रतिकार करणे ही मोठी अवघड गोष्ट होती पण शेवटी त्याच्या विचारी बुद्धीलाच यश मिळाले कितीहि अवघड वाटले त्याच्या जिवाला, तरी तो तेथून तसाच उठला आणि समुद्राच्या रेतीतून फिरत फिरत चालू लागला बेटाच्या भोवतालच्या सैकतात तो कितीक वेळ चालत होता समुद्राच्या गार वाऱ्याने आणि त्या चालण्याने हलके हलके त्याच्या मनात उठलेली आग आपोआप विझली त्याच्या मनातला सुखसमाधानाचा सागर पुन. शात आणि निस्तब्ध झाला त्याला थोडा जास्तच आनद झाला की, आपण आपले मालक झालो आहो, आपले शरीर आणि मन आपल्या कह्यात आले आहे, आपल्या शरिराच्या चेतना आणि मनाच्या भावना याना काबूत आणन आपल्या बुद्धीने त्याना लगाम घातला आहे ।

---

# प्रकरण : ५–गुलामगिरी !

इब्राहिमचा पडाव आज जेद्दा बदरात पोचला होता पुष्कळ मोठी सफर करून ते आले होते मालदीव बेटावरून निघाल्यानतर हिंदुस्थानच्या किनाऱ्याकिनाऱ्याने व नतर इराणच्या आखातातून आणि अरबस्तानच्या किनाऱ्यावरून जाण्याऐवजी इब्राहिमने अरबी समुद्र उल्लघून सरळ आफ्रिकेला पडाव हाकारला होता मालदीव बेटावरून ते प्रथम उत्तरेस लखदीव बेटापर्यंत आले होते लखदीव बेटापासून सोकोत्रा बेटे जवळजवळ बाराशे मैल दूर आहेत हा सारा मार्ग भर समुद्रातून असल्याने एवढा छोट पडाव त्यातून हाकारायचा म्हणजे धाडसाचीच गोष्ट पण धाडस हा तर इब्राहिमच्या स्वभावातील फार मोठा गुण होता त्याने धाडस करतानाहि बाकीच्या सर्व गोष्टी शक्य तितक्या अनुकूल आहेत असे पाहिले होतेच हे दिवस वर्षातील फार उत्तम हवेचे होते, आणि ईशान्येचा वारा आफ्रिकेकडे जावयास मोठा अनुकूल होता.

पडाव ताशी पाच ते सहा मैल जाई त्यामुळे दिवसात शभर सवाशें मैलाची मजल होई लखदीव बेटे सोडल्यानतर सोकोत्रा बेटाच्या व आफ्रिकेच्या किनाऱ्याच्या दिशेने आपण बरोबर जात आहोत हे पाहाण्याची इब्राहिमची युक्ति फार सोपी आणि साधी होती सूर्योदयापासून मध्यान्हीपर्यंत पडावाच्या अगदी पाठीमागे सूर्य येईल एवढे तो पाही, व मध्यान्हीपासून सूर्यास्तापर्यंत सूर्य पडावाच्या नाळेसमोर ठेवून अगदी पश्चिम दिशेला तो पडाव हाकारी पडावावर एक जुने होकायत्र होते पण ते शास्त्रीय तऱ्हेने बिनचुक केलेले कुठले असणार ? एकादा पोता इकडे, एकादा पोता तिकडे ते दिशा दाखवी पण पडावाच्या नौकानयनाला तेवढे पुरे होई दिवसास सूर्याच्या अनुरोधाने व रात्री त्या होकायत्राच्या सहाय्याने दिशा पाहून पडाव चालविला जाई वारा ईशान्य दिशेकडून सतत वहात असल्याने शिडाची अदलाबदल खरोखर काहीच करावयाची नव्हती आणि तसे पाहू गेले तर शिडेहि फार नव्हती शिडाच्या जहाजाप्रमाणे चौकोनी शिडाचा बडिवार नव्हता या पडावाला इन मिन शिडे सारी तीन ती उभवायला आणि हवी तशी सैल करावयाला वा ताणून खेचून बाधावयाला फार सोपे होई त्यामुळे पडावाची दिशा बरोबर ठेवली की त्याहून जास्त काही करावयाचे उरत नव्हते

वाफेने चालणाऱ्या आगबोटीला भरपूर कोळसा अथवा डीझल तेल याचा साठा सफरीला पुरेल असा घ्यावा लागतो पण वाऱ्यावर चालणाऱ्या शिडाच्या गलबताना तसे काहीच बरोबर न्यावे लागत नाही ज्या वाऱ्याच्या मर्जीवर ती हाकारली जातात त्याचा साठा अमूप असतो, इतकेच नाही तर त्याला कपर्दिकहि पडत नाही त्यामुळे वारा अनुकूल असला तर शिडाच्या गलबतासारखे स्वस्त वाहन दुसरे नाही

एक, दोन, तीन असे दिवस मोजीत धीराने पडाव चालवीत ठेवावयाचा होता आफ्रिका खडाच्या एवढ्या भल्या मोठ्या पसरलेल्या किनाऱ्याच्या जवळ कुठे ना कुठे पडाव पोचलाच पाहिजे इतकी खात्री होती आणि त्यानतर किनारा धरून उत्तरेकडे गेले म्हणजे एडनच्या आखातात व शेवटी ताबड्या समुद्रात त्याना जावयाचे होते तेथे पोचता आले असते

वास्तविक हे नुसते सागायला किती सोपे वाटत आहे ? आणि प्रत्यक्ष सफरहि तितक्याच निर्वेधपणे पार पडली. मग धाडस उरले तरी कोठे, असेहि

कुणाला वाटण्याचा सभव आहे, पण समुद्रावर सर्वांत मौजेची गोष्ट कोणती असली तर ती अनिश्चितता त्या अनिश्चिततेमुळे आपल्याला साधी साधी वाटणारी अनुमाने चुकतात आणि केलेले बेत अगदी उलटेपालटे होऊन जातात तसे झाल्यावर त्यातून जीव बचावून बाहेर पडण्याची आणि पडतील त्या हालअपेष्टा भोगण्याची तयारी दर्यावर्दीला ठेवावी लागते या अनिश्चिततेमध्ये जाणून बुजून स्वत ची मान गोवून घ्यावयाची हाच धाडसाचा भाग

एव्हाना तुमच्या ध्यानात आलेच असेल की मुका काही कुठला अडाणी माणूस नव्हता चागला शिकला सवरलेला, बुद्धीने हुशार असा तो होता. नशिबाची परीक्षा पाहाण्यासाठी जरी त्याने या अफाट पृथ्वीवरच्या बहुविध देशाच्या प्रवासाला सुरुवात केली होती व या पडावाच्या दर्यावर्दी जीवनात तो सध्या कष्ट काढीत होता तरी त्याच्या प्रगल्भ झालेल्या बुद्धीला सर्व गोष्टी नवख्या असल्या तरी चटकन् समजून आत्मसात करता येत होत्या इब्राहीम बोलून चालून पिढयान् पिढयाचा दर्यावर्दी होता त्याने आपले ज्ञान त्या पेशात लहानाचे मोठे होऊन कष्टाने सपादन केले होते पण ते पाहून शिकावयाला मुक्याला इतके काही अवघड गेले नाही या थोडयाच महिन्याच्या अनुभवात त्याची पुष्कळच प्रगति झाली होती आत्मविश्वासहि आला होता फरक असला तर तो फक्त शरीरसपदेत, आणि शारीरिक कष्ट करण्याच्या अगातल्या कुवतीमध्ये इब्राहीम त्या बाबतीत केव्हाहि सरस होता, पण मुकाहि तरुण होता, त्याला कामाची व शरीरकष्टाची हौस उत्पन्न झाली होती आणि या साध्या जीवनक्रमात त्याची प्रकृति निरोगी झाली होती. आपल्या अगात आलेल्या टणकपणाचे आणि शक्तीचे त्याला स्वत ला आश्चर्य वाटू लागले होते

निर्विघ्नपणे पार पडलेल्या या लाब सफरीनतर जेड्डा बदरात आज त्याचा पडाव त्यानी नागरला होता मालदीव बेटावरून त्यानी आणलेला माल जेड्डा बदरात उतरविला आणि मक्केला जाण्यासाठी त्याच्याबरोबर येण्याची सधि ज्या काही म्हाताऱ्या लोकानी घेतली होती त्यानाहि त्यानी किनाऱ्यावर पोचविले त्यानतर नवीन कोणताहि माल पडावावर लादण्याची भाषा इब्राहिमच्या तोडून ऐकूच येईना, मात्र इब्राहीम बदरात जाऊन काही लोकाच्याशी बराच वेळ मसलती करीत बसे एक दिवस सकाळी एक अरब पडावा-

वर आला आणि इब्राहिमने त्याच्यासह पडाव ह कारला ताबडा समुद्र हा निरुद आहे, आणि त्यामध्न जाणाऱ्या जहाजाची खूपच गर्दी असते भूमध्य समुद्रातून हिदी महासागरात जाण्याची सोय सुएज कालव्यामुळे झाल्याने येथील बोटीचा राबता कमालीचा वाढला आहे युरोप खडातून पूर्वेकडच्या देशाला जाणाऱ्यायेणाऱ्या साऱ्या आगबोटी ताबड्या समुद्रातूनच जात येत त्याखेरीज अरबस्तानचा किनारा आणि आफ्रिकेचा किनारा याच्यामध्ये अरबी नाखुद्याचे पडाव सारखे पुढे मागे येत जात असत त्या पडावाना ‘ झरुक् ’ म्हणत या सर्व गर्दीतून वाट काढणे कौशल्याचे असे विशेषत वाऱ्याने आजु-बाजूच्या रेताड प्रदेशावरची वाळू एकदा उधळून दिली की एवढी आधी येई की दोनश कदमावरचे दिसणेहि मुष्किल होई त्या गढूळ वातावरणात मग सूर्य झाकाळून जाई आणि दिशा धुद होऊन जात डोळयात तेल घालून मग लक्ष ठेवावे लागे की आपला पडाव दुसऱ्या एकाद्या बोटीवर किवा गलबता-वर आदळणार नाही दिशा धुद असल्यामुळे पडावाची अवजारे बाधून स्वस्थ उभे राहणेहि शक्य नसे, कारण या समुद्रात प्रवाह बऱ्य च जोराने वहात, आणि गलबत जर केवळ त्याच्या तावडीत सापडले तर ते कुठल्या कुठे वाह-वत जावयाचे

यासाठी ज्या ताबड्या समुद्राच्या भागात इब्राहिमला आपला पडाव चाल-वावयाचा होता, त्याची पुरी माहिती त्याला करून घ्यावयाची होती, आणि त्यासाठीच हा माहितगार अरब त्याने आणला होता जेड्डा बदराच्या समोर-च असलेल्या आफिरकेच्या किनाऱ्यावर जाण्यास त्यानी पडाव हाकारला

आफ्रिकेच्या किनाऱ्यावर ते जेथे आले तेथे बदर असे नव्हते तर एक छोटीशी खाडीच होती त्याच्या मार्गावर येताना त्याना छोटी छोटी बेटेहि पुष्कळ लागली या बेटातील काही बेटावरसुद्धा ते वाटेत उतरून आले जणू काही, या सर्व भागातून केव्हाहि पडाव हाकारता यावा अशा तऱ्हेने त्याची माहिती स्वत ला करून घेण्याची इब्राहिमने व इस्माईलने कसोशी चालविली होती इब्राहिमने मुक्यालासुद्धा सागितले होते, “ मुक्या, पाहून ठेव सारा भाग नीट तुझ्या ध्यानात एकदा पाहिल म्हणजे चागल राहात ना ? तुझी चाचणीच होईल या भागात पडाव हाकारताना इथ पडाव जर तुला चाल-

विता आला नाही तर तुझ्या मालकीचा पडाव तुला घेऊन देण्यात काहीच हशील नाही ''

आफ्रिकेच्या किनाऱ्यावरच्या खाडीत पडाव नागरून इब्राहीम त्या अरब माणसाबरोबर पुन्हा किनाऱ्यावर गेला, तो जवळ जवळ दिवसभर बाहेरच होता तो परत आला तरी उतारूची वा मालाची काही भाषाच निघाली नाही उलट पडाव रिकामाच्या रिकामा रात्री त्याने हाकारला. आलेल्याच मार्गाने पुन रात्रीच्या अध कारात त्याने पडाव चालविला होता. त्या मार्गाची माहिती करून घ्यावयाची असली तरी रिकामा पडाव पुढे मागे नेण्यात काय शहाणपणा आहे हे मुक्याच्या लक्षात येईना. पुढे मागे हा भाग आपो-आपच पूर्ण परिचयाचा झाला नसता का ? पण आपला मार्ग चुकू नये याची एवढी मोठी खबरदारी घेण्याचे इब्राहिमला काय प्रयोजन ? मुक्याच्या मनात कुतूहल निर्माण झाले पण शातपणे काय काय घडते ते पाहाण्याचे त्याने ठरविले

दोन तीन दिवसानी आफ्रिकेच्या किनाऱ्यावरच्या खाडीत त्याचा पडाव सध्याकाळी उभा होता या वेळी पडाव अगदी रिकामा नव्हता, पण काही मालाची पोती पुष्कळ अतर मध्ये सोडून लादली होती वास्तविक नेहमी माल लादताना इतका व्यवस्थेने नि ठासून लादीत की एवढीसुद्धा जागा रिकामी राहू नये पण या वेळी लादलेल्या गोण्या अशा पसरून पसरून लादल्या होत्या की शेवटच्या अगदी वरच्या थरावर मोठी ताडपत्री आथरल्या-वर सारा पडाव गोण्यानी पुरा लादल्याचा भास होई, इतकेच नव्हे तर ताडपत्री बाजूला करून कोणी मुद्दाम पाहिले म्हणजेहि वरवर पाहणाराला मालाच्या गोण्याच खचून लादल्यासारख्याच दिसत. पण वास्तविक त्याच्या-मध्ये हवी तेवढी जागा अधून मधून सोडलेली होती

चागला अधार पडल्यानतर इब्राहीम म्हणाला, " लक्ष ठेवा रे नीट ! आपल्या पडावावर काही लोक यावयाचे आहेत. पडावाची शिडी खाली सोडून ठेवा ''

आणि थोड्या वेळाने खरोखरच आठ दहा छोटी छोटी होडगी पडावाच्या लगत येऊन उभी राहिली. त्यातून एक अरब वर चढून आला आणि त्याने इब्राहिमला म्हटले, " आटपा लवकर, माल आणला आहे जेट्टा बदराच्या

खालची जी छोटी जागा तुम्हाला दाखविलेली आहे तिथ हा माल आज पोचता करा मालाचे पैसे रोख तुम्हाला तिथच मिळतील ते माल उतरविण्यापूर्वी घ्यावयाचे विसरू नका " मग त्या अरबाने पडावाच्या बाजूवरून खाली पाहून म्हटले, "आणा त्याना वर "

मग चाबूक वाजू लागले, अभद्र शिव्या ऐकू येऊ लागल्या आणि खाली उभ्या असलेल्या होड्यातल्या काही अरबानी, गाई म्हशी वळाव्या त्याप्रमाणे काही माणसे हाकीत पडावावर चढविली त्या साऱ्या माणसाच्या हातापायात काढण्या बाधल्या होत्या त्याच्यात सशक्त पण मार खाऊन अर्धमेले झालेले व पोटात अन्न नसल्यामुळे प्रतिकाराची फारशी शक्ति न उरलेले असे जवानहि होते, तर अनेक दहा बारा वर्षांच्या वरची मुलेहि होती चौदा पधरा वर्षाच्यापासून वर पस्तीस चाळीस वर्षे वयापर्यतच्या मुली नि बायकाहि होत्या ती सर्व माणसे अगदी भेदरलेली होती त्याना मोठ्यादा ओरडणे तर राहोच, पण आपसात फार बोलण्याची सुद्धा शक्यता नव्हती कारण कोणी बोलते आहे असे वाटले तर ते अरब आपल्या हातातील चाबकाची वादी सटक्दिशी बोलणाराच्या तोडावर कडाडवीत, वा चाबकाच्या दाड्याने जोराने पाठीत वा कुशीत जनावरासारखे ढोशीत

त्या मुख्य अरबाने पडावावर आपल्या दोन तीन हस्तकाच्या मदतीने या आणलेल्या सर्व लोकाना अक्षरश गुराप्रमाणे पुढे हाकीत लादलेल्या गोण्याच्या मध्ये ठेवलेल्या जागाजागात अतिशय दाटीवाटीने कोबून भरले त्या अडचणीत कोणी खाली बसले होते, कोणी उभे राहिले होते त्याना किती त्रास होत होता व अडचण होत होती हा विचार कुणाच्याच मनाला शिवलेला दिसला नाही ती सर्व माणसेदेखील अगदी हतप्रभ, एवढाहि प्रतिकार करण्याची धमक अगात अजिबात नसलेली, व गुराप्रमाणे लोकाकडून राबवून घेण्यास सरावलेली झाली होती त्याच्यापैकी कोणी ब्रहि काढीत नव्हता त्या सर्वांना कोबून भरल्यानतर मालाच्या गोण्यावरून त्यानी ताडपत्री ओढली आणि बाजूच्या होड्यात बहुतेक सर्व आलेले अरब परत उतरले त्याच्या मुख्याने इब्राहिमला म्हटले, "हे सर्व पचाहत्तर गुलाम आहेत त्याना किती किमत द्यावयाची हे जेड्डाजवळ आपला जो माणूस येईल तो तुम्हाला सागेल. चला आता, द्या माझं बक्षीस मला, आणि हाकारा पडाव लवकर."

" तुझ बक्षीस आता कस देता येईल ?" इब्राहिमने विचारले, " या सर्व मालाची विक्री झाल्यावर माझ्याच हाती पैसे आले म्हणजे तुझे देईन अगोदर कुठले देणार ?"

" वा राव ! अस कुठ झालय ! या व्यापारात तुम्ही फारच नवखेपणा दाखविता आहात काय हो, तुम्ही या सगळ्या गुलामाना घऊन तुमचा पडाव ठरलेल्या ठिकाणी न नेता तिसरीकडेच नेलात, तर त्याची काय शाश्वती ?"

" पण माझा विश्वास नाही का तुम्हाला ?" इब्राहिमने थोडयाशा चिडक्या स्वरात विचारले

अरबाने उत्तर दिले, " कसला घेऊन बसला आहात विश्वास आणि गैरविश्वास ? या धद्यात काय तुमच्या धान्याच्या व्यापाराप्रमाण वागून चालत? अहो, यातला सगळा व्यवहार रोखीन नेहमी नगद पैशात बोलायच, आणि ते सुद्धा कुठल तरी नाण नाही उपयोगी, सोन्याच नाणच हव ! चला, काढा लवकर पैसे !"

इब्राहीम म्हणाला, " शेख-अब्द-एल-करीमशी माझा ठराव झालेला आहे. मी आत्ता पैसे देण्याला बाधलेला नाही "

" शेख-अब्द-एल-करीमच नाव सगळेच सागतात हो " तो अरब म्हणाला, " नुसत अस सागोवागी जाऊ लागल तर माझ काम बनायच नाही. त्यापेक्षा काही जास्त विश्वास ठेवता येईल अशी गोष्ट पाहिजे आहे का तुमच्याजवळ ? "

"आहे," इब्राहीम म्हणाला, आणि त्याने आपल्या जाकिटाच्या खिशातून एक छोटी अगठी काढून त्या अरबाला दाखविली अरबाने ती नीट निरखून डेक्खालच्या दिव्याच्या उजेडात पाहिली, आणि मग तो म्हणाला, " गुलामाचे पैसे नाही दिले आत्ता तरी हरकत नाही, पण तरी सुद्धा बक्षीस मिळालच पाहिजे मी स्वत. परत गेल्यावर या सगळ्या बाकीच्या अरबाना आणि किनाऱ्यावरच्या सार्थीदाराना पैसे दिलेच पाहिजेत, त्याशिवाय त्याची तोड कशी गप्प राहातील ? काढा वीस दिनार, आणि जाऊ द्या मला लवकर "

" काय वीस दिनार ?" इब्राहिम आश्चर्याने उद्गारला

" होय, वीस दिनार एवढ काय आश्चर्य वाटत तुम्हाला ? त्या पचा-

हत्तर गुलामाची किती किमत येईल याचा काही तुम्हाला पत्ता आहे ? ती एक सुदर मुलगी विकली तर तिचे एकशेवीस पौड मिळतात म्हणजे दोनशे चाळीस दिनार झाले, दोनशेचाळीस दिनार ! आणि तुमच्याजवळ पचाहत्तर गुलाम दिले आहेत पहा जरा मनाशी हिशेब करून, त्याची केवढी किमत होते ती आणि दुसर हेहि लक्षात ठेवा की, तुम्ही अशी हुज्जत घालून दर खेपेला माझा वेळ खाणार असाल तर तुमच आमच नाही जमायच ही काम जोखमीची आहेत तुमच्या सारख रेगाळत व्हायच असल तर कधी नाही बनायच अशान तुम्ही स्वत याल गोत्यात आणि आणाल बाकीच्यानाहि खुद्द शेख-अब्द-एल-करीमसाठी सुद्धा मी माझी नाही मान अडकवून घेणार फासात ! ''

जास्त बोलण्यात आता अर्थ नाही असे पाहून इब्राहीमने चडफडत वीस दिनार काढून अरबाला दिले आणि तो उतरून गेल्यावर पडाव हाकारण्याची तयारी केली

आता मुक्याच्या डोक्यात प्रकाश पडला ! 'लवकर श्रीमत व्हावयाचा जो मार्ग सापडल्याच इब्राहीम म्हणत होता, तो हा तर ! आणि त्यामध्ये भागीदारी देऊन मलाहि माझ्या मालकीचा पडाव मिळवून देण्याची त्याची तयारी माणसाच्या मनाची खरोखर कमाल आहे स्वार्थासाठी ते काय करतील याला काही मर्यादाच नाही इतर ठिकाणी काही देशात अशी स्थिति येऊन ठेपली आहे की, नोकरचाकर, मजूरमाणस याना कशा तऱ्हेन वागविल पाहिजे, त्याना किती तास काम दिल पाहिजे, काय पगार दिला पाहिजे, याबद्दल नियम ठरवावे म्हणून काही लोक बोलतात. तर उलट याहि सुधारणेच्या काळात या ठिकाणी खुद्द गुलामाचा व्यापार चालतो केवढा विरोधाभास आहे हा ! इब्राहिमला मूर्खाला करायच ते करू द्या पण असल्या नीच कर्मांत मी मदत देईन कोणत्याहि लालचीन, अशी जर त्याची समजूत असली तर ती अगदी चूक आहे '

पण मग मुक्याच्या मनात असेहि आले की, 'आपल्याला जरी असल्या व्यापारात भाग घ्यावयाचा नसला तरी निदान हा व्यापार कशा तऱ्हेन चालतो हे शोधून काढायला काय हरकत आहे ? तो बद कसा करावा हे जर आपल्याला कळल तर त्याचा उपयोगच नाही का होणार ? मग एव्हानाच

आपली नाखुषी उघड दाखवून सर्वांना बिथरवून सर्व काम बिघडवून टाक-ण्यात शहाणपण नाही

पडाव चालू असताना खालच्या काही गुलामापैकी कोणी प्यावयास पाणी मागितले त्याना पाणी द्यावे म्हणून मुका उठला ते पाहून इब्राहीम म्हणाला, " तुला का रे नसती पचाईत ? जा ना मुकाट बैस ! "

इब्राहिमच्या स्वभावातला क्रूरपणा इतके दिवस मुक्याच्या दृष्टोत्पत्तीस आलेला नव्हता इतके दिवस तो उमदा व दिलदार आहे एवढेच त्याला कळले होते पण माणसाच्या स्वभावाचे कानेकोपरे कळायला तरी वेळ प्रसग यावा लागतो

पडाव अधारातून चाललेला असताना पडावाच्या समोरूनच एक मोठी आगबोट चालली होती ती काही वेळ त्याना दिसली त्या बोटीच्या वरल्या डेक्वर बिजलीच्या रोषणाईची दिवाळीच केली होती निरनिराळ्या रगाचे दिवे शोभेसाठी लावलेले होते आणि पाश्चात्य सगीताच्या सुराच्या लहरी वाऱ्याबरोबर कानी पडत होत्या ती आगबोट वेगाने चालली होती ती काही वेळ अगदी जवळ आली, त्या वेळी तर उची पोषाख केलेले स्त्रीपुरुष डेक्वर हसत, खिदळत व नाचत असल्याचे स्पष्ट दिसले त्यानतर लागलोच ती बोट पुढे गेली, भराभर दूर जाऊ लागली आणि लवकरच दिसेनाशी झाली सुधा-रणेची ही दोन टोके क्षणकाल एकत्र येऊन गेली पृथ्वीवर स्वर्ग आणि नरक किती जवळ असू शकतो याचे हे एक प्रत्यतर होते एका बोटीवर शास्त्राच्या मदतीने सुधारणेचे शिखर आपण गाठले, असा अभिमान बाळगणारी माणसे होती, तर दुसऱ्या या पडावावर जे साध्या माणुसकीलाहि पारखे झाले आहेत असे हे गुलाम होते एकाच मनुष्यत्वाची ही दोन टोके !

× × ×

एक दोन महिने लोटले होते आणि त्यात पुष्कळच स्थित्यतर झाले होते. मुका पडावावर आता नव्हता, तर आता त्याच्याच स्वत च्या हातापायात काढण्या घातल्या गेल्या होत्या दुसऱ्या दिवशी त्याचा लिलाव व्हावयाचा होता गुलाम म्हणून तेथे त्या घाणेरड्या तबूमध्ये इतर अनेक गुलामाच्या सान्निध्यात बसल्या बसल्या त्याला आठवण झाली—

इब्राहिमच्या पडावावर अनेक फेऱ्या मारल्यानतर त्याला कळू लागले होते की गुलामाचा व्यापार या सर्व भागात केवढ्या तरी मोठ्या प्रमाणा-वर चालू होता ॲबिसीनियामधल्या हारार प्रातात काही टोळ्या येऊन आजूबाजूच्या अर्धवट रानटी वस्तीच्या खेडेगावावर छापे घालून त्या खेडे-गावातील सारी माणसेच्या माणसे पकडून नेत असत अगदी म्हातारे कोतारे अथवा अगदी लहान पोरे याच्याखेरीज सर्व इतर माणसाना ते गुलाम करीत

अशा गुलामाचा ताडा तेथून लपवीत छपवीत ते ताबड्या समुद्राच्या कुठल्या ना कुठल्यातरी बदरात आणून पोचवीत, व तेथून जाणाऱ्या अनेक पडावातून गुलामाच्या बाजारपेठात नेऊन सोडीत

हे सर्व करण्याला कितीक माणसे लागत, त्याची एक साखळीच होती एकाने दुसऱ्याला, दुसऱ्याने तिसऱ्याला असे हे गुलाम पोचवीत शेवटी ते लिलावाच्या जागी पोचत

ॲबिसीनियामध्ये तेथल्या नेगस् बादशहाने हा गुलामाचा व्यापार थाब-विण्यासाठी प्रयत्न उघड उघड तरी सुरू केले होते मेनिलेक् हा बादशहा धोरणी होता आपल्या देशात गुलामाचा व्यापार खूप चालतो, गुलामगिरीहि चालू आहे याची त्याला माहिती नव्हती असे मुळीच नाही पण आपले सर-दार आणि उमराव सारेच जेथे आपल्या सरजामात पदरी गुलाम बाळग-तात, तेथे आपल्यासारख्या मागासलेल्या देशात या गोष्टी एकदम बद होऊ शकतील हे त्याला शक्य वाटत नव्हते एवढेच नव्हे तर, गुलामगिरीविरुद्ध सुधारलेल्या राष्ट्रानी ओरड केली तरी काय किफायत आहे हेहि त्याला ठाऊक होते पण इतर मोठ्या राष्ट्राच्या बरोबरीने आपलेहि राष्ट्र गणले जावे अशीहि महत्त्वाकाक्षा त्याच्या मनात होती त्यामुळे या दोन्हीचा सम-न्वय करण्याचा त्याचा प्रयत्न होता त्याचा परिणाम एवढाच झाला होता की सरकारी कायद्याने गुलामगिरी वाईट व गुलामाचा व्यापार करणाराला फाशीची शिक्षा द्यावी म्हणून जरी एकीकडे ठरले होते, तरी दुसरीकडे काय-द्याच्या मूक समतीने असो वा सोईस्कर डोळेझाकीने असो, गुलामाचा व्यापार अप्रतिहत चालू होता

या पकडलेल्या गुलामात अगापिंडाने धष्टपुष्ट असतील अशाना बैला-

प्रमाणे खच्ची करून विकावयास नेत हे करताना गलिच्छ जुन्या साधनाचा अवलब केल्यामुळे त्यातील काही त्यामध्ये आजारी पडून मरतहि

त्यातल्या त्यात गाला जातीच्या मुली सुदर असल्याने त्याना जास्तच किमत येई निग्रो, हमाइट आणि अरब याच्या मिश्रणाने ही जात बनली होती अशा एखाद्या मुलीची किमत गुलामाच्या लिलावात एकशेवीस पौडा-पर्यंत येई तर गरोदर स्त्रिया जास्त स्वस्त विकीत, कारण त्याहि पुढे परत सुदर दिसू लागण्याचा सभव तर असतोच, पण त्याना विकत घेतल्यास त्याची प्रजाहि फुकट मिळते ! म्हैस विकत घेताना ती भाकड आहे का व्यालेली आहे हे जसे विचारात घेतात तसेच गुलामाच्या व्यापारात खुद्द स्त्रियाबद्दलहि ते लक्षात घेत

गुलाम नेण्याच्या वाटेवर जी खेडी लागत तेथील रहिवाशाची या व्यापाराला फूस असे, आणि गप्प बसण्याची किमत म्हणून ठिकठिकाणी त्याना पैसे चारावे लागत अशा मिळणाऱ्या काळ्या पैशावर कितीक लोक श्रीमत झालेले होते

हा सर्व व्यवहार इतक्या सघटितपणे चाललेला होता की एकट्या आपल्याच्याने तो बद पडू शकेल हे शक्य नाही, हे मुक्याला कळून चुकले होते. या बाबतीत तो बराच हताश झाला होता ताबड्या समुद्रातून पडाव हाकारताना अनेकदा ब्रिटिश रॉयल नेव्हीची लढाऊ जहाजे सशयास्पद वाटणाऱ्या पडावाना वाटेत रोखीत, आणि त्याची झडती घेत हे कळल्यावर मुक्याने एकदा याचा फायदा घेण्याचा प्रयत्न केला होता त्याचा पडाव चालू असताना एकदा जवळून एक लढाऊ जहाज चालले होते त्याच्या पडावावर नेहमीप्रमाणे पुष्कळच गुलाम होते मुक्याच्या मनात त्या वेळी काय आले कुणास ठाऊक, पण त्याने एकदम हातातला कदील अधारात वर काढून त्या लढाऊ जहाजाच्या बाजूने दिसेल असा खूप जोरजोराने हलविला नाही तर वास्तविकपणे त्या पडावाकडे त्या लढाऊ जहाजाचे लक्षहि गेले नसते लढाऊ जहाजाने सर्च लाइट् टाकून पडावास थाबण्यास सागितले मुक्यानें केलेला विश्वासघात इब्राहिमने पाहिल्यावर मुक्यावें पारिपत्य करण्यापूर्वी प्रथम त्याने एक मोठी शिताफीची गोष्ट केली त्याने आपल्या पडावा-वरच्या गुलामापैकी चाळीस पन्नास गुलाम सरळ पडावाबाहेर समुद्राच्या

पाण्यात फेकून दिले आणि त्याच्या अपेक्षेप्रमाणेच परिणाम झाला त्या लढाऊ जहाजाने पडावाचा पाठलाग करण्याऐवजी थाबून छोटचा होडचा पाण्यात उतरविल्या आणि पाण्यात टाकलेल्या माणसाना उचलून बाहेर काढण्याच्या कामात ते गुतले त्याचा फायदा घेऊन इब्राहिमने आपला पडाव जलदीने बाजूस हाकारला आणि हा हा म्हणता अरबस्तानच्या किनाऱ्याजवळील बेटाच्या गर्दीमध्ये तो नाहीसा झाला

त्यानतर मुक्याला किती मार बसला, किती शिव्या खाव्या लागल्या हे त्याचे तोच जाणू शके त्याची भागीदारी आणि मालदीव बटात प्रतिष्ठित होऊन राहाणे सारेच रसातळाला गेले एवढेच नव्हे तर, मार खाऊन तो बेशुद्ध झालेला असताना त्याच्या हातापायात काढण्या बाधून इब्राहिमने आपल्या उरलेल्या इतर गुलामाच्या ताडयात मिसळून त्याला अरबस्तानात बदरात केव्हा विकून टाकले हे समजलेहि नाही

तो जागा झाल्यावर त्याला कळले ते एवढेच की जी गुलामगिरी नाहीशी करावी असे विचार त्याच्या मनात येत होते आणि ज्या प्रयत्नात अवि-चाराने उतावीळपणा करून त्याने उचल घेऊन काही गोष्ट करण्याचा प्रयत्न केला त्याच गुलामगिरीच्या पाशात तो स्वत च आता पडला होता ‘ काय नशीब आहे पाहा ! ’ असे तो मनात म्हणाला आणि त्याने कपाळाला हात लावला.

---

# प्रकरण : ६–गुलामांचा लिलांव

अरबस्तानच्या किनाऱ्यावर जेड्डा बदराच्या जवळच असलेल्या एका गावात एक मोठी बाजारपेठ होती जेड्डा बदरात उतरून मक्केला जाणाऱ्या यात्रे-करूच्या वाटेतून ही बाजारपेठ फारशी दूर नव्हती. आजुबाजूच्या रेताड वाळ-वटात मध्येच असलेल्या पाणथळ जागेच्या आश्रयाने उगवलेल्या खजुरीच्या आणि इतर काही झाडाच्या सान्निध्यात ही वस्ती वाढली होती बहुतेक घरे लिपलेल्या मातीची आणि सपाट छताची होती या भागात पावसाचा कधी एकहि थेब न पडल्याने घरावर पावसाचे पाणी पडून ते वाहून जाण्याची

व्यवस्था करण्याचे कारणच नव्हते सगळीकडे रेतीच रेती आणि मातीच माती. पाण्यावाचून शक्य तेवढे व्यवहार करावयाची पद्धत पडलेली होती पिण्याला जे काही पाणी लागेल तेवढेच, बाकी सारे व्यवहार कोरड्यानेच व्हावयाचे

घराच्याखेरीज आजुबाजूस बरेच तबूहि उभारलेले होते ते मोठे सोयीचे असत कारण जरूर पडेल त्याप्रमाणे ते इकडे तिकडे हलविता येत या बाजारपेठेत येणारे व्यापारी, सौदागर आणि विकावयास आणलेला माल म्हणजे गुलाम याच्यासाठी अशा तात्पुरत्या उभारलेल्या तबूचा उपयोग होई.

या सकाळी मुक्याला मोठे आश्चर्य वाटले की, जेवण इतके उत्तम कसे? उत्तम याचा अर्थ काही विशेष गोडधोड पदार्थ होते, असा नव्हे, पण जे काही अन्न दिले होते ते नेहमीप्रमाणे अर्धीच भूक भागेल इतके थोडे नसून भरपूर होते पण मग त्याला आठवले की, आज आपल्या विक्रीचा दिवस! आज गुलामाचा बाजार भरावयाचा होता त्यासाठी त्याच्याबरोबरीचे सर्व गुलाम आणि तो याचें लटावर बाजारात नेले जाणार होते विक्रीला नेताना मालाला किमत जास्त यावी, गुलाम सशक्त दिसावेत, त्याच्या तोडावर भरल्या पोटीचा तकवा दिसावा एवढ्याचकरता ही काळजी गुलामाच्या-बद्दल एकदम दया उत्पन्न झाली असा या पोटभर अन्न देण्याचा अर्थ नाही!

ज्या वेळी त्याच्यावर देखरेख ठेवणाऱ्या अरबानी त्याचा ताडा गुराप्रमाणे अक्षरश वळत त्या रेताडातून बाजारातल्या मुख्य कट्ट्यापाशी आणला त्या वेळी आजुबाजूचा सर्व देखावा पाहून मुक्याला मोठा अचबा वाटला त्याने त्याच्या देशात आजवर गुरेढोरे बाजारात विकलेली पाहिली होती दर आठवड्याला भरणाऱ्या बाजाराला आजुबाजूच्या खेड्यातून शेतकरी गाई-म्हशी, बैल आणि तट्टे शहरगावी आणीत आणि त्याचे गिऱ्हाईक त्या जना-वराच्या गर्दीतून हिडत काकदृष्टीने त्या जनावराची परीक्षा करीत. मध्येच थाबून बैलाच्या पाठीवर ते थाप मारीत, व त्याच्या शक्तीचा अदमास घेत. त्याचे वशिड पाहून तो कितपत पोसलेला आहे ते ठरवीत तो खच्ची केला आहे का नाहीं, हे वाकून पाहात तर गाईच्या बाबतीत नाकपुडीवरचा ओलसरपणा पाहात व पाठीवर अल्लद स्पर्श करून तिच्या पाठीचे कातडें थरारते का नाही हे पाहून, तिला रोग वगेरे झाला नाही, अशी खात्री करून घेत. निरनिराळ्या जातीच्या जनावराच्या परिक्षेचे ठरलेले आडाखे गिऱ्हाइके

पडताळून पाहात पण बाजारात मनुष्यानी मनुष्याचीच त्या तऱ्हेने पारख करून त्याची खरेदी–विक्री करणे, हा मनाला किळसवाणा वाटणारा प्रकार तो आज प्रत्यक्ष पाहात होता !

बाजारातल्या मधल्या कट्ट्यावर गुलामाच्या लिलावासाठी खास सोय केली होती त्या पुरुषभर उचीच्या चबुतऱ्यावर गुलामाला उभे केल्यावर सर्व गिऱ्हाइकाना तो एकदम नीट दिसे आणि लिलाव पुकारणाऱ्यालाहि गिऱ्हा-इकाचे चेहरे न्याहाळून हा गुलाम किती किमतीपर्यंत जाऊ शकेल याचा कयास बाधता येई

कट्ट्याच्या जवळच थोड्या अतरावर मुक्याला बाधून उभे केले होते तेथून सारा लिलाव चाललेला मुका पाहू शकत होता

मध्यपूर्वेच्या आजुबाजूच्या देशातूनच बहुतेक सर्व गिऱ्हाईक आलेले होते त्याच्या अगावर काळे वा पाढरे पायघोळ झगे झुलत होते या उष्ण, रेताड प्रदेशातला हा सर्वसमत पेहेराव होता त्यामुळे साऱ्या अगाला उन्हापासून, नि वाऱ्याबरोबर उधळणाऱ्या रेतीच्या बारीक कणापासून रक्षण मिळे अगाला कुठेहि तग होत नसल्यामुळे त्या झग्यामध्ये अगाशी वारा खेळता राही या झग्याच्या कापडाच्या सुबकपणावरून तो पेहेरणाऱ्या गिऱ्हाइकाची प्रतिष्ठा व श्रीमती याचे बरेचसे निदान करता येई काहीजणानी डोक्यावर टारबुश घातल्या होत्या काहीनी फेज–कॅपस् घातल्या होत्या तर इतर काहीच्या डोक्यावर पाढऱ्या पट्टीदार टापशा बाधलेल्या होत्या गिऱ्हाइकातील सधन अरब शेख तेव्हाच ध्यानात येत त्याच्या डोक्यावर झिरझिरीत तलम रेशमी कापडाचा तुकडा कपाळासरशी मागे वळवून घेऊन कानावर आणि मानेवरून पाठीवर लोबत सोडलेला असे हा रेशमी तुकडा डोक्यावर राहावा म्हणून जरतारीने मढवलेला रेशमाचा तीन बोटे जाड गोफ त्यावर वेढे देऊन गुडाळलेला असे त्याला ‘ अगाल ’ म्हणत

बरेचसे व्यापारी जमले असे पाहिल्यावर कट्ट्यावर उभ्या असलेल्या बोलभाड लिलाववाल्याने लिलाव सुरू केला प्रथम कट्ट्यावर सात आठ न्यूबियामधले गुलाम आणून उभे केले गेले काळ्या रक्तचदनासारखी त्याची शरीरे काळी कुळकुळीत होती आणि त्यावर चकचकीत तजेला होता. त्याची उचीपुरी शरीरयष्टि आणि भली मोठी मासल शरीरे पाहून मुक्याला

वाटले की केवळ शारीरिक शक्तीच्या दृष्टीने पाहावयाचे झाले तर या एके-काची बरोबरी करावयाला चार चार माणसे लागतील, आणि शक्तीवर जर मनोधैर्य अवलबून असते, तर हे गुलाम कुणालाहि भारी झाले असते पण त्याच्या मुद्रेवरचा भाव पाहिला म्हणजे वडाऱ्याच्या गाडीला जुपलेल्या रेड्याची आठवण झाली असती त्याच्या चेहऱ्यावरची माशीसुद्धा हलली नसती त्याचे तुळतुळीत गोटे, त्याच्याखाली दिसणारे पिच-पिचीत डोळे, जाड ओठामधून त्याच्या अर्थशून्य हास्यात दिसून येणारे शुभ्र दात आणि मुद्रेवरचा एकदर भाव पाहिला म्हणजे वाटे की, आफ्रिकेतील अनेकविध पशूच्या जातीपैकी एका जातीचा प्राणी असे याना का मानू नये ? कारण, मनुष्य आणि इतर जनावरे याच्यामधला खरा फरक म्हणजे माण-साची प्रगल्भ बुद्धि आणि आत्मिक शक्ति पण हे गुलाम इतके बुद्धिहीन होते की त्याची गणना माणसात करणे म्हणजे कल्पनाशक्तीला फाजील ताण देण्यासारखे होते

" हे पाहा आठ न्यूबियामधले उत्तम गुलाम पाहा त्याची शक्ति, कसे हत्ती-सारखे आहेत हे ! कुठल्याहि कामाला हे उपयोगी पडतील वीस बैलाच्या ऐवजी या आठाना कामाला जुपा बैलाच्यापेक्षा खातात कमी, पण काम मात्र जास्त " लिलाव पुकारणारा म्हणाला गुलामाच्या दडाभोवती आपल्या दोन्ही पजाची वेग धरून त्याने ते दड केवढे मोठे आहेत हे दाखविले नतर त्याच्या भल्यामोठ्या उघड्या छातीवर दणादण गुद्दे मारीत ते कसे भरभक्कम आहेत हे तो दाखवू लागला भाड्याच्या दुकानात भाड्यावर हातोड्याने जोराने ठोका देऊन निनाद काढीत भाड्याचा अभगपणा व मजबुती दुकानदार दाखवतो त्याप्रमाणेच तो करीत होता

" बोला, कोण काय किमत देता ? "

" एकशे पचवीस दिनार, " एका व्यापाऱ्याने म्हटले " एकशे सत्तावीस, " दुसरा उद्गारला

दुसऱ्याची, ' एकसे सत्तावीस ' ही मागणी जणू काही वरच्यावर हाताने झेलीत आणि आपले हात सर्वांच्या पुढे वेळावीत, ती मागणी मालाच्या मानाने किती क्षुद्र आहे, ती आणखी किती तरी चढविली पाहिजे, इतका सर्व अर्थ आपल्या हातवाऱ्यानी, मुद्रेने आणि आवाजाच्या चढउताराने

दाखवीत लिलाववाल्याने व्यापाऱ्याच्याकडे प्रश्नार्थक भावाने पाहिले, "सत्तावीस, एकशे सत्तावीस, आठ न्यूबियन गुलामाना सारे एकशे सत्तावीस दिनार !"

"तीस," एका बाजूने आणखी एका व्यापाऱ्याचा शब्द आला पहिल्या व्यापाऱ्याने ते आपल्याला जणू काही आव्हानच असे मानून, जोराने म्हटले "चाळीस"

"चाळीस, एकशे चाळीस !" लिलाववाला उद्गारला लिलावाची वाढती किमत पाहून त्याच्या चेहऱ्यावर समाधान दिसू लागले होते एकशेतीस दिनार किमत सागणाऱ्या व्यापाऱ्याकडे बोटाने रोखून दाखवीत आणि त्याच्या नजरेला नजर भिडवीत तो उद्गारला, "एकशे चाळीस दिनार ?" लिलाववाल्याच्या आवाजामध्ये इतका अर्थ भरलेला होता की, त्या एकदोन शब्दाच्या उच्चारानेहि तो पाच वाक्ये बोलल्याप्रमाणे वाटे

पहिला व्यापारी म्हणाला, "पन्नास दिनार !"

पुन दुसऱ्या व्यापाऱ्याच्या दिशेला लिलाववाला पाहू लागला जणू काही तो त्याला म्हणत होता, "काय रे, या व्यापाऱ्याची चढाई तू अशी निमूटपण सहन करणार ? तुझ्या मागणीवर त्यान दिलेली मागणी ऐकून तू गप्प बसणार ? अरे, हा तुझा अपमान आहे धडधडीत ! सहन करू नको त्याचा पाचटपणा, दे चागली घवघवीत किमत अशी की, या प्रतिस्पर्धी व्यापाऱ्याला त्यापुढ बोलता आल न पाहिजे" पण तोडाने तो म्हणत होता, "पन्नास दिनार, एकशे पन्नास दिनार !"

आता व्यापाऱ्याची एकमेकात चुरस सुरू झाली. आणि चुरस हेच तर लिलाव फायदेशीर होण्याचे पहिले तत्त्व कोबडी झुजविल्याप्रमाणे लिलाववाला व्यापाऱ्याच्यामध्ये झुज लावीत होता एकाची मागणी व दुसऱ्याची मागणी या झरझरा येऊ न लागल्या तर आपल्या आविर्भावानी आणि शब्दानी तो त्याना डिवचून किमत जास्त चढविण्यास उद्युक्त करी.

लवकरच त्या आठ न्यूबियन गुलामाची किमत चढत चढत शभर, दोनशे, तीनशेवरून तीनशे वीस दिनारावर जाऊन बसली

मग लिलाववाल्याने लिलावाच्या मध्ये एक नवीनच सूर काढला. तो उद्गारला, "तीनशे वीस दिनार म्हणजे फारच स्वस्त. आठ गुलाम, आणि

तेहि खच्ची केलेले ! नपुसक, षढ ! जनानखान्यात पहाऱ्याला ठेवायला हे अगदी योग्य आहेत याच्यासारखे पहारेकरी ठेवले म्हणजे तुम्हाला जनान्याला बाहेरून उपद्रव होण्याची भीति तर नाहीच, पण खुद्द जनान्याकडेहि हे पहारेकरी वळून पाहाण्याची भीति नाही ! " हे नपुसक, षढ केलेले गुलाम किती निरुपद्रवी आहेत हे प्रत्यक्ष दाखविण्याकरता त्याने एका गुलामाच्या तोडात भडकावल्या

तोडात भडकावलेला तो उचापुरा गुलाम इतकाहि प्रतिकार न करता नुसते तोड वेगाडून हसला !

ते पाहून मुक्याला मनात मोठी चीड आली आपल्या मनात कुणाबद्दल चीड जास्त वाटते, हेहि त्याला कळेना–माणसासारख्या माणसाला पशू-प्रमाणे विकणाऱ्या लिलाववाल्याची, का मागणी करीत लिलाव घेण्याची कसोशी करणाऱ्या व्यापाऱ्याची, का आपली एवढी विटबना चालली अस-ताना, एखाद्या दगड–मातीच्या पुतळ्याप्रमाणे, त्यामुळे मनाला एवढीहि क्षिति न वाटणाऱ्या या गलेलठ्ठ गुलामाची 'किती किळसवाणा हा सारा प्रकार !' त्याला वाटले

शेवटी ते न्यूबियन गुलाम एक हजार दिनाराना विकले गेले विकत घणाऱ्या व्यापाऱ्याच्या हस्तकाने त्याना आपल्या हातातील चाबकाच्या दाड्याने ढोशीत आपल्या मागे नेऊन उभे केले

दुसऱ्या गुलामाची तुकडी आणून कट्ट्यावर उभी करीपर्यंत मधल्या वेळात सर्व लोक एकमेकाशी एकदम बोलू लागत त्यामुळे मोठा कोलाहल माजे हलक्या आवाजात बेताने बोलावे वगैरेसारख्या सुधारकी चाली या अरबात नव्हत्या वर मोकळे आकाश आणि आजुबाजूला हवे तेवढे मोठे वाळवट पसरले असल्याने कुणी केवढेहि मोठ्याने बोलला वा ओरडला तरी आवाज त्यात विरून जाई त्यामुळे घशातून निघेल तेवढा आवाज मोठा काढून एकदम बोलण्याची सर्वांची सवय होती लिलाववाल्याने पुढचा लिलाव पुकारला म्हणजे त्याच्या बोलण्याचा कोलाहल कमी होई

लिलाव चालू असताना मध्यतरी जमलेल्या सर्व लोकाचे लक्ष क्षणकाल एका बाजूस वळले कारण त्या बाजूकडून एका मोठ्या उमद्या अरबी घोड्यावर थाटाने बसून एक रुबाबदार अरब शेख आपल्या चार पार

अनुयायासह लिलावाच्या जागी येत होता त्याच्या घोडयाच्या अगावर उची खोगीरे घातलेली होती घोडयाच्या लगामापासून, मानेच्या खाली पुढच्या दोन्ही पायामधून खालच्या पट्टयापर्यंत, भरघोस शेपटीपासून खोगिरापर्यंत, असे जागोजाग ताबडया वा पिवळया रेशमी वस्त्राचे तग बाधले होते त्याची जागोजाग लोबणारी टोके घोडा धावताना वा चालताना वाऱ्यावर मोकळी उडत आणि शोभायमान दिसत आपल्या श्रीमती थाटाची जाणीव जणू-काही त्या घोडयाना असावी अशा कुर्रेबाज वाकडया माना करीत, थुईथुई ठुमकत पावले टाकीत ते घोडे पुढे आले पण त्याच्या घोडयाचा थाटसुद्धा फिका पडेल त्यापुढे, अशा इतमामाने तो अरब घोडेस्वार बसला होता त्याचा अरबी पेहराव आणि झोळणा यानी त्याच्या व्यक्तिमत्वात भर पडत होती त्याची अगोदरच उचीपुरी शरीरयष्टि, घोडयावर स्वार झाल्याने जास्तच उच वाटत होती त्याच्या डाव्या बाजूस लोबणारी लाब बाकदार तलवार आणि त्याच्या चेहऱ्याच्या मधोमध उठून दिसणारे त्याचे मोठे बाकदार नाक याच्यामध्ये पुष्कळच साम्य होते त्या दोहोपैकी जास्त आक-र्षक आणि परिणामकारक शस्त्र कोणते याबद्दल दुमत होऊ शकले असते

आजुबाजूच्या लोकातून निघणाऱ्या उद्‌गारावरून मुक्याला कळले की हाच तो गुलामाचा मोठा व्यापारी, ' शेख अब्द्-एल्-करीम '

इब्राहिमसारखे अनेक हस्तक ज्याच्यासाठी गुलाम निरनिराळया देशा-तून आणीत तो हाच तर ! मुक्याला वाटले की, इतके नीच कर्म करणाऱ्या-चा चेहरामोहरा जर त्याला कोणी कल्पनेने ताडावयास सागितला असता, तर तो फारच निराळा वाटला असता, पण वास्तविक अब्द्-एल्-करीम हा एवढा रुबाबदार आणि सुदर असावा याचे त्याला आश्चर्य वाटले शरीर-सपत्तीची देणगी देताना विधाता काही तारतम्य वापरतो की नाही, याची त्याला शका आली. नाहीतर अशा अघोरी, क्रूर माणसावर आपले निर्माण-कौशल्य वाया घालवण्याचे काय प्रयोजन पडले होते विधात्याला ?

एकामागून एक कितीक तरी गुलाम त्या कट्टयावर लिलावास येत आणि हा हा म्हणता आजुबाजूचे व्यापारी ते विकत घेऊन टाकीत ' आपल्याला कुणी वर्णन करून सागता की, सुधारणेच्या सद्यस्थितीतहि गुलामगिरी जिवत राहिली आहे, एवढच नव्हे तर आपला हिडीस नगा नाच इतक्या उजळ

माथ्यान ती करीत असते, तर आपल्याला ते खर वाटल नसत ! '– मुक्याला वाटले 'हे दृश्य समक्ष डोळ्यादेखत घडताना पाहण ही एका तऱ्हेन जणू काही मोठी सधीच आहे, कारण अशाच बऱ्यावाईट गोष्टी प्रत्यक्ष पाहून नाही का माणसाचे डोळे खरोखर उघडत, जगात काय चालत याबद्दल ! '

अब्द्-एल्-करीम हा जरी स्वत गुलामाचा व्यापारी होता आणि तो स्वत च शेकडो गुलाम पैदा करून आणी आणि विकी, तरी तो स्वत मोठा चोखदळ गिऱ्हाईकहि होता ज्या वेळी कट्टयावर आता गाला जातीच्या मुली विकावयाला उभ्या केल्या, त्या वेळी शेख अब्द्-एल्-करीम हा लिलाव घेण्यासाठी पुढे सरसावला कट्टयावर आणल्या जाणाऱ्या निरनिराळ्या मुली तो एकाद्या हिंस्र श्वापदाच्या, वा बहिरी–ससाण्याच्या पारध करावयाच्या दृष्टीने निरखून पाहात होता त्याच्या दृष्टीत क्रूरता, उन्मत्तपणा आणि विषयलोलुपता याचे गढूळ पाणी चमकत होते

दास्य हे केव्हाहि विटबना करणारेच असते सुसस्कृत माणसे दास्यात पडली म्हणजे झाकले अग उघडे पडावे, अशी लाज त्याना उत्पन्न होते. पण ईशान्य आफ्रिकेतल्या मागासलेल्या जमातीतून ज्या या लोकाना धरून आणले होते, त्याना बिचाऱ्याना आपल्या विटबनेची सुद्धा पुरी जाणीव नव्हती त्याच्याकडचा नेहमीचा पेहराव हाच जेथे अग अर्धनग्न राहील असा होता, तेथे त्याना आपल्या उघडचा अगाकडे लोकानी पाहिल्याने लज्जास्पद काय वाटणार ?

कट्टयावर आणलेल्या अनेक मुलीतून सर्वात एक दोन फार सुदर तरण्याताठ्या मुली आता लिलावासाठी उभ्या केल्या गेल्या होत्या त्याच्या किमतीसाठी एकमेकाहून वरचढ मागण्या देण्यासाठी निरनिराळे व्यापारी अहमहमिकेने पुढे येत होते अब्द्-एल्-करीमने सुरवातीला चकार शब्दहि काढला नव्हता आता त्याने आपला घोडा आजुबाजूच्या गर्दीतून पुढे चालवीत त्या उच कट्टयाच्या लगत नेऊन उभा केला अब्द्-एल्-करीमची तो मोठा रसिक, विचक्षण, पण पसतीसाठी जबर किमत देणारे गिऱ्हाईक म्हणून ख्याति असल्याने, लिलाववाल्याला तो पुढे आल्याने मोठा आनद वाटला इतर व्यापारीहि बाजूस सरून त्याला निर्वेध हिडू देत होते

कट्टयावर उभ्या असलेल्या तरुणी अगदी नव–यौवना होत्या. त्याची मने

कितीहि असस्कृत असली आणि त्या कितीहि रानटी असल्या तरी शरीर-सपदेत आणि सौष्ठवात त्याना काही कमी पडले नव्हते उलट जास्त सृष्टि-सुलभ अशा अर्धवट रानटी अवस्थेत राहिल्याने त्याच्या शरिराची जास्त परिपूर्ण वाढ झाली होती कमरेला सारे एक अपुरे जुनाट पटकूर मात्र गुडाळलेले असल्याने त्याचे शरीरसौष्ठव अगदी होते तसे नजरेस पडत होते. शरीरव्यग वा विद्रुपता झाकण्याचे, वा असलेले शरीरसौन्दर्य जास्त खुलवून दाखविण्याचे कार्य जी वस्त्राभरणे करितात, ती त्याच्या गावीहि नव्हती ! त्याच्या अर्धावृत शरिराकडे पाहून मुक्याला आठवण झाली अर्ध्या सोललेल्या भरघोस कणसाची. शतात कापणीला आलेल्या पिकात उभ्या असलेल्या धान्याच्या ताटावर पक्षानी चोची मारून ओढून कणसाच्या वरची आवरणे सोलावी आणि त्यामधून पिवळे धमक, रसरसलेले कळीदार दाण्याचे सुदर कणीस दिसू लागावे, तशाच त्या दिसत होत्या त्याची अगकाति पिवळट गोरी होती.

अब्द्-एल्-करीम इतका जवळ आला की त्याच्या घोड्याने मान हलवीत आपल्या नाकपुडीने एकीच्या उघड्या पाठीला व खाद्याला स्पर्श केला त्या स्पर्शाने थोडीशी बिचकून अग थरारल्यासारखे झाडून, ती तरुण स्त्री थोडीशी बाजूला सरली त्वचेवर शहारे आल्यासारखे करून तिने आपले खादे उडविले तिचे उरोज हालले डहाळीवरच्या गेददार गहिऱ्या कैऱ्या वाऱ्यानेच जणू काही हेदकाळल्या !

भरल्या तळ्याच्या जलपृष्ठावर तीरावरच्या जाभळीचे फळ अचानक तुटून पडून त्यावर एकदम गोल चक्राकार तरग उठावे तद्वत् तिला झाले इतका वेळ ती जी स्तब्ध उभी होती त्याऐवजी आता तिची गात्रे हलली त्यामुळे अब्द्-एल-करीमला जास्तच मोह पडला असावा तो घोड्यावरून खूप पुढे वाकला आणि त्याने आपल्या हाताने तिच्या डोक्यावरून आणि साऱ्या अगावरून गोजारल्यासारखे केले मग मागे पुन खोगिरात ताठ बसत त्याने किमतीचा एवढा मोठा आकडा उच्चारला की क्षणभर इतर व्यापारी बुचकळ्यात पडले लिलाववाल्याने अब्द्-एल्-करीमची खुशामत करण्याच्या हेतूने चटकन् एक वार, दोन वार, तीन वार करून टाकले आणि लिलाव त्याला दिला ! अब्द्-एल्-करीमने पुन पुढे वाकून त्या गुलाम

स्त्रीला दोन्ही खाद्याखाली हात घालून अल्लद वर उचलले आणि आपल्या घोड्यावर आपल्या पुढ्यात बसवीत तो खदखदून हसला

हा सारा उद्वेगकारक प्रकार इतका वेळ पाहात असलेला मुका मनातल्या मनात चिडून इतका धुमसत होता की त्याचा स्फोट व्हायला फार वेळ लागला नसता चाललेली घडामोड पाहाण्यात त्याला स्वत्वाचा विसर पडला होता म्हणून त्याच्या वरच्या अरब पहारेकऱ्याने जेव्हा कट्ट्यावर नेण्यासाठी मुक्याला पुढे ढोसले त्या वेळी क्षणभर तो चमकला मग त्याच्या लक्षात आले की जी विटबना झालेली आपण इतराच्या बाबतीत इतका वेळ पाहात होतो ती करवून घेण्याची पाळी आता स्वत आपल्यावर आली आहे त्याला त्या इतर गुलामाच्या निष्प्रभ चेहऱ्याची आठवण झाली ते षढ न्यूबियन गुलाम कसे तोड वेगाडून हसले ते त्याला आठवले आणि त्याच्या तापट स्वभावाची नुसती लाहीलाही झाली मुका हा अतिशय निर्भय असे हालअपेष्टाची वा मरणाची भीति त्याच्या मनाला कशी ती नव्हती

अब्द्-एल्-करीम विकत घेतलेल्या दासीला घेऊन निघाला होता पण त्याच्या हस्तकापैकी कुणीतरी मुक्याकडे बोट दाखवून म्हटले असावे, " हाच तो इब्राहीम नाखुद्याच्या पडावावरचा खलाशी ! त्याच्याचमुळ इब्राहिमला पन्नासवर गुलाम समुद्रात फेकून ब्रिटिश युद्धनौकेच्या कचाट्यातून मुष्किलीने निसटाव लागल " ते ऐकन तो मागे थाबला त्याने मुक्याला आपादमस्तक न्याहाळून पाहिले !

लिलाववाल्याने मुक्याचा लिलाव पुकारला होता नेहेमीप्रमाणे पुढे येऊन त्याने मुक्याच्या छातीवर गुद्दा मारला, मुक्याची शक्ति त्याच्या गिऱ्हाइकाना पटविण्यासाठी पण त्याच्या अपेक्षेबाहेर गोष्ट झाली, आणि मुक्याच्या शक्ती-चीच काय पण त्याच्या धैर्याचीहि प्रचीति त्या सर्वाना त्या वेळी पाहाण्यास मिळाली ! मुक्याने मागेपुढे न पाहाता लिलाववाल्याच्या छातीत इतक्या जोराने उलट गुद्दा मारला की तो बिचारा थेरडा तोडातून लिलावाचा शब्दहि बाहेर न पडतां, खोकत खोकत तिरीमिरी येऊन मटकन् खाली बसला गुलामाच्या कट्ट्यावर आजवर कधींच कुणी असें दृश्य पाहिले नव्हते !

खुद्द शेख अब्द्-एल्-करीम चपापून पुढ आला प्रथम थेरड्या लिलाव-वाल्याला ठसकताना पाहून त्याला त्याच्या फजितीचे कमालीचे हसू लोटले.

त्याच्यात विनोदप्रियता होती पण ज्या वेळी त्याने पुन्हा मुक्याकडे पाहिले त्या वेळी त्याच्या नजरेतला क्रूरपणा पुन. परत येऊ लागला कट्टयाच्याजवळ घोडा पुन आणून उभा करीत अब्द्-एल्-करीमने पुढे वाकून तोडात मारण्याच्या इराद्याने मुक्यावर हात उगारला पण मुक्याने न डरता, आपलाहि हात त्याच वेळी वर करून अब्द्-एल्-करीमचे मनगट असे गच्च पकडून दाबले की अब्द्-एल्-करीमलाहि आश्चर्याने पछाडले त्याच्या नजरेस नजर भिडवून मुक्याने पाहिले, आणि शेवटी तुच्छतेने त्याचा पकडलेला हात झिडकारून टाकला यावर अब्द्-एल्-करीमने पुढे वाकून मुक्याच्या अगावरचें फाटके वस्त्र धरून त्याला आपल्यापुढे खेचण्याचा प्रयत्न केला मुक्याने त्यावर आणखी चिडून अब्द्-एल्-करीमच्या डोक्यावरून लोबणारा रेशमी रुमाल खेचून ओढला आणि तो पायदळी फेकून तुडविला अब्द्-एल्-करीमच्या हस्तकानी एवढ्यात घोड्यावरून उतरून मुक्याला घट्ट धरले, आणि अब्द-एल्-करीमने आपल्या कमरेची तलवार उपसून त्वेषाने तिचे टोक मुक्याच्या छातीशी भिडवले तलवारीचे तीक्ष्ण पाते मुक्याच्या छातीत घुसून त्याचा हृदयभेद होण्यास आणखी पळभरहि लागला नसता आणि तसेच जवळ जवळ झाले होते

पण इतक्यात आणखी एक अरब धावत पुढे सरला आणि त्याने अब्द्-एल्-करीमच्या तलवारीच्या मुठीवर पकड घेत ती मागे खेचली आणि अब्द्-एल्-करीमला उद्देशून म्हटले, "असल्या क्षुद्र गुलामाच्या रक्तान आपली तलवार विटाळण शेख अब्द्-एल्-करीमच्या लौकिकाला आणि इभ्रतीला शोभत नाही !"

"माझ्या इभ्रतीची चाड बाळगणारा तू कोण लागून गला आहेस ?" अब्द्-एल्-करीमन विचारल

"तुझी कीर्ति उत्तर आफ्रिकेत ज्यानी ऐकली आहे अशा शेकडो लोकापैकी एक !"

त्या खुशामतीने अब्द्-एल्-करीम थोडा खुलला त्याने विचारले, "आणि तू म्हणतोस त्या माझ्या शेकडो चाहात्याना मी या उर्मट गुलामाची कोणत्या रीतीने वासलात लावलेली आवडेल, तुला वाटत ?"

"त्यान अगोदरच मुक्त केलेल्या तुझ्या पन्नास गुलामाच्या किमतीची भर-

पाई त्याच्या हातून परत मिळवून ! तुझ्या समशेरीला तो बळी पडला तर पन्नासाऐवजी तुझे एक्कावन्न गुलाम निसटले, असे मात्र होईल !"

आपली तलवार मागे घेत अब्द्-एल्-करीम म्हणाला, "अस्स ! या मुक्या गुलामाच्याकडून त्याने मुक्त केलेल्या पन्नास गुलामाची भरपाई मी कशी करावी तुला वाटत ?"

"फारच सोपी गोष्ट !" तो अरब म्हणाला, "एक्कावन्न गुलामाच्या किमतीला त्या मुक्याला वीक"

खदखदा हसून अब्द्-एल्-करीमने विचारले, "असे काय गुण जास्त आहेत या मुक्यात की ज्यासाठी कोणी एवढी जबर किमत द्यावी ?"

"शौर्य ! इतर गुलामात नसलेल शौर्य याच्यात आहे आणि जर गुणी माणसालाच गुण कळतो तर शूर म्हणून नावाजलेल्या शेख अब्द्-एल् करीमला शौर्याची ओळख पटत नाही, अस होईल का ? "

"ठीक ठीक बोललास मी प्रामाणिकपणान कबूल करतो की, या मुक्यात शौर्य आहे त्याच्या जागी उभ्या राहिलेल्या कुणालाहि मी अशा निर्भयतेन वागताना आजवर पाहिलेल नाही पण तो मुका जरी शूर असला, आणि मी शौर्याचा चहाता आहे म्हणूनच त्याची आता गय करत आहे, तरी असा कोण पागल माणूस आहे इथ की तो या एका गुलामासाठी एक्कावन्न गुलामाची किमत देईल ? "

"अल्लाके प्यारे ! या दुनियेत अल्लान तसले पागलहि निर्माण केले आहेत फार लाब कशाला जायला हवे, मीच तसा एक पागल आहे ! आपली खुषी असेल तर मीच ती किमत आपल्याला देऊन या काफर गुलामाला घेऊन जाईन माझ्या जगलच्या शिकारीत त्याचा मला उपयोग होईल "

"ठीक आहे " अब्द्-एल्-करीम म्हणाला, "मला सौदा पटला, त्याच्या पोटात समशेर भोसकण्याच सुख, मी एकावन्न गुलामाच्या किमतीला विकण्याला कबूल आहे आण पैसे इकडे, आणि घेऊन जा त्याला !"

आणि याप्रमाणे जो मुका प्राणाला मुकला असता तो आता या अरबाचा गुलाम झाला ! त्याच्या मागोमाग गुपचूप जाताना मुका मनाशी म्हणाला, "हा अरब इतका पागल असण शक्य नाही ! माझ्या एकट्यासाठी तो एवढी भरमसाट जबर किमत देण्याला का बर उद्युक्त झाला ? त्याच्या

कृत्यात डोळयाला वर वर दिसतो त्यापेक्षा काही खोल हेतु आहे खास आणि याच्यामाग जाण्यान जर तो कळू शकला, तर काय हरकत आहे जायला? "

---

## प्रकरण : ७ – 'लॉरेन्स ऑफ अरेबिआ'चा परिचय !

आलेक्झाड्रिया बदरात जाऊन उतरेपर्यंत मुक्याच्या बरोबर त्याच्या अरब धन्याने शब्द काढला नव्हता स्वत बरोबर त्या अरबाने बोटीवरून मुक्याला आणले होते पण मुक्याकडून कुठल्याहि तऱ्हेने सेवेची वा कामाची त्याने अपेक्षा केली नव्हती तो आपले सर्व काम आपण करी आणि नोकरावाचून पदोपदी अडेल अशा वृत्तीचा वा सवयीचा तो अरब दिसलाच नाही

त्या छोटया सफरीमध्ये मुक्याने मनाशी कितीकदा विचार केला की, 'ज्याला इतक्या स्वावलबनाची सवय आहे अशा या अरबाला गुलाम खरेदी करावयाच काय प्रयोजन होत ? बर, जरी गुलाम हवा असला, तरी माझ्या-साठी दिली तेवढया जबर किमतीत त्याला कित्येक जास्त आणि भरभक्कम गुलाम खरीदता आले असते काहीतरी हेतु असल्याशिवाय विनाकारण कोणीहि एवढी उधळपट्टी करण का सभवेल ? कुठल्यातरी कारस्थानात मारेकऱ्यासारख कुणाच्या घातपाताच काम करावयास माझी योजना करण्या-साठी तर नसेल ना मला या अरबान घेतल ? '

पण जो हेतु समजावून घेण्यासाठी मुक्याने मुकाटयाने त्या अरबाच्या मागो-माग जाण्याचे पत्करले होते, आणि जो हेतु समजण्यासाठी तो आपले डोके सारखे खाजवीत होता, तो त्याला अलेक्झाड्रिया बदरात उतरल्यावर अगदी अकस्मात् समजला हेतु कसला, अरबाचे त्याला खरेदी करणे निर्हेतुक होते हे त्याला समजले ! त्या अरबाने बदरात उतरल्याबरोबर त्याला म्हटले होते, " जा, माझ्याबरोबर आता तुला येण्याच कारण नाही " मुक्यान आपल्याला या म्हणण्याचा बोध झाला नाही असे दाखवले, तेव्हा तो अरब पुन म्हणाला, " जा चालता हो तुला हव तिकड जाण्यास तू मोकळा आहेस तू गुलाम नाहीस ! तू आता मुक्त आहेस ! तुला मी अरबस्तानातच मोकळा सोडतो, तर अब्द्-एल्-करीमच्या माणसानी तुला पुन बदिवान केल असत. केवळ तस

होऊ नये म्हणून मी तुला खुद्द माझ्याबरोबर बोटीवरून तेथून अलेक्झाड्रिया बदरापर्यंत आणण्याच्या भानगडीत पडलो म्हणून आता तुला सागतो की तू अगदी मोकळा आहेस, हव ते करायला, आणि चाहील तिथ जायला " येवढे म्हणून अरबाने अतिशय सद्भावदर्शक स्मित केले

मुका अजून स्तब्धच उभा होता जरी त्याला अरबाच्या बोलण्याचा भावार्थ कळला होता, तरी केवळ निस्वार्थीपणाने कोणीहि व्यक्ति दुसऱ्याच्या मदतीला धावून यावी, ही गोष्टच त्याला एवढी असभाव्य वाटत होती की, ती प्रत्यक्ष घडलेली पाहात असतानाहि त्याचा त्याच्यावर विश्वास बसेना त्याने आजवर जगात अकारण शत्रुत्व, अथवा केवळ सहेतुक मैत्री करणाऱ्या लोकाचा अनुभव घेतला होता पण कोणीहि निर्हेतुक मैत्री करणे, ही गोष्ट त्याला नवी वाटली आणि त्या आश्चर्याने तो स्तभित होऊन उभा राहिला

अरबाने पुन हसून म्हटले, " बरोबर आहे तू थाबला आहेस ते माझ्या लक्षात कस आल नाही ? इतर काही कामधाम मिळेपर्यंत तुला काहीतरी पैसे खर्चाला नि पोटाला लागणार त्याची तरतूद केल्याशिवाय मी तुला जायला सागणे बरोबर नाही —" असे म्हणून त्याने मुक्याच्या हाती आणखीन् चार नाणी ठेवली, आणि तो आपल्या मार्गाने निघून गेला

अलेक्झाड्रियामधल्या एका पाश्चिमात्य हॉटेलामध्ये त्या अरबाने जाऊन वास्तव्य केले सायकाळी तो अरब त्या हॉटेलाच्या उद्यानात आराम खुर्चीवर बसला असताना तो मुका पुन त्याच्या समोर येऊन उभा राहिला. त्याला पाहून या वेळी त्या अरबाच्या तोडून थोड्या चिडक्या स्वरात जे सहजोद्गार निघाले ते अस्खलित इग्रजी भाषेत होते

" डॅम इट् ! ! तू तर अगदी माझा पिच्छाच सोडत नाहीस ! "

आता या खेपेस आश्चर्य करण्याची पाळी अरबाची होती कारण मुक्यानेहि या वेळी तितक्याच अस्खलित इग्रजीमध्ये उत्तर दिले, " होय, तुमच्या वागण्याचे मला एवढे कोडे पडले आहे की, ते सोडवावयाचा प्रयत्न केल्याशिवाय मला पुढे जाववेना ! "

" मग तू मुका नाहीस तर ! केवळ मुक्याचे तू सोग घेतले होतेस एकूण ! "

" बरोबर, जसे इग्रज असून तुम्ही अरब असल्याच सोग केल आहेत, तसच माझ मुक्याच सोग ! "

" कुणी तुला सागितल मी इग्रज आहे म्हणून ?"

" ते शोधायला फारशी अक्कल लागत नाही हॉटेलच्या येणाऱ्या जाणाऱ्या लोकाची नाव नोदविण्याच्या नोदबुकात तुमच नाव ' टी. ई लॉरेन्स ' अस तुम्ही स्वत च लिहून ठेवलेल आहे "

" मग माझ्या मागोमाग येऊन माझा ठावठिकाणा शोधण्याची तुला काय एवढी गरज ? "

" माझा प्राण अब्द्-एल्-करीम घेत असताना पुढ येऊन मला वाचविण्याची, आणि जबर किमतीला मला विकत घेऊन गुलामगिरीतून माझी मुक्तता करण्याची तुम्हाला तरी काय गरज होती ?"

"ते तुला कळण्याची जरूरी मला तर दिसत नाही तू जगूनवाचून मुक्त झालास गुलामगिरीतून, एवढी गोष्ट तुला पुरेशी नाही का ?"

" नाही ! एक तर माझा जीव वाचण्याबद्दल म्हणाल तर मला प्राणाची तमा केव्हाच वाटली नाही केव्हातरी मरावयाचच ! मग ते मरण या घटकेस का त्या घटकेस यात मला एवढाहि फरक वाटत नाही ते येईल तेव्हा येईल अर्थात् माझ्या म्हणण्याचा आशय असा नाही की, तुम्ही माझा जीव वाचवायला जे पुढ धावलात त्या तुमच्या कृत्याची किमत कमी आहे तुमच्या दृष्टीने तुम्ही फार मोठी गोष्ट केलीत मात्र गुलामगिरीतून मला सोडविण्याची तकलीफ तुम्ही का घेतलीत, केवळ परोपकार म्हणून ? कारण तुमच्या उपकाराच ओझ मला फार वाटेल माझा स्वभाव नेहमी अनृणी राहण्याचा म्हणूनच केवळ तुमच्या मागोमाग या हॉटेलमध्ये मी आलो तुम्ही माझ्याबद्दल जी जबर किमत दिलीत ती फेडण या घटकेस मला अर्थातच शक्य नाही पण तुमचा पत्ता कुठ लागेल हे जर तुम्ही मला सागू शकलात तर केव्हा ना केव्हातरी ती रक्कम मी तुम्हाला सव्याज परत करीन शिवाय त्याखेरीज तुमच्या औदार्याबद्दल आणि मदतीबद्दल कृतज्ञतेन फुकाचा एखादा शब्द उच्चारून दाखवावा, ही माझी तुम्हाला भेटावयास येण्यात दुसरी इच्छा होती. '

लॉरेन्सने – कारण तो अरब, पुढे जगप्रसिद्ध झालेल्या ' कर्नल टी. ई. लॉरेन्स ' ऊर्फ ' लॉरेन्स ऑफ अरेबिया ' याखेरीज, दुसरा तिसरा कुणी नव्हता – मुक्याला समोरच्या खुर्चीकडे हाताने खूण करीत म्हटले, " बस

खाली, काय तुझ नाव ? तू बोलतोस ज्या तऱ्हेन त्यावरून वाटत की तू चागला सुसस्कृत, सुशिक्षित गृहस्थ आहेस मग तू या गुलामगिरीच्या सकटात कसा सापडलास ? ”

खुर्चीवर बसत त्याने उत्तर दिले, “ जुन नाव होत ते मी मागच टाकल आणि त्या नावाबरोबरच त्या सोबतचा इतिहासहि माग टाकला मग त्याचा पुनरुच्चार आता कशाला करायचा ? इतके दिवस बिननावानहि माझ काम निभल मात्र आता मी बोलू लागल्यान मला मुका म्हणण हास्यास्पद होईल, हे तर खरच ! तस नावात काय आहे, आणि हवच तर तुम्ही ठेवाल या घटकेला, तेच माझ नाव म्हणून धरून चालायला काही हरकत नाही ! ”

“ ठीक आहे तसच का होईना ज्या अलेक्झाडर बादशहान हे अलेक्झा-ड्रिया शहर वसविल, त्याचच नाव आपण तुला देऊ तुझ नाव आजपासून ‘ शिकदर ’ ”

आणि या वेळेपासून आपणहि त्याला मुका न म्हणता ‘ शिकदर ’ म्हणणे सोयीचे होईल

शिकदर हसला आणि म्हणाला, “ शिकदर ! नाव तर तुम्ही मोठ ऐति-हासिक दिलत मला ! त्या नावानुरूप मोठ व्हावयाच ठरविल एखाद्यान तर त्याला नशीबहि तसच शिकदर असाव लागेल ! ”

लॉरेन्स म्हणाला, “ तुला नाव ठरल, त्यामुळ आता फारसा प्रश्न उरला नाही तुझ्या बाकीच्या गत आयुष्याबद्दल मी तुला प्रश्न विचारीत बसणार नाही कारण तू दिसतोस तसा नसलास आणि त्यामुळ मनात कुतूहल निर्माण झाल तरी माणसान आपल प्रत्येक कुतूहल पुर केलच पाहिजे अस काही नाही माझ्या स्वत वरून पाहाता मला हे कळत की कुणाच्याहिबद्दलची व्यक्तिश माहिती त्यान आपणहून सागितली तर ऐकावी पण मुद्दाम जिज्ञासेन एखाद्या-च्या खाजगी जीवनामध्ये डोकावून बघण रास्त नाही ”

“ पण त्याहिपेक्षा मुख्य गोष्ट म्हणजे माझी जिज्ञासा इजिप्तच्या गत इति-हासाच्या सशोधनावर केन्द्रित झाली असल्यान बाकीच्या बहुतेक गोष्टी मी तूर्त तरी फालतू म्हणून बाजूला टाकीत आहे ”

शिकदरने विचारले, “ इजिप्तच्या गतेतिहासाच सशोधन म्हणजे तुम्ही काय करीत आहा ? ”

"सात हजार वर्षांपूर्वीपासून नाईल नदीच्या तीरावर मानव जातीच्या एका शाखेची जी एक संस्कृति निर्माण झाली, ज्या संस्कृतीनं शास्त्र, कला आणि अध्यात्म या विषयात खूपच पुढं मजल मारली अशा या इजिप्शियन संस्कृतीचं अवलोकन मी सध्या करीत आहे हे अवलोकन करताना मला असं आढळून येत आहे की या विषयात उत्खनन करून संशोधन करण्याला हवा तेवढा वाव आहे पण तू ही चौकशी का करीत आहेस ?" लॉरेन्सने विचारले.

शिकंदर म्हणाला, "तुम्ही मघाशी म्हणालात की मी सुशिक्षित, सुसंस्कृत असावा असा तुमचा तर्क आहे, तो अगदी बरोबर आहे त्यामुळंच इतिहास, पुराण-वस्तु-संशोधन आणि उत्खनन या गोष्टींची मलाहि गोडी वाटते. आणि त्यात तुमच्याबरोबर काम करणं जर साधलं तर ती चांगली गोष्ट होईल त्यामुळं माझ्या स्वतःच्या मनाला एक दिशा उत्पन्न होऊन व्यवधान सापडेल, आणि तुम्हाला मदत केल्यानं तुमच्या पैशाची भरपाई या ना त्या रीतीनं करण्याची मला संधि येईल "

शिकंदर आपणहून पुढे म्हणाला, "माझ्या गत आयुष्याबद्दल तुम्ही आपणहून प्रश्न न विचारण्याचा समजूतदारपणा दाखविलात पण आता मला वाटतं की मी जर तुम्हाला मदत करावयाचं ठरविलं तर तुम्हाला, मी तुमच्या विश्वासास पात्र आहे की नाही, हे ठरवावयास माझी माहिती असणं आवश्यक आहे म्हणून मीच तुम्हाला सांगतो की ज्याला जगाचा वाईट अनुभव सुरुवातीसच आल्यानं जगाबद्दल मन विटलं आहे असा मी एक तरुण आहे ज्या लोकांनी माझ्या बाबतीत अन्याय केला त्याच्याबद्दल वाटणाऱ्या सूडाच्या भावनेनं काही अंशी आपल्या बाबतीत झालेला अन्याय दूर करून घ्यावा अशा भावनेनं मी पूर्वपरिस्थितीवर त्वेषानं लाथ मारून बाहेर पडलेला आहे नशिबाची परीक्षा पाहावी म्हणून बाहेर पडलो, व दैवाचं मार्गदर्शन कसकसं होईल त्याची प्रतीक्षा करीत आहे मला सध्या ना कुणाचा लागाबाधा ना दुसरं काही कर्तव्य सडाफटिंग मोकळा आहे मी इतक्या मोघम सांगितलेल्या माझ्या माहितीवर आपण विश्वास ठेवून मला तुमच्या कामात मदत करू द्यालच अशी अपेक्षा मी करणं बरोबर नाही, पण जर आपण तशी संधि मला दिलीत, तर आपण ठेवलेला विश्वास अनाठायी होणार नाही इतकी मी हमी देऊ शकतो."

लॉरेन्स बराच वेळ शिकदरच्या डोळ्याला डोळा भिडवून पाहात बसला. नेत्र हे अतरगाची खिडकी आहे असे म्हणतात, अशाकरता की माणसाच्या अतरगाची कल्पना बरीचशी त्याच्या डोळ्यावरून होऊ शकते विशेषत लॉरेन्स यास मनुष्यस्वभावाची पारख करण्याचे कसब होते आणि तो नेहमी आपले निदान कितपत बरोबर ठरते याचा ठोकताळा घेऊन पाहात असे हे वारवार करून लॉरेन्स माणसाची प्रथमदर्शनीच परीक्षा करण्यात तरबेज झाला होता शिकदरला गुलामकट्ट्यावरून विकत घेऊन सकटातून सोडविण्याच्या भानगडीत पडण्यापूर्वी लॉरेन्सने त्याची पारख केली होती नेहमीच्या सर्वसाधारण माणसात जमा न होणारा हा प्राणी आहे, याचे पाणी काही न्यारेच असे त्याला वाटले होते जसजसा शिकदरला तो जास्त ओळखू लागला तसतशी त्याची जास्तच खात्री पटू लागली आणि त्याला आढळून आले की आपले सुरुवातीचे निदान बिनचूक आहे लॉरेन्समध्ये द्यूत खेळणाऱ्या माणसाची धडाडी होती केवळ आपली मनोदेवता सागते, एवढ्या एकाच गोष्टीवर तो कोणतीहि गोष्ट पणाला लावू शकला असता केवळ मनाच्या साक्षीवर विसबून केवढीहि उच्च झेप टाकण्यास, आणि धोका पत्करण्यास तो कचरत नसे. नाही तर वास्तविक गुलामकट्ट्यावर विकल्या जाणाऱ्या एका गुलामाच्या जगण्यामरण्याबद्दल लॉरेन्सला पूर्ण बेफिकिरी वाटती तरी त्यात काय बिघडले असते ? पण लॉरेन्सचे हे वैशिष्ट्य होते, की आयुष्यात भेटणाऱ्या अनेकविध व्यक्तीच्यामधून तो खडे आणि मौक्तिक निरनिराळे काढून, गुणवान् माणसाचा परिचय वाढवून सग्रह करी आणि याच दृष्टीने शिकदरकडे पाहून त्याला त्याने जवळ करण्याचे ठरविले होते भरभरा निश्चय करण्याच्या आपल्या सवयीने निश्चय ठरवून मोजक्या शब्दात लॉरेन्सने उत्तर दिले, " ठीक आहे शिकदर ! आजपासून तू मला सहकारी म्हणून मदत करू लाग मी तुला काही पगार देऊ शकणार नाही, पण माझ्या परिभ्रमणात मी जी काही अर्धी कच्ची भाकरी खाईन तिचा अर्धा तुकडा तुला आनदान देऊ शकेन माझ्या फिरस्त्याच्या आयुष्यात तुला भाग घ्यायचा असला, तर माझी आनदान त्याला समति आहे "

अशा तऱ्हेने, नियतीच्या योजनेने दोन फार प्रभावी माणसे एकत्र आली. लॉरेन्स आणि शिकदर या दोघाच्याहि पुढच्या व्यक्तिविकासाचे बीज या

त्याच्या साहचर्यांत होते त्या दोघाचे स्वभाव पुष्कळच समानधर्मी होते एका माळेचे मणी एकत्र येतात ते असे हे दोन समानशील, समवयस्क तरुण एकत्र येऊन त्यानी सहकार्याने पुष्कळ काम केले, आणि ते करीत असताना त्याच्या अगचे विशेष गुण एकमेकाच्या सगतीन जास्तच वाढीस लागले

लॉरेन्सने शिकदरला नवीन वेष खरेदी करून त्याला आपल्याच बरोबर राहाण्यास आता आणले सुरुवातीचे काही आठवडे लॉरेन्सने शिकदरला वाचावयास इजिप्शियन सस्कृति व इतिहास यावर काही ग्रथ दिले, आणि त्याबद्दल ते चर्चा करीत शिकदरची बुद्धि तल्लख तर खरीच त्याच्या लक्षान गोष्टी फार चटकन येत कोठलीहि गोष्ट अभ्यासिताना त्यातील मूलग्राही गोष्ट कोणती हे तो अतिशय चटकन ध्यानात घेई, आणि बाकीचे भारूड निवडून भराभर बाजूस टाकी सूक्ष्मग्राही, मीमासक दृष्टी आणि प्रभावी ग्रहणशक्ति याच्या सहाय्याने शिकदर अभ्यास करू लागला की त्याची गति त्या विषयात हा हा म्हणता होई त्या थोड्या दिवसाच्या अभ्यासातच त्याची झालेली आश्चर्यकारक प्रगति पाहून लॉरेन्सला मोठे समाधान वाटू लागले कारण त्याच्या या विषयावर जेव्हा ते चर्चा करूं लागत त्या वेळी लॉरेन्सला आढळे की सर्व गोष्टीकडे पाहाण्याचा शिकदरचा दृष्टिकोन नेहमी अभूतपूर्व असे त्यामुळे शिकदरशी चर्चा करणे मोठे उद्बोधक आणि मन प्रसन्न करणारे ठरे कुठल्याहि गोष्टीवर त्याचे स्वत चे असे काही तरी निराळे नवीन मत असे आणि पूर्वीच्या सशोधकानी वा इतिहासकारानी उत्पन्न केलेल्या रटाळपणातून व चाकोरीतून बाहेर पडून नवीनच मार्गाने चालू लागण्याची त्याला फार आवड वाटे अशा तऱ्हेने लॉरेन्स आणि शिकदर या दोघानी मिळून इजिप्तच्या प्रागैतिहासिक सस्कृतीचे परिशीलन आणि जुन्या अवशेषाचे उत्खनन व सशोधन सुरू केले

---

## प्रकरण : ८—इसिस देवतेचा साक्षात्कार

जुन्या इतिहास—सशोधनाचे काम जितक्या जिकिरीचे, धीराचे तितकेच चित्तवेधकहि असते. इजिप्तच्या प्राचीन कालातील उत्खननात दग झाल्याला,

दोन अडीच वर्षे होऊन गेलेली शिकदरला कशी ती कळली नाहीत कुठल्याहि विषयामध्ये खोल शिरल्यावर त्यात गोडी उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाही· मग अडीच वर्षांच्या काळात इजिप्तच्या इतिहास–सशोधनात शिकदरचे मन अतिशय रमून गेले यात काही आश्चर्य नाही

मनुष्य-सस्कृति ही नेहमी पाण्याच्या आधारावर वाढते सिधु नदीच्या तीरावर आणि गगा नदीच्या तीरावर ज्याप्रमाणे आर्य सस्कृतीची एक शाखा हिदुस्थानमध्ये वाढली आणि सहस्रो वर्षे वस्ती करून राहिली त्याचप्रमाणे उत्तर आफ्रिका खडात नाईल नदीच्या तीरावर मनुष्यजातीचा एक फाटा मूळ धरून राहिला आणि वाढला ज्या वेळी प्रचड ॲटलाटिस् खड हे भूकप होऊन पृथ्वीच्या पोटात खचले आणि त्यावर समुद्राच्या पाण्याचे आक्रमण होऊन अटलाटिक महासागर त्यावर निर्माण झाला त्याच वेळी सहारा वाळवटाच्या जागी असलेला समुद्र तळ उचलून वर आल्यामुळे तियला समुद्र नाहीसा होऊन तेथे प्रचड रेताड वाळवट उत्पन्न झाले

या रेताड सहारा वाळवटाच्या पूर्व बाजूवर नाईल नदीचा प्रवाह वहात राहून सहारा वाळवटाचे पूर्वेकडील आक्रमण बरेचसे रोखून धरले गेले होते. नाईल नदीच्या खोऱ्यात तिच्या पाण्यावर शेते आणि बागबगीचे लावून माणसे प्राचीन कालापासून वास्तव्य करून राहू लागली पूर्वी उल्लेखिलेल्या ॲटलाटिस् खडातून, ते समुद्रात बुडण्यापूर्वी, त्यापैकी काही लोक याच नाईल नदीच्या खोऱ्यात वसाहत करण्यास आले होते त्याच्याबरोबर त्यानी ॲटलाटिस् खडातल्या धर्मकल्पना, चालीरीति, शास्त्रे, कला आणल्या होत्या त्याहि येथे रूढ झाल्या याप्रमाणे नाईल नदीवर इजिप्शियन सस्कृतीची वाढ झाली.

भूमध्य समुद्रातून पूर्वेकडच्या देशाशी चालणाऱ्या व्यापाराच्या मुख्य केन्द्रावरच हा भूभाग असल्यामुळे इजिप्शियन लोकाचे दळणवळण त्या वेळी पुढारलेल्या राष्ट्राशी चालू राहिले पर्शियन लोक, अरब, ग्रीक आणि रोमन या सर्वांशी इजिप्तचा सबध आला आणि एकमेकाच्या सस्कृतीची छाया एकमेकावर पडल्याशिवाय राहिली नाही इसवी सनापूर्वी तीन हजार वर्षांपासून इसवी सनापूर्वी बाराशेपर्यंत इजिप्शियन सस्कृतीची भरभराट झाली होती.

जगातल्या बहुतेक इतर देशाप्रमाणे इजिप्तमध्येहि अनियत्रित राजसत्ता चालू होती या राजाजवळ शास्त्री आणि कलावान् अशा लोकाचा मोठा

भरणा असे कारण, राजाश्रयावाचून त्या दिवसात या विषयाचा विकास निर्वेध होऊ शकत नसे शास्त्रे आणि कला याची जोपासना होण्याला राजाश्रयामुळे सरक्षण आणि सपत्ति याचा पाठिबा मिळे अशा गुणवान् लोकामध्ये राहिल्याने राजवशातील लोक स्वत हि मोठे गुणवान् बनत त्याचप्रमाणे धर्मसत्ताहि राजाच्याच हाती असल्यामुळे राजाहि इहपरलौकिक अशा दोन्ही बाबतीत सर्वसामर्थ्यवान् व्यक्ति गणली जाई राजाने सुरू केलेल्या दैवताच्या देवळावर उपासनेसाठी उपासक नेमलेले असत धार्मिक सस्कार व तदनुषगिक विधि हे त्याच्या हाती आल्याने या उपासकाना राजाच्या खालोखाल प्रतिष्ठा प्राप्त झाली आणि पुढे पुढे त्याचा परिणाम असा झाला की बाकीच्या सर्वसाधारण प्रजाजनापेक्षा आपण उच्च आहोत, निराळे आहोत व निराळे राहिले पाहिजे अशी भावना उदित होऊन राजवशातील व्यक्ति या स्वत ला देवतातुल्य गणू लागल्या त्याचा इतर लोकाशी सबध येईल तो त्याना आपल्यासाठी राबवन घेण्यापर्यंतच इतर गाई, म्हशी, गुरेढोरे तद्वतच हे बाकीचे त्याचे गुलाम राजाच्या मनिषा पार पाडण्यासाठीच केवळ त्याचा उपयोग त्याच्या जीविताची मालकीहि राजाची राजासाठी त्यानी युद्ध करावे, शिकार करावी, धान्य पेरावे, पाणी शेदावे, त्याच्या सुखासाठी सर्व तऱ्हेने राबावे आणि शेवटी राजाची गैरमर्जी होईल त्या वेळी प्राणास मुकावे हाच त्याचा जीवनक्रम

या थोड्या राजवशातील व्यक्तीनी जादू मत्राच्याहि बाबतीत उपासकाच्या मदतीने खूपच आघाडी मारली निरनिराळ्या देवताचे साप्रदाय सुरू झाले आणि राजवशातील लोक व अतिशय प्रतिष्ठा पावलेले निवडक लोक यानाच या साप्रदायात घेण्याची प्रथा सुरू झाली.

ही सर्व ऐतिहासिक माहिती पडताळून पाहात इजिप्तचे प्राचीन ऐतिहासिक अवशेष पाहात लॉरेन्स आणि शिकदर हे साऱ्या इजिप्तभर हिडत होते त्या त्या प्राचीन ठिकाणी त्यानी कॅम्प करून राहावे, तिथला अभ्यास करावा असा त्याचा दिनक्रम चालू होता आता त्याचा मुक्काम प्राचीन थीब्ज शहराजवळ नाईल नदीच्या ज्या डोगरानी वेष्टिलेल्या दऱ्याखोऱ्यात होता, त्याचे नाव ' राजवशाच खोर ' असे पडलेले होते. त्यामध्ये प्राचीन राजवशातील अनेक राजेराण्याची थडगी, समाध्या आणि छत्र्या बाधलेल्या होत्या. अशाच एका समाधीपाशी त्यानी आपला मुक्काम वाढविला होता. शेजारच्या

डोगरातील एका दरडीजवळ या समाधीचे तोड होते तेथे आल्यापासून या समाधीचे आपण उत्खनन करावे अशी फार इच्छा लॉरेन्सला झाली होती. इतिहास–सशोधन एकदा करू लागल्यावर त्यात एवढी गोडी वाटते आणि त्यातले कुतूहल एवढे वाढते की सशोधन करताना वाटेत येणाऱ्या अनेक अडी-अडचणी बाजूस सारून इतिहासाची गूढे उकलीत, कालाची आवरणे एकएक बाजूला काढीत आपण त्यात किती खोल शिरावे याचा जणू काही माणसाला सुमारच रहात नाही

लॉरेन्सने बरेचसे मजूर या कामावर आता लावले होते रोज सकाळी उठून, दिसू लागल्याबरोबर मजुरासह खणावयाच्या पहारी कुदळी घेऊन या समाधीपाशी ते येत आजूबाजूचे पडलेले दगड, वाळू आणि माती बाजूस हलवीत, समाधीचे भाग एकएक ते मोकळे करीत मग पुन खणू लागत खणतानासुद्धा जपून खणावे लागे कारण खणण्याच्या उत्साहात मौल्यवान् ऐतिहासिक अवशेष फुटून जाऊ नयेत याचीहि काळजी घ्यावी लागे घर कोसळून त्यात गाडली गेलेली माणसे बाहेर काढताना त्याना सोडवून काढण्यास झटणारी माणसे ज्या गर्दीने पण काळजीने पडलेली दगडमाती हलवीत असतात त्याचप्रमाणे यानाहि या ऐतिहासिक उत्खननात करावे लागत होते. आज सकाळपासून ते ज्या दगडाभोवती खरवडीत होते, खणत आणि उकरत होते त्याचे साधे आणि त्या दगडाभोवतालची चौकट त्याना आता दिसू लागली मजुरास बाजूला होण्यास सागून लॉरेन्स पुढे येऊन तो दगड निरखून पाहू लागला त्याच्या चेहऱ्यावर मोठा आनद दिसत होता "पाहिलस शिकदर, आपण फार मोठ्या शोधाच्या किती जवळ आलेले आहोत या राजवशाच्या खोऱ्यातल्या चहूकडे पसरलेल्या समाध्याच्या अवशेषात ही समाधि मात्र इतर लोकाच्या दृष्टीतून इतके दिवस कशी सुटली याच मला आश्चर्य वाटत डोगराच्या दरडीवरून ढासळून खाली पडलेल्या दगडमातीच्या राशीखाली या समाधीच तोड गडप झाल्यान ती लोकाच्या हातून वाचलेली असावी "

"खरच आहे"–शिकदर म्हणाला, "नाहीतर येथील बहुतेक बाकीच्या समाध्या आणि थडगी ही ज्या मामेल्युक शिपायानी आणि इतर चोर दर-

वडेखोरानी जडजवाहिर आणि सपत्ति याच्या आशेन उध्वस्त केली, त्याच्या हातून एवढच एक थडग कुठल सुटावयाला ?"

" सपत्तीची आशा ही एक मोठी दारुण गोष्ट आहे तिच्या नादान सारे लोक वेडावून जातात त्याना सपत्ति मिळविण्याचा एकदा हव्यास लागला की युक्तायुक्ततेचा, बरेवाइटाचा विधिनिषेधच उरत नाही लोक सुधारलेले असोत वा रानटी असोत, त्याना एवढी एकच गोष्ट दिसते की पैशामुळ जगात सर्व गोष्टी प्राप्त होऊ शकतात सपत्ति जवळ असल्यास काही कमी पडत नाही आणि एवढ्या एकाच कल्पनेला उराशी बाळगून त्याना सपत्ति–आणि तीहि चटकन्–मिळविण्याचा हव्यास उत्पन्न होतो मूर्ख बेटे ! सपत्तीचा हव्यास सोडल्यान जीवनाची चव कशी पार बदलते, जीवन-मूल्यात केवढा फरक पडतो, ते याना कस समजावून सागणार ? चमचमीत मसालेदार पदार्थ खाण्याला चटावलेली जीभ साधेसुधे पदार्थ पुढ आल्यावर ज्याप्रमाण आढेवेढे घेते, तद्वत सपत्तीला लालचावलेल्या लोकाची तऱ्हा होते जगात पार्थिव सपत्तीचा हव्यास न धरता साधसुध आणि फार आनदी जीवन माणसाला जगता येत हे समजण्यालाहि ते अपात्र होतात "

त्याच्या वारवार चालणाऱ्या सवादात लॉरेन्सला सपत्तीचा आणि ऐश्वर्या-चा वाटणारा तिटकारा तो इतका सारखा सारखा बोलून दाखवी की शिकदरला त्याचे म्हणणे आता पटू लागले होते कोणी इतर माणसाने केवळ तोडचा उपदेश केला असता तर इतर पुस्तकी ज्ञानाप्रमाणे त्याचा विशेष परिणाम झाला नसता पण लॉरेन्सच्या बाबतीत नुसती 'बोलाचीच कढी नि बोलाचाच भात' अशी स्थिति नसून तो त्याच्या दैनदिन वर्तनात आपल्या मताचा प्रत्यक्ष अगिकार करून दाखवी आपल्याला गुलामगिरीच्या तडाख्या-तून वाचविण्यासाठी एवढी मोठी किमत लॉरेन्सने कशी दिली, याचा उल-गडा शिकदरला आता होऊ लागला होता सपत्तीचे आकर्षण कसे ते लॉरेन्स-ला अजिबात नव्हते हाताने चिचोके अथवा कवड्या मूठभर उचलून द्याव्या अशा बेफिकिरीने तो खर्च करी पैशाबद्दलची ही बेफिकिरी सपत्तीचा अखड साठा जवळ असल्यामुळे निर्माण झालेली नव्हती, कारण लॉरेन्सच्या जवळ अशी काही फार मोठी माया नव्हती त्याच्या साध्या रहाणीला आणि उच्च विचारसरणीला जेवढे लागेल, तेवढेच तो मिळवी. आणि जरी

काही जास्त मिळाले तरी असे जास्त पैसे कुठल्याहि परोपकारी कामावर सढळ हाताने खर्च करून टाको सपत्ति हे केवळ साधन आहे, साध्य नव्हे, हे तो ज्याप्रमाणे तोडाने म्हणे, त्याचप्रमाणे प्रत्यक्ष आचरणातहि दाखवी. लॉरेन्सच्या सापत्तिक निरिच्छेची छाया हळुहळू शिकदरवरहि पडू लागली

" चला, आज पुढे खणून हा गुहेच्या तोडावरचा दगड हलवला पाहिजे. या गुहेच्या आत आपल्या सशोधनाला काय नव नव खाद्य सापडेल, या कल्पनेनहि मला उत्साहाच केवढ भरत येत आहे ! "–शिकदर म्हणाला

तोडावरची शिळा मोठ्या प्रयासाने ज्या वेळी त्यानी खणून बाजूला सरकवली, त्या वेळी उत्साहाच्या भरात त्या दोघानी त्या गुहेच्या आत एकदम प्रवेश केला पण तितक्याच जलद त्याना बाहेरहि यावे लागले वर्षानुवर्षे तोड बद असल्यामुळे त्या गुहेच्या आतली कोदट हवा इतकी कुबट झाली होती की ती गुहा थोडा वेळ उघडून ठेवल्याशिवाय तिच्यात शिरून काम करणे शक्य झाले नसते मजुराच्या करवी मेणबत्त्या लावून गुहेमध्ये उजेडासाठी नेवून ठेवल्या खऱ्या, पण शेकडो वर्षे बद असल्यामुळे कुबट झालेल्या त्या वातावरणात प्रथम त्याच्या ज्वलनालाहि पुरेसा प्राणवायु मिळत नव्हता स्वच्छ हवा आत जाण्याची वाट पहात गुहेचे तोड उघडे ठेवून ते बाहेर तिष्ठत बसले, तेव्हा शिकदरने एक नवीनच शका उपस्थित केली तो म्हणाला, " तू इतका वेळ मामेल्युक शिपायानी या जुन्या कबरस्थानावर केलेल्या हल्ल्याची गोष्ट सागत होतास ते सपत्तीच्या लालचीने प्रेरित झाले होते तुला आणि मला सपत्तीची हाव नसली तरी आपणहि एक जुनी कबर आता नाही का उघडून पाहाण्यास उद्युक्त झालेलो ? "

त्याच्या अडीच वर्षाच्या परिचयात त्याची एवढी मैत्री आता झाली होती की मित्रत्वाच्या नात्याने शिकदर आणि लॉरेन्स हे एकमेकाना 'अरे तुरे' करून सबोधीत

" त्या चोर दरवडेखोराना सपत्तीची हाव असली, तर आपणाला ज्ञानसपत्तीची हाव आहे पण कोणत्याहि का हेतून आपण प्रेरित झालेले असो, त्याचा परिणाम एकच नाही का ? ही समाधि ज्या व्यक्तीची आहे तिच्या दृष्टीन पाहाता, समाधि भ्रष्ट झाल्याशिवाय राहात नाही तिला आपल्या हेतूच्या भलेवाईटपणामुळ काही फरक होत नाही. "

लॉरेन्सने यावर काही उत्तर दिले नाही म्हणून शिकदर पुढे म्हणतो "आपल्या या सध्याच्या सशोधन-कार्यात जरी मला मोठ कुतूहल निर्माण झाल आहे, आणि ही समाधि पुरी उघडून पाहिल्यावर त्यातून काय काय नव्या गोष्टी उघडकीस येतात, जुन्या इतिहासावर कोणता नवा प्रकाश पडतो हे पाहाण्याची उत्सुकता वाटत आहे, तरी राहून राहून माझ्या मनात अदेशा येऊ लागला आहे की आपल्याला ज्ञान व्हाव म्हणून एखाद्या व्यक्तीच्या खासगत वा त्याला सोवळ्या, पवित्र वाटणाऱ्या समाधीच्या उत्खननाचा आपल्याला काय अधिकार पोचतो ?"

"समाधि ज्या इजिप्त सरकारच्या हुकमतीखालील प्रदेशात आहे त्या सरकारची परवानगी मी सशोधनासाठी घेतलेली आहे मी पुराण-वस्तु-सशोधक आहे हे सरकारात माहीत आहे पण ज्याची समाधि असेल त्याची परवानगी विचारण हे मात्र अर्थात् अशक्य ! कुणास ठाऊक तीन हजार का किती वर्षापूर्वी त्यान आपली ही समाधि मरणाअगोदर करवून घेतली असेल मलाहि त्याच्या परवानगीसाठी भूतकाळात जाता येत नाही, की त्यालाहि वर्तमानकाळात येता यायच नाही !"

"तुला भूतकाळात जाता येण शक्य नाही हे खर, पण तो मृतात्मा वर्तमानकाळात असू शकत नाही अस म्हणण्याला आपणाजवळ काय पुरावा आहे ? एवढ्या सायासान समाधि बाधविण्याच आणि आपल्या पश्चात् आपल कलेवर परोपरीच्या तत्रानी, मसाले भरून, गुडाळून जपून ठेवविण्याची व्यवस्था करायच काय कारण असेल त्याना ? – आपल्या आत्म्याचा जगातला सबध ज्या कलेवरामुळ शक्य झाला, तो दुवा अभग राहावा म्हणून का असेल ? तस असेल तर त्या शरिराच्या सुरक्षिततेची त्या आत्म्याला मोठी काळजी वाटेल !"

लॉरेन्सला हा नवा फाटा फुटलेला अगदी रुचत नव्हता, पण या नव्या दिशेने विचार केल्यावर त्यातहि काही तथ्य आहे हे त्याला कबूल करणे भाग होते

"आपल आयुष्य मर्यादित असल्यान आपण त्या छोट्या कालखडाला फार महत्त्व देतो, नित्याचे छोटे छोटे विभाग करून सवत्सरानी कालगणना करतो. पण या डोगर पर्वताच्या भाषेत सवत्सराना कुठल महत्त्व असणार ?

सृष्टीच्या उलाढालीत शतकाच्या नि सहस्राब्दाच्या मापान कालगणना होते• मग कुणास ठाऊक या समाधीत ठेवलेल्या शरिराचा धनी, त्याच्या मृत्यू-नत्तरच्या अतींद्रिय व अशरीरि स्थितीत कालगतीने इतका दृढ बाधला असतो की नाही. खुद्द आपण या क्षणी ममाधीच्या उत्खननाच्या युक्तायुक्ततेबद्दल चर्चा करीत असतानाच तो अशरीरि आत्मा इथच उपस्थित राहून आपल सभाषण फार लक्षपूर्वक ऐकत नसेल कशावरून ?"

"असेलसुद्धा ! कुणी म्हणाव नाही म्हणून ? "

लॉरेन्स म्हणाला, "पण जरी हजर असला तो इथ, आणि आपला त्याचा सवाद होण शक्यकोटीत आल तरी तो आपण होऊन स्वत ची समाधि उघडा म्हणून आपल्याला परवानगी देण मात्र सभवत नाही !"

"उलट जी समाधि त्यान आपल्या हयातीत एवढ्या कष्टान बाधविली असेल, ती उध्वस्त करून, त्याच्या कलेवराच्या या कबरस्थानची आपण करीत असलेली विटबना तो मोठ्या दु खान व वैतागान पाहात असेल ! लॉरेन्स ! मी तर बोलून चालून धर्मान हिंदु आहे आमच्यात मृत्यूनतर आमच कलेवर अग्निसस्कार करून अजिबात नष्टच करण्याची पद्धत आहे चितेत भस्म होऊन उरलेल्या अस्थि जवळच्या मोठ्या नदीत टाकून देतात, तर चितेतील रक्षा वाऱ्यावर उधळून कणाकणानी सर्वश पसरून आजुबाजूच्या मातीत पुरे-पूर मिसळून जाते तेव्हा मी मेल्यानतर मला तरी माझ्या समाधीची विटबना कुणी केल्याच दु ख होण्याची शक्यता नाही. पण तुझ्या बाबतीत मात्र तस नाही तुझी समाधि तू कसा दिसत होतास हे पाहाण्याच्या इच्छेन कोणी खणन काढू लागला, तर कस वाटेल ? "

लॉरेन्स हसून म्हणाला,—"इतका कुणाला माझी माहितो काढण्याचा पुळका आला तर त्याला माझे फोटो पाहाता येतील ! माझ्याबद्दलची माहिती, मला ओळखणाऱ्या लोकाच्याकडून जमविता येईल"

"हा, तेच तेच मी म्हणत आहे, की या विशिष्ट व्यक्तीला जर स्वत ची माहिती देण्यासाठी त्या कालात फोटो वा चरित्रग्रथ ठेवण्याच साधन उप-लब्ध नसल तर त्यासाठी त्याची समाधीच आपण उखडावी काय ? आणि शिवाय तू व मी त्या व्यक्तीबद्दलच्या केवळ आपलेपणान वा प्रेमान प्रेरित

झालो नसून, त्या कालखडाची लोकस्थिति, रीतिरिवाज याबद्दलची माहिती आपणास ही समाधि उघडल्यान उपलब्ध होईल, अशा हेतून "

" वा ! माझी समाधि कोणी भविष्यकालात इतिहास-सशोधनाला मदत म्हणून उघडली तर मला स्वत ला व्यक्तिश आनदच होईल माझ्यामुळ जर जगाच ज्ञान वाढू शकल तर त्यामुळ माझी कितीहि विटबना झाली तरी मला वाईट वाटणार नाही !"

" तू स्वत इतिहाससशोधक आणि उदारमतवादी असल्यान तू अस म्हणतोस पण व्यक्तीची समति असताना त्याचा उपयोग इतरानी ज्ञान सपादण्यात एक साधन म्हणून करण बरोबर, ही भूमिका एकदा पत्करली म्हणजे तिच्याच अनुषगान ज्याची अशी खुषी नसेल त्याचा उपयोग इतर लोकानी अशा तऱ्हेन करण ही अयोग्य गोष्ट, अस नाही का ठरत ? आणि आपण ज्याची समाधि पुराणवस्तु-सशोधनाच्या हेतून उघडीत आहो, त्याची या गोष्टीस संमति नसली तर आपण त्याच्या इच्छेला मान देऊन उत्खननाच काम थोपवायच काय ? का त्याची इच्छा धाब्यावर बसवून केवळ ज्ञानार्जनावर दृष्टि ठेवून उत्खनन करत राहावयाच ? "

याच प्रश्नाची 'भवति न भवति' करीत त्या दिवशी ते झोपी गेले त्याविषयाखेरीज बोलावयास त्याना दुसरा विषय नव्हता

दुसरे दिवशी पहाटे लॉरेन्सला शिकदरने हलवून जागे केले " उठ लौकर लॉरेन्स ! मला तुला काही सागावयाच आहे आली का जाग, तुला? समजत आहे का तुला, मी काय म्हणतो ते ? " त्याच्या हलवून हलवून पुन पुन्हा जागे करण्याने लॉरेन्स शेवटी उठून बसला आणि डोळे चोळत म्हणाला, एवढी कोणची महत्त्वाची गोष्ट एकदम उत्पन्न झाली की जी आणखी काही वेळ थाबू शकली नसती ? "

" तेच तर तुला मी सागणार आहे मात्र मी सागणार आहे ते तू फार लक्षपूर्वक ऐकल पाहिजेस विचारता उपयोगी नाही म्हणून म्हणत आहे, तू पुरा जागा झालास का ? "

लॉरेन्स उठून बसल्यावर शिकदरने आपल्या स्वप्नात झालेला साक्षात्कार सविस्तर वर्णन करून सागितला

" इजिप्तच्या प्रागैतिहासिक कालामध्ये मी होतो मी कोणत्या शहरात

होतो त्याच नाव मला कळल नाही, पण नाईल नदीच्या तीरावर वसलेल ते शहर होत शहरातील लोक गौरवर्ण असून शरीरान ते नाजुक व खुजे होते त्याच्या अगावर फारशी वस्त्र नव्हती मुरुमाच्या बाधलेल्या घरामधून ते राहात होते शहराचे रस्ते निरुद होते, आणि त्यावर ढोपरभर तरी धूळ होती शहराच्या रस्त्यातून मी चाललो होतो ते का आणि कुठ याची मला बरोबर जाणीव नव्हती एवढच नव्हे तर मी पाहिलेल्या स्वप्नदृश्याच्या वेळी मला कोणतीहि गोष्ट दिसली तरी ती तशी का असावी याबद्दल माझ्या मनात शका आली नाही दिसणाऱ्या सर्व गोष्टी त्या तशाच असावयाच्या, त्या आहेत तशाच असणार अशा बुद्धीन पाहात होतो

" रस्त्यावरून मी जात असताना, अनेक लोक ज्या देवळाकडे चालले होते तिकडे मीहि चाललो ते मदिर इसिस् देवतेच होत देवालय भल मोठ असून चुनखडीच्या दगडाच्या मोठमोठ्या चौकोनी दगडान त्याची बाधणी केलेली होती मोठमोठाल्या भिती, कमानी आणि खाब जागोजाग होते भितीच्या दगडावर आणि खाबावर पुष्कळ खोदकाम केलेल होत खोदून काढलेली ही सर्व चित्र एकाच विषयासबधाची होती, आणि तो विषय म्हणजे त्या वेळच्या लोकाच जीवनचित्रण लोक आपापल्या निरनिराळ्या उद्योगात गुतलेले या चित्रामध्ये दाखविलेले होते नाईल नदीच्या पात्रातून कालवे बाधून शेतकरी आपल्या शेताना पाणी लावताना दाखविलेले होते तर इतर कोणी रहाटानं अथवा ' शाडूफ ' न नदीच पाणी तीरावर उच असलेल्या बागेतील झाडाना घालण्यासाठी चढवीत होते शेतामधून आलेल्या धान्यावरची पाखर गोफणीन उडविताना माणस दाखविलेली होती बगीचामधून काढलेल्या फळफळावळीच्या करड्या डोक्यावर घेऊन नोकर माणस राकेन चाललेली दाखविली होती त्याखेरीज निरनिराळ्या देवताची चित्रहि दिसत होती बागुरड्याच तोड असलेला ' खेप्रे ', बहिरी ससाण्याच्या तोडाचा ' हार अरुती ', गिधाडाच्या आकृतीचा ' नेरवबेट् ', अशा अनेक लहान मोठ्या देवताची ती चित्र होती त्याखेरीज वापरल्या जाणाऱ्या निरनिराळ्या आयुधाच्या आकृत्याहि काढलेल्या होत्या ती सर्व चित्र पाहून सहजच ध्यानात येत होत की लोकाच सर्व आयुष्य अगदी साध्यासुध्या अशा शेतकी आणि पारध करून उपजीविका करण्याच्या व्यवसायाभोवतालीच गुरफटलेल होत. बहुतेक सर्व वेळात

जीवनोपयोगी कार्यं करावयाची आणि उरलेला सर्व वेळ निरनिराळ्या लहान-मोठ्या देवताच्या उपासनेत घालवावयाचा अशोच पद्धत दिसली.

" या इसिस्च्या देवळाच्या मध्यभागी फार मोठा सभामडप होता आणि त्यामध्ये बहुजन येत-जात होते परतु सभामडपाच्या पलीकड असलेल्या छोटचा दालनात त्या सान्याना प्रवेश नव्हता

" त्या देवतेचा उपासक माझ्यापर्यंत आला आणि माझ्या खाद्यावर स्पर्श करून त्यान मला मात्र आत पुढ चलण्याविषयी खुणाविल मी आतापर्यंत जे लोक पाहिले त्यापेक्षा हा उपासक फारच निराळा वाटला तो जास्त उचा पुरा होता इतकच नव्हे तर इतर लोकाच्यापेक्षा त्यान घातलेले कपडे जास्त मौल्यवान्, उत्तम कारागिरीचे आणि रगीबेरगो होते त्यान अगात घातलेल्या जाकिटासारख्या वस्त्रावर चित्रविचित्र आकृति काढलेल्या होत्या गळचात निरनिराळ्या तऱ्हेच्या माळा, हातादडामध्ये निरनिराळ्या प्रकारचे गडे आणि ताईत बाधलेले होते, तर डोक्यावर केसावरून दुमडून माग घातलेला व कानापाशी घडी पाडून खाद्यावर लोबता सोडलेला साफा होता त्याच्याकडे पाहून तेव्हाच कळत होत की याच्या हाती मोठा अधिकार असला पाहिजे त्याच्या मागोमाग आत गेल्यावर त्यान मला एका मोठ्या मूर्तीपुढ उभ केल

" तो माझ्याशी कोणत्या भाषेत बोलत होता हे मला खरोखर आता समजत नाही, पण तो माझ्याशी बोलत होता त्याचा आशय मला आणि माझ्या बोलण्याचा आशय त्याला उत्तम समजत होता हे मात्र खर "

तो म्हणाला, " मी तुझी वाटच पहात होतो तू थोडा उशीर लावलास "

" मी येणार म्हणून तुला कुणी सागितल ? " मी विचारल

" मला तसा दृष्टात झाला " तो म्हणाला. " मला असा दृष्टात होऊन नेहमी सर्व कळत."

" माझ्याबद्दल काय दृष्टात झाला तुला ? "

" इसिस् देवतेच्या साप्रदायाची तुला दीक्षा द्यावी अशी मला आज्ञा झाली अशी आज्ञा झाल्यावर दीक्षा मिळणारा माणूस आपण होऊन माझ्याकडे चालत येतो परदेशस्थ लोकापैकी ही दीक्षा घेण्यास आज्ञापिलेल्यापैकी अनक लोक असे येऊन गेलेले आहेत. इसिस् साप्रदायाची दीक्षा मिळण हा

मोठा मान आहे ही मोठी महद्भाग्याची गोष्ट आहे या आमच्या सहस्रावधि लोकापैकी फारच थोड्याच्या नशिबी हे भाग्य असत फार योग्यतेस चढलेले लोक, राजवशातील लोक आणि परकीय लोकाच्यापैकी अगदी वेचक प्रसिद्ध मडळी तेवढी या साप्रदायात घेतली जातात या साप्रदायात आलेल्या थोड्या परस्थ लोकापैकी प्लेटो, पायथॅगोरस, लुकर्गस, थेल्स, प्लूटार्क, हेरोडोटस्, होमर या प्रसिद्ध पुरुषाची नाव तू इतिहासात वाचलीच असशील "

" या ऐतिहासिक पुरुषात गणना करण्यासारख मी तर काही केलेल मला आठवत नाही मग या साप्रदायाची दीक्षा मला द्यावी हे तुम्ही कस ठरविता?"

त्या उपासकान उत्तर दिल, 'ते ठरविण्याचा अधिकार माझा नाही मला आज्ञा मिळते ती इसिस देवतेपासून ती मिळाल्यावर ती का मिळाली हा विचार मी करण बरोबर नाही. कारण बोलून चालून तू आपल्या पूर्वायुष्यात काय पुण्य केलस वा पुढ तू काय करणार आहेस, तुझी योग्यता केवढी, हे समजायला मत्रसामर्थ्याची अधिष्ठात्री आणि त्रिकालज्ञ इसिस देवता समर्थ आहे अर्थात् साप्रदायाची दीक्षा घेण्याची तुझी इच्छा नसली तर मात्र तुझ्या इच्छेविरुद्ध दीक्षा मी देणार नाही "

मी त्या वेळी 'हो' म्हणाव अथवा 'नाही' अशाबद्दल काहीच विचार केल्याच मला स्मरत नाही ओघान आलेली गोष्ट करावी तद्वत् मी 'हो' म्हटल असाव कारण त्या उपासकान मला दीक्षा देण्यासाठी इसिस्च्या मदिरात् मुख्य गाभाऱ्याखालच्या तळघरात नेल त्या तळघरात इतका अधार होता की, मला तिथ काहीच दिसत नव्हत मात्र तळघरात जमलेल्या अनेक साप्रदायानुयायाची गडबड ऐकू येत होती त्या उपासकान मला तेथल्या एका उच जोत्यावर निजविल जोत्याभवती उदासारख्या सुवासिक धूपाची धुपाटणी लावून ठेवली त्यामधून निघणारा धूर माझ्या भोवताली पसरत होता माझ्या कानी, तिथ जमलेल्या साप्रदायानुयायानी सुरू केलेला मत्रजागर पडू लागला. त्या धूपान असो वा मत्रजागरान असो माझी गात्र मुग्या आल्याप्रमाण होऊन हलके हलके जड झाली माझी शुद्ध गेली अस म्हणण अगदी बरोबर होणार नाही, कारण जरी लौकरच माझ शरीर निश्चेष्ट होऊन, माझ्या भोवतालच्या लोकाची व त्या तळघराची मला शुद्ध राहिली नाही तरी मी दुसऱ्याच एका वातावरणात जागा होऊन नवीन नवीन गोष्टी पाहात असल्याच भान

मला होत या नव्या वातावरणात तळघरातल्याप्रमाण अधार नसून मला आता स्वच्छ दिसू लागल होत आश्चर्याची गोष्ट ही की, जोत्यावर मला पूर्वी निजविल होन अस मला वाटल, त्यावर माझा पार्थिव देह एखाद्या कलेवरासारखा अचेतन पसरलेला होता पण याहि नव्या अतीद्रिय सृष्टीत माझ्याबरोबर तो उपासक वाटाड्या होता त्यान मला म्हटल, “ पाहिलस का ते तुझे पार्थिव शरीर ? त्या सृष्टीत असताना तुझ्या ज्ञानसपादनाला त्या पार्थिव शरिराच्या मर्यादा पडतात शब्द, स्पर्श, रूप, रस, गध ही तुझ्या ज्ञानार्जनाची पचसाधने त्या शरिराच्या पचेन्द्रियावर अवलबून असतात म्हणून त्या गात्राच्या मर्यादा त्या तुझ्या ज्ञानार्जनाच्या मर्यादा ब्रह्मज्ञान हे एवढ मोठ आहे की, पचेन्द्रियानी ते कणश सपादन करताना मनुष्य-जन्म फार अपुरा पडतो चुकत माकत शेकडो वर्षाच्या अनुभवानी व कष्टानी हे ज्ञान सपादन करण्याऐवजी, सर्व ज्ञान अल्पावधीत करून घेण्याची या साप्रदायाची दीक्षा ही एक पद्धत आहे ज्ञान ही सर्वात मोठी शक्ति आहे हे जर खर, तर ती शक्ति दान करताना घेणाराची पात्रता माहीत असल्याशिवाय तिच दान करण योग्य होणार नाही, हेहि तितकच खर नाही काय ? पण केवळ ज्ञानानहि माणूस शहाणा होतो अस नाही कारण, माणसाच्या प्रवृत्तीवर तो त्या ज्ञानशक्तीचा काय उपयोग करील हे अवलबून असत सत्प्रवृत्ताच्या हाती ज्ञानदीप असला तर तो अनेकाची जीवन त्या दीप्तीन उज्ज्वल आणि आनदी करील, उलट दुष्प्रवृत्त असला तर त्या शक्तीचा स्वार्थाकरिता इतरावर हुकमत मिळविण्यासाठी दुरुपयोग करील म्हणूनच ज्याच्या सत्प्रवृत्तीबद्दल बालबाल खात्री पटलेली आहे अशाच व्यक्तीना, त्याना जगाच्या उपयोगी पडण्याच्या कामात जास्त कार्यक्षम करता याव, असत्याशी चाललेल्या सत्याच्या नित्य झगड्यात सत्याची बाजू प्रभावी आणि बळकट व्हावी म्हणून ही दीक्षा दिली जाते त्या तुझ्या अचेतन शरिरातून तुझा आत्मा सध्या मुक्त करून या दीक्षेसाठी या अशरीरि सृष्टीत आणला आहे आता पुन एकदा तुला विचारतो की, या साप्रदायाची दीक्षा घेण्याची तुझी इच्छा आहे का ? नसली तर अजूनहि तुला माघार घेता येईल पण ज्याप्रमाण मुमुक्षूचा मार्ग हा एखाद्या तारेवरच्या कसरतीप्रमाण अत्यत अरुद आणि कठिण आहे, आणि त्या मार्गापासून ढळल्यास अध पात आणि नाश हा ठरलेला असतो, त्याप्रमाणच ही दीक्षा

घेतल्यावर तुला नियमबद्ध जीवन कठाव लागेल विचार, उच्चार आणि आचार या सर्वच बाबतीत तुजवर मर्यादा पडतील हे असिधाराव्रत आहे. आहे का तुझी खुषी ? ”

मी चटकन् 'हो' म्हटल नाही कारण माझ्या मनात एक कुशका आली होती मी ज्या आर्यावर्तात जन्मलो नि वाढलो तेथे खुद्द हिदु धर्मात अनेक देवता आणि पथ आहेत त्याशिवाय हिमालयाच्या गिरिकुहरात अनेक योगी योगसाधन आणि ज्ञानसाधन करीत बसलेले माझ्या ऐकिवात होते मग माझा देश धर्म सोडून मी या इजिप्त देशामध्ये पुरातन काली रूढ असलेल्या साप्रदायाचा अगिकार का करावा ? माझी शका जणू काही मी न उद्गारताच समजून तो उपासक हसला आणि म्हणाला, “ सूर्य, चद्र, आकाशगगा वा विद्युल्लता या पृथ्वीवरच्या निरनिराळ्या देशात का निरनिराळ्या दिसतात ? देशोदेशीचे लोक निराळे असले, ते निरनिराळ्या भाषात एकमेकाशी बोलले, तरी त्याच सर्व जीवन, इतकच काय, इतर सर्व प्राणिमात्राच आणि वस्तुजाताच जीवन ज्या त्रिकालाबाधित सृष्टिसत्यावर आधारलेल आहे ती सत्य काही निरनिराळी असत नाहीत ती सर्व ठिकाणी सारखीच असतात तेव्हा तुझ्या मनात आलेला आदेशा बरोबर नाही ”

मी 'हो' म्हटल, आणि उपासकान म्हटल, “तथास्तु ! मग मला जाणीव झाली की, माझ्या समोर आकाशात जगू काही एखाद्या प्रचड देवालयाची द्वार दिसू लागली त्याच्या प्रचडतेन आणि भव्यतेन मी चकित झालो. त्या महाद्वाराभोवताली अनेक इद्रधनुष्य उमटली होती त्याच्या कमानी एकावर एक उभ्या होत गेल्या होत्या आकाशाच्या निळ्या रगापासून मध्यबिदूकडे साती रगाच्या छटा एकमेकात अल्लद मिसळत गेल्या होत्या महाद्वारातील प्रभा प्रथम ताबूस होती ती बदलून पिवळी, सोनेरी अशी होत होत शेवटी सूर्याप्रमाण दीप्तिमान झाली माझे डोळे त्या दिव्य तेजापुढ दिपून बद कसे होत नाहीत अस क्षणभर मला नवल वाटल. पण मग माझ्या लक्षात एकदम आल की मी माझ्या नेहमीच्या नेत्रानी पाहात नव्हतो.

त्या अतीद्रिय सृष्टीमध्ये विचारलहरी उठत त्या अगदी स्पष्ट व खुल्याखुल्या देखाव्याप्रमाण असत मात्र डोळ्याना दिसण्याऐवजीं, माझ्या मनाला त्यांची जाणीव सहज आपोआप होई. विचारांची उत्पत्ति आणि त्याच आक-

लन विनासायासान एकदमच घडे शब्दाच्या व नेत्रेद्रियाच्या माध्यमावाचून बोध होत होता !

मी यापुढे पाहिलेल्या दृश्याचे वर्णन शब्दामध्ये स्पष्टतेने व यथार्थपणाने करू शकणार नाही. कारण बोलून चालून अतीद्रिय गोष्टी केवळ इद्रियसुलभ भाषेत मी कशा माडू शकू ? पण जे काही दिसले, त्याचे शक्य होईल ते वर्णन मी सागत आहे

माझ्या ध्यानात आले की काहीतरी मोठा प्रसग घडलेला होता मनाशी वर्णन केल्याप्रमाणे अनेक लोक जमलेले होते कुठला तरी दु खाचा प्रसग असावा. मग मला दिसले की इजिप्तचा कोणी एक राजपुत्र मृत झाला होता त्याच्या अत्यविधीची सारी तयारी चाललेली होती त्या राजपुत्राचे कलेवर खेरहेब नावाच्या विद्वान् पुजाऱ्याच्या हवाली केलेले होते त्यानी त्या कलेवराची प्रथम सारी आतडी काढून टाकली आणि मग ते कलेवर सज्जीखारामध्ये कितीक वेळ बुडवून ठेवले होते त्यातून बाहेर काढल्यावर त्या देहाला एका तऱ्हेचे डाबरासारखे रोगण त्यानी लावले काचेच्या एनॅमलप्रमाणे त्या रोगणातून त्या राजपुत्राची मूळची काति न बदलता पूर्वीप्रमाणेच दिसत होती तो राजपुत्र अठरा एकोणीस वर्षे वयाचाच सारा होता त्याच्या चेहऱ्यावरचे गर्भश्रीमतीचे तेज व तरुणपणचा कोवळेपणा अजून दिसत होता. इतक्या कोवळ्या वयातच तो मृत्युमुखी का पडावा, हा मला प्रश्न पडला. मग माझ्या सहज ध्यानात आले की राजवशातील ख्यालीखुशाली, चैनबाजी याच्या बेताल वातावरणात तो वाढला होता अति लहान वयापासूनच कुसगति लागल्यामुळे बाल्यावस्थेतूनच त्याला व्यसने लागली आणि त्यातच क्षयरोगाने तो ग्रासला होता. अनियत्रित बेलगाम ऐश्वर्याचा तो एक वाईट नमुना होता अप्रतिहत सत्ता योग्य तऱ्हेने न वापरल्यास राजवशाचा कसा अध पात होत जातो, याचे ते एक उदाहरण होते. तो राजपुत्र क्षयाने कमकुवत होऊन मेला खरा पण व्यसनाना चटावलेली त्याची उपभोगेच्छा अजून शमली नव्हती. मध्येच मृत्यूमुळे सुखसेवनात व्यत्यय आलेला त्याला रुचत नव्हता म्हणून मृतशय्येवर तो पडलेला असताना वैद्याचा आपणाला बरे करण्यासाठी काही उपाय चालत नाही, असे पाहून त्याने मान्त्रिक पुजाऱ्याना पाचारण केले होते. ही मत्रविद्या म्हणजे दुरुपयोगामुळे

डागळलेली वाईट विद्या बनली होती प्राप्त झालेल्या सिद्धी वाममार्गा-कडे लावल्याने जो काही अनाचार माजतो त्याचे हे एक प्रात्यक्षिक होते. चागल्या हेतूसाठी वापरण्याची साधने, ती हाती असलेल्यानी स्वतःचा बुद्धिभेद झाल्याने दुष्ट हेतूच्या साधनाकडे योजली म्हणजे विकृत परिस्थिति उत्पन्न होते तशी आता झाली होती. मोठ्या सपत्तीच्या आशेने हे मात्रिक पुजारी आपले ज्ञान राजपुत्राच्या मृत्यूचे पाश खिळखिळीत करण्याकडे वापरणार होते अघोर मृत्यु जरी आला तरी राजपुत्राचे शरीर नेहमीप्रमाणे दफन न करता ते राखून जपून ठेवण्याचा त्याचा इरादा होता कारण मृत राजपुत्राची इच्छा मागे राहिली तर त्याचा जीव तेथेच तरगत राहाणार. या जीवनाचा सबध ज्या शरिरामुळे शक्य झाला ते शरीर सोडून जाणे त्याला नको होते जगातील ऐश्वर्याच्या उपभोगाचा त्याचें शरीर हा एक दुवा होता. तो नष्ट होऊन कसे चालेल ? म्हणून मृत्यु आला तरी आपला जगाशी सबध तुटू नये, अशा तीव्र इच्छेने राजपुत्राने आपले शरीर या मात्रिकाच्या हाती जपून ठेवण्यास दिले होते

पुजाऱ्याचे काम विधिपूर्वक चालू होते. मोठ्या समारभाने ते सर्व ते पार पाडीत होते अतिशय सुदर आणि तलम रेशमाच्या गाठी त्यानी आणविल्या. राजपुत्राचा देह आता त्यानी काही विशिष्ट तऱ्हेच्या मसाल्यानी भरला. त्याचे हात छातीवर एकावर एक मोडून ठेवले. त्यावर साकेतिक खुणा करीत तोडाने मत्राचे उच्चार करीत त्यानी ते कलेवर रेशमाच्या कितीक वार कापडात गुडाळले

सपत्तीला जणू काही तुटवडाच नव्हता राजपुत्राच्या अत्यविधीसाठी हवा तेवढा खजिना जणू काही त्याच्या स्वाधीन केला गेला होता. प्रथम एक सुवर्णा-च्या पत्र्याची केलेली रत्नखचित पेटी कारागिरानी आणली. राजपुत्राच्या शरिराच्या आकाराचीच ती पेटी होती. पेटीवर राजपुत्राचा मुखवटा कोरलेला होता. देवळात मूर्तीला बसवितात तसे माणकाचे डोळे बसविले होते मुखवट्यावर निरनिराळ्या काचेच्या रगानी चिन्हे आणि भूषणें रग-विली होती. त्या सुवर्णाच्या पेटीची किंमतच लक्षावधि मोहरा भरली असती. ही सुवर्णपेटी त्याहून आणखी एका मोठ्या, व ती पेटी त्याहून मोठ्या, अशा तीन पेट्यामध्ये घातली. सर्वांत वरची पेटी एकसधी मुरुमाच्या दगडातून

खादून तयार केला होता. हा मोठा पेटा तयार झाल्यावर त्याना एक प्रचड स्मशानयात्रा काढली ती गाजत मिरवत राजपुत्रासाठी बाधलेल्या मोठ्या समाधीपाशी आली. समाधि लेण्याप्रमाणे डोगराच्या पोटात खणून तयार केली होती. त्यातील आतल्या दालनात ते शव नेऊन ठेवले त्या मिरवणुकी-तच मिरवत मिरवत, राजपुत्राला मृत्योत्तरच्या जगात वापरण्यासाठी मिळावी म्हणून, सर्व साधनसामुग्री आणली होती ती वाहाणाऱ्या गुलामानी आणून ती समाधीमध्ये पुजाऱ्यानी सागितल्याप्रमाणे माडून ठेवली त्या साधनसामुग्री-मध्ये नव्हते काय ? सारे होते एखाद्या राजवाड्याचे दालन जिवत माणसा-करता सजवून ठेवावे तद्वत् ती समाधि परोपरीने शोभिवत करून थाटून ठेवली होती भितीवर आणि छतावर कुशल कारागिराकडून रगीत चित्रे काढविलेली होती सर्व दालनात नक्षीदार वेलबुट्टी काढलेले भव्य पलग, सिहासने ठेवलेली होती आणि त्या सभोवार कलाकुसर केलेले जडावाचे, चिनीमातीचे, धातूचे लहानमोठे कलश आणि करडक ठेवले होते कुणाचेहि पाहून डोळे दिपतील अशा रत्नाच्या माळा, जडजवाहीर तेथे होते जड-जवाहीर निरनिराळ्या आकाराचे होते बागुरड्याच्या आकाराची पेडे, श्वानाच्या तोडाची भाडी अशा अनेकविध गोष्टी एखाद्या वस्तुसग्रहालया-प्रमाणे त्यानी माडून ठेवल्या. त्या समाधीत पुजाऱ्यानी पुनः अनेक मत्रविधि केले. आणि शेवटी तिन्ही दालने तोडावर मोठाल्या शिळा बसवून बद केली.

स्मशानयात्रेतील सर्व माणसे परतल्यावर त्या पुजाऱ्यानी समाधीपाशी काही मत्रसाधन केले ज्याला भानवती विद्या, जारणमारण, चेटकी विद्या म्हण-तात, तसली जादु आता त्यानी सुरू केली. ज्याप्रमाणे आपल्या या दृष्टिगोचर सृष्टीत मानवाच्यापेक्षा जास्तकमी विकास झालेले इतर प्राणिमात्र आहेत, त्याचप्रमाणे अतीद्रिय सृष्टीतहि काही असे असतात. हे जीवात्मे मृत्यु पावलेल्या अथवा जन्मास येणाऱ्या मनुष्याचे नव्हत तद्वतच इतर पशुपक्षाचेहि हे आत्मे नव्हत. हे जीवात्मे अतीद्रिय सृष्टीमध्ये नेहमी राहाणारे अशरीरि प्राणीच होत. तेहि निरनिराळ्या जातीचे असतात. त्याच्यामध्येहि स्वभाववैशिष्ट्य असतेच. अशाच जीवात्म्याना आपण ब्रह्मसमध, खवीस, हडळ, वेताळ अशा नावानी ओळखतो. अशाच जीवात्म्याच्या जास्त विकास पावलेल्या जाती आपण यक्ष, किन्नर, गधर्व, भैरव अशा नावांनी ओळखतो. हे जीवात्मे इद्रियगोचर नसले तरी त्याचे

अस्तित्व आपल्याला अनेकदा जाणवते आपल्या सृष्टीला लागूनच तीहि सृष्टी असल्याने या सृष्टीवर या जीवात्म्याची व त्याच्या कृतीची छाया पडल्याशिवाय राहात नाही आपला आणि त्याचा सबध जरी सहजासहजी येत नसला तरी वर उल्लेखिलेल्या अशा काही जारणमारणादि चेटकी विद्या आहेत की ज्याच्या सहाय्याने मनुष्याला असले सबध जोडता येतात पण हे सबध फार धोक्याचेच असतात त्यामध्ये अती हितकारक काही असत नाही या विद्येचा अभ्यास केलेले मात्रिक चेटकाने असली भुते उठवितात आणि त्याचा उपयोग आपले हेवेदावे साधण्यात करतात पण ज्या मत्राच्या आधीन असल्याने अशी भुतेखेते काही काल मात्रिकाचे दास्य पत्करतात व त्याची हुकमत पाळतात, त्या मत्राची शक्ति कोणत्याहि कारणाने जरा कमी पडली की लागलीच ही भुतेखेते आपल्याला दास्यात ठेवण्याचा प्रयत्न करणाऱ्या मात्रिकावरच उलटतात.

सृष्टीमधला एक महत्त्वाचा नियम असा आहे की सर्व सृष्टि ही वास्तविक एकरूप असल्याने कोणीहि बाकीच्या सृष्टीपासून आपल्याला वेगळा काढू शकत नाही आपले एकटयाचे सुखदु ख निराळे व इतराची सुखदु खे निराळी असे घडू शकत नाही यामुळे इतराचा घातपात करून त्यातून आपले सुख निर्माण करण्याचा कोणी प्रयत्न केला तर ती अशक्य गोष्ट आहे सर्वच एकमेकाशी निगडित असले तर इतराच्या दु खातून आपले सुख कसे उत्पन्न होईल ? पण हे न कळल्याने साध्या जगातील व्यवहाराच्याहि पलीकडे जाऊन ज्या काही व्यक्ति जादूटोणा, चेटुक इत्यादि विद्या अशा नीच कर्माकडे लावतात त्याचा स्वत चा शेवटी घोर नाश होतो इतरावर योजलेल्या अतीद्रिय शक्ति त्याच्यावरच अती उलटतात.

मी दृश्य पाहात असलेल्या इजिप्तच्या कालखडात या असल्या मात्रिक विद्येला ऊत आला होता या मात्रिक पुजाऱ्यानी जे मत्रसाधन सुरू केले त्याचा उद्देश असा होता की मत्रसामर्थ्याने अशीच भुतेखेते उठवून त्याची राजपुत्राच्या समाधीवर सरक्षणासाठी योजना करावयाची ही समाधि कोणी उघडू नये म्हणून हे रक्षक पुरुष त्यावर नेमले होते या अतीद्रिय सृष्टीमध्ये आपल्याप्रमाणे कालगणना नसल्याकारणाने हे रक्षक पुरुष सहस्रावधि वर्षे योजिलेल्या स्थळी डाबून राहात. राजपुत्राच्या समाधीमधील अमूल्य वस्तु

लुटून नेण्यासाठी भविष्यकाळात चोर दरवडेखोर येतील हे त्याना ठाऊक होते कारण पूर्वीच्या राजवशातील व्यक्तीच्या अनेक समाध्या चोरानी याप्रमाणे अनेकदा उध्वस्त केलेल्या होत्या. केवळ सपत्ति गेल्याचेहि एवढे दु ख नाही पण समाधि उध्वस्त होताना त्या व्यक्तीचे जतन करून ठेवलेले मृत शरीर जर नष्ट झाले तर त्या मृतात्म्याचा मर्त्य जगाशी सबध ठेवण्याचा एकटा एक दुवा नाहीसा होतो तो काही केल्या नाहीसा होऊ नये म्हणून तर त्या राजाची एवढी धडपड असे

मृत्यूचा वास्तविक अर्थच हा की, मर्त्य सृष्टीतील मानवाचे काम सपले की, त्या आत्म्याला मर्त्य सृष्टि सोडून आपल्या विकासाच्या पुढच्या मार्गावर चालू लागावे लागते म्हणूनच त्याची आणि पार्थिव शरिराची मृत्यु फारकत करतो पण अनेकदा आत्मा मर्त्य सृष्टीत सुखोपभोगाने अथवा सूड आणि हेवेदावे याच्या बधनानी इतका जखडून गेलेला असतो की नियतीने डाव उधळून दिला तरी त्या आत्म्याची डाव खेळण्याची हौस पुरी झालेली नसते. गर्दीगर्दीने या जन्मातून उठून जाण्याला त्याची नाखुषी असते असे आत्मे अट्टाहासाने आपल्या जुन्या जीवनावर वासना ठेवून तेथेच तरगत राहातात. त्यामुळे त्याच्या विकासमार्गामध्ये व्यत्यय येतो ज्याचा अत्यविधि मी पाहिला तो राजपुत्रहि असाच वासनानी या मर्त्य जगात आपल्या मृत कलेवराभोवती घुटमळत राहिला

व्यक्तीला विकासमार्गावर जावयाचे तर तिला सर्व गोष्टी स्वेच्छेने कराव्या लागतात. विकासमार्गावर कुठल्याहि तऱ्हेची सक्ती असत नाही. काल अनत असल्यामुळे त्याचीहि मर्यादा असत नाही. त्यामुळे सर्व आत्मे आपल्या इच्छेप्रमाणे वागण्यास मोकळे असतात ज्या वेळी बरे वाईट ओळखून स्वेच्छेने आत्मा आपणहून चागली गोष्ट अगिकारतो, त्या वेळीच त्याची पावले उत्क्रातीवर पडू लागतात.

म्हणून या राजपुत्रासारख्यानाहि सृष्टिदेवता कोणत्याहि तऱ्हेची गर्दी वा सक्ती करीत नाही सहस्रो वर्षे तिष्ठत तिष्ठत ज्या वेळी अशाची आपणहून खात्री पटेल की नियतीच्या प्रवाहाविरुद्ध उलटे जाणे शक्य नाही, दैवी इच्छेला अनुसरून जाण्यातच आपले अतिम कल्याण आहे आणि या जाणिवेने शहाणे होऊन आपला दुराग्रह आणि हटवादीपणा सोडून असे आत्मे ईश्वरेच्छेशीं

एकरूप होतात आणि आपला पुढचा उत्क्रांति मार्ग चोखाळू लागतात तेव्हाच ही निरगाठ उकलते. मग आपण म्हणतो की त्या आत्म्याना सद्‌गति मिळाली कारण ईश्वरी योजनेप्रमाणे ते आपल्या विकासमार्गावर गतिमान होतात, अडलेल्या बैलाप्रमाणे अडून बसत नाहीत !

या अत्यविधीचे दृश्य पाहिल्यानतर माझ्या दृष्टीस ते महाद्वार पुन पडले. त्या महाद्वारामधून जणू काही एक प्रचड दीप्तिगोल पुढे येऊ लागला त्यामधून एक देवतेची आकृति प्रगट झाली तिच्या कपाळावर फणीन्द्र नाग फणा काढून बसला होता त्या देवतेचे हात दोन्ही बाजूस पसरून धरलेले होते तिचे पजे उघडलेले होते डावे पाऊल उचलून ती जणू काही पुढें टाकीत होती. तिच्या मस्तकाभोवती तेजाची एकावर एक वलये दिसत होती तिची दृष्टि ज्ञान, वात्सल्य, कारुण्य या सर्वांची वृष्टि जणू काय एकदमच करीत आहे असे वाटत होते जणू काही तिच्या दर्शनाचा भाव असा होता की, 'मानवा, ऊठ दृष्टीवरची झापड काढून टाक. ज्ञाता होऊन या सर्व ब्रह्माडाची आणि तुझी स्वत ची ओळख पटवून घे विकासमार्गावर पावले टाक आणि ज्या माझ्या तेजातून तू स्फुल्लिगवत् निर्माण झालास त्या तेजाशी मिसळून एकरूप हो '

मी त्या देवतेच्या दर्शनाने कृतकृत्य होऊन गुडघे टेकून पुढे नत झालों आणि त्या देवतेला अभिवादन केले. तो दृष्टात सपला आणि मी जागा झालो. जे पाहिले ते बहुतेक सारे मी तुला सागितले आहे काय वाटते तुला ?

लॉरेन्स ही हकिगत ऐकून कितीक वेळ स्वस्थ बसून विचारात गढला होता हे केवळ स्वप्न आहे, दमल्या भागलेल्या मनामध्ये निर्माण झालेले मनाचे निव्वळ खेळ आहेत का मानवाला मदत करणाऱ्या दैवी शक्तीचे हें खरेखुरे मार्गदर्शन आहे याचा तो विचार करीत होता. मग त्याला एक कल्पना सुचली तो म्हणाला, "शिकदर, तुला जे स्वप्नदर्शन झाल त्यातील काही गोष्टीचा प्रत्यक्ष पडताळा पाहाता येण्यासारखा आहे तू जी समाधि पाहिलीस त्या समाधीमधल्या वस्तूची आठवण तुला कितपत आहे ?"

"मी पाहिलेल दृश्य इतक खरखुर होत की मी पाहिलेली प्रत्येक लहानसहान गोष्ट मला मी आताच पाहात आहे इतकी स्पष्ट आठवते. समाधीमधल्या नुसत्या वस्तूच काय तर समाधीमधल्या तीन दालनापैकी सर्वांत

आतल्या दालनाच्या दरवाज्यात तो बद करण्यासाठी जी मोठी एकसधी शिला साधून ठेवली आहे तिच्यावर लिहिलेला सदेश सुद्धा मला शब्दन् शब्द आठवत आहे ''

" होय का," लॉरेन्स म्हणाला, " थाब. तू तो सदेश आठवून सागितलास तर मी तो आताच लिहून घेतो काल आपण फक्त बाहेरच दालन उघडल आहे आज आपण दुसरा दरवाजा उघडून तिसऱ्या दालनाच्या दरवाज्यापाशी पोहोचू तू म्हणतोस तसा सदेश त्या तिसऱ्या दरवाज्यावर कोरलेला असला तर तुझ्या स्वप्नदृष्टाताचा पडताळा आपल्याला प्रत्यक्षच पाहाता येईल ''

शिकदराने सागितल्याबरहुकूम लॉरेन्सने कागदावर सदेश उतरून घेतला तो असा होता

" हे आकाशातील दिव्य देवतानो ! मत्रविद्येच्या अधिदेवते इसिस् ! पापपुण्याच्या चित्रगुप्ता टॉथ ! खेप्रे ! हार अख्ती ! हथॉर ! नेरवबेट् ! या सर्व देवतानो ! ! सूर्यदेवते ' रे '! द्वात (पाताळ) च्या अधिदेवते ऑसिरेस् ! मी तुम्हाला आवाहन करीत आहे तुमची शपथ घालून, तुमच्या साक्षीन मी माझ शरीर या समाधीमध्ये यक्ष, किन्नर, गधर्वाच्या सरक्षणाखाली ठेवीत आहे पुनरुत्थानाची वाट पाहात तिष्ठणाऱ्या माझ्या या शरिराला, माझी समाधि भ्रष्ट करून जर कोणी विटाळल तर त्या प्राणिमात्रावर माझा शाप असो ! माझ्या सुप्त शरिराला हात लावणाराचा हात झडो ! माझ्या एकातवासाचा भग करणाराला मृत्यु ग्रासो ! आणि माझ्या आत्म्याला दु खित करणाऱ्या प्राणिमात्राच चिरकाल अकल्याण होवो ! माझ्या समाधीच्या हे अशरीरि द्वारपालकानो, इसिस् देवतेच्या मत्रशपथेन आज्ञापून मी तुम्हाला इथ नेमीत आहे ! ''

त्या दिवशी त्या दोघाना आपल्या मजुराकरवी ते उत्खनन करीत असलल्या समाधीच्या दुसऱ्या दालनात जाण्याची मोठी गर्दी झाली होती. दुसऱ्या दालनात शेवटी प्रवेश केल्यावर हवा जरा मोकळी होऊन आपण त्यात केव्हा एकदा जातो आणि तिसऱ्या दालनाच्या द्वारावरचा दगड पडताळून पाहातो असे त्याना झाले होते

ज्या वेळी त्या तिसऱ्या दरवाज्यासमोर उभे राहून दिव्याच्या स्वच्छ प्रकाशात प्राचीन इजिप्शियन चित्र लिपीमध्ये लिहिलेला मजकूर त्यानी वाचून

पाहिला, त्या वेळी दोघाच्याहि तोडून आश्चर्योद्गार निघाला, 'अक्षर आणि अक्षर बरोबर आहे! ते केवळ स्वप्न नाही, हे नियतीच दैवी मार्गदर्शनच म्हणावयाच '

लॉरेन्स आणि शिकदर या दोघाच्याहि मनात स्वत च्या जीविताबद्दल कधीहि भीति नव्हती मरणाला कधीच डरणारे ते दोघेहि नव्हते त्याच्यात सशोधनाची आणि उत्खननाची जरी तीव्र इच्छा होती तरी केवळ शास्त्राच्या धुदीने मत्त झालेले ते साधे शास्त्रज्ञ नव्हते त्याच्या मनाचा कल अध्यात्मा-कडेहि होता आणि जो दृष्टात केवळ एक बाष्कळ स्वप्न मानून व जी शिला-लेखावरची शापवाणी केवळ जुन्या लोकाचे अधश्रद्धेचे खूळ आणि थोताड म्हणून निकालात काढून इतर पुराण–वस्तु-सशोधकानी अवमानिली असती, तिला त्यानी मानून, मनाचा केवढाहि विरस झाला तरी समाधि उत्खननाचे काम बद केले!

---

# प्रकरण : ९–पृथ्वीप्रदक्षिणा

प्रभाशकराचे चरित्र जमवून वाचकाना सादर करताना मी जरी साधन-सामुग्री जमवून ती कालानुसार लावून ओळीने माडण्याचा प्रयत्न करीत आहे तरी त्यामध्ये काही अडचणी मला येत आहेत मी स्वत प्रवास करून अनेकाना भेटून जरी सर्वाकडून माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला आहे तरी त्यात काही दुवे थोडेसे अपुरे पडले आहेत त्याचे कारण असे आहे की, ज्या माणसाकडून मला अशी माहिती उपलब्ध झाली असती, ती माणसेच कालवश झालेली आहेत या चरित्राच्या साखळीपैकी थोडे दुवे सापडले नाहीत तरी त्यामुळे विशेष बिघडणार मात्र नाही कारण जी माहिती मला अवगत झाली आहे तेवढ्यावरून प्रभाशकराच्या आयुष्याची बहुतेक सर्व कल्पना वाचकाना देता येईल अशी मला खात्री वाटते

प्रभाशकरानी तरुणपणीच हिदुस्थान देश सोडून देशातर केले, त्यानतर त्यानी अरबी पडावावर चढून त्यावरच्या काही न्याऱ्याच जीवनाची अल्पकाल चव चाखिली त्यानतर मालदीव बेटात एका उपवर मुलीशी

विवाह करून मालदीव बेटातच कायमचे वास्तव्य करण्याची आलेली संधि झिडकारली मुक्याचे सोग घेऊन व आपण मुसलमान आहो असे भासवून जरी ते अरबी खलाशात अगदी मिसळून जाऊ शकले, तरी ज्या वेळी गुलामाचा व्यापार करण्यासारखी नीचपणाची भागीदारी त्याच्याकडे येऊ लागली त्या वेळी प्रतिकार केल्याने अत्यत अकल्पितपणे गुलामगिरीच्या शृखला खुद्द त्याच्याचभोवती कशा जखडल्या गेल्या हे मी वर्णून सागितलेच आहे दैव मोठें चेष्टेखोर आहे माणसाची सदान् कदा ते चेष्टा करीत राहाते आपण नाही का आपल्या एखाद्या मित्राची गमत करण्यासाठी म्हणून, सुदर वेष्टनात गुडाळून वर रगीबेरगी फिती लावून काही वस्तु त्यास भेट देत ? मग मोठ्या प्रसन्न मुखाने चार लोकात तो ती वेष्टने काढून एकाखाली एक एकाखाली एक असे उलगडताना कावराबावरा होतो आणि सरतेशेवटी त्या सुरुवातीला मोठ्या वाटणाऱ्या वस्तूच्या सर्वांत आत काय आढळते तर एखादा दगड आणि चिठ्ठी की, 'आज एप्रिलची पहिली तारीख असल्याने, तुझी प्रतिमाच असा हा दगड तुला भेट म्हणून पाठविला आहे' हिरमुसले होऊन त्याला हसावे का रडावे ते कळत नाही

त्याउलट तोडावर एखादा भेसूर मुखवटा घालून दाराआड आपण लपून उभे राहातो आणि आपल्या घरच्या माणसापैकी खेळीमेळीच्या एखाद्या व्यक्तीला त्याला अनपेक्षितपणे 'भो !' करून भेडसावितो तो दचकून त्याची फजिती झाल्यावर तोडावरचा मुखवटा बाजूस सारून आपण 'कशी जिरली एका माणसाची !' असे म्हणून खदखदा हसू लागतो स्वतःची फजिती विसरून भ्यालेली व्यक्तीहि आपल्याबरोबर हसू लागते

दैवालासुद्धा अशी चेष्टा फार प्रिय असते आयुष्यात जी गोष्ट फार नामी झाली असे म्हणत आपण हुरळून जातो आणि आपल्याला मुदैवी मानतो, तिचा दीर्घानुभव आल्याबरोबर आपले मन बदलते आपण म्हणतो, 'किती शतमूर्ख मी ? ही नसती ब्याद माग लावून घेऊन तिलाच का मी सुदैव समजत होतो !' अथवा दैव आपल्याला एखाद्या मोठ्या सकटात घालते आणि आपला जीव रडकुडी येऊन आपण जेव्हा दैवाला बोल लावतो आणि पूर्वजन्मीची आपली कोणती पातके आपण फेडीत आहोंत याची आठवण करू लागतो, तेव्हा दैव मिस्किलपणानें हसून आपल्याला म्हणते, "वेडा रे

वेडा ! याला का तू सकट मानून घाबरून गेला आहेस ? अरे ही तर तुझ्या हिताची गोष्ट आहे !' आणि अनुभवाती ते पटल्यावर आपली कळी उमलते आणि आपण हसून म्हणतो, 'खरच !'

गुलामगिरीच्या पाशात पडल्याबद्दल वाईट वाटण्याला पुरेसा अवसर न देता प्रभाशकराची सुटका करून दैवाने त्याची गाठ लॉरेन्स ऑफ अरेबियाशी घालून दिली होती आणि त्याच्या सगतीनेच इजिप्तमधील पुराण–वस्तु–सशोधनाच्या कार्यांत प्रभाशकर 'शिकदर' या नावाने पडले होते

इजिप्तच्या प्राचीन इतिहासात जवळ जवळ तीन हजार वर्षापर्यंत खोल बुडी मारून इतिहासाच्या पोटात काय होते याचा चागला अदमास प्रभाशकराना तेथे घेता आला त्या वेळचे डोळे दिपविणारे ऐश्वर्य आणि अमर्याद अधिकार ही ज्याना परिपूर्ण अनुकूल होती अशा इजिप्तच्या राजवशातील लोकावर कालाने तीन हजार वर्षाच्या अजस्र विटा रचून पिरॅमिड बाधल्याने त्याच्या तळाशी स्वत ला एक वेळ अमानुष मानून आपली बरोबरी देवताशी करणाऱ्या व्यक्तीहि आता किती केविलवाण्या होऊन पडल्या आहेत हे प्रभाशकरानी पाहिले होते

लॉरेन्स ऑफ अरेबियाच्या ऐश्वर्यनिरपेक्ष वागणुकीचा शिकदर अथवा प्रभाशकर याच्यावर अगोदरच जो परिणाम झाला होता तो इजिप्तच्या इतिहासातील या नमुनेदार दृश्यानी जास्तच दृढ झाला आपण ज्याला सपत्ति सपत्ति मानतो तिची खरोखर किमत केवढी हे त्याच्या लक्षात आले होते. सपत्ति ही खरोखरच रूढ असलेल्या अर्थापेक्षा अगदीच उलट अर्थाने 'अमूल्य' आहे, म्हणजे तिला 'मूल्य' च नाही असे ते समजू लागले सुवर्ण, जडजवाहीर वा इतर बाजारात किमत येणाऱ्या वस्तु याच्या हिमालयाएवढचा राशीखाली जरी माणसाला गाडले तरी त्याच्या नुसत्या भाराखेरीज काहीच लभ्याश व्यक्तिविकासाच्या दृष्टीने त्यात असत नाही सपत्ति ही जणू 'अल्लाउद्दीनच्या दीपा' च्या आधीन असलेल्या राक्षसाप्रमाणे केवळ निर्बुद्ध आणि पाशवी शक्ति आहे. राक्षस पुढे उभा राहिल्यावर त्याला सारखे सागावयास काम शोधीत बसावे लागे, आणि काम न सागितल्यास तो दिव्याच्या मालकाच्याच बोकाडी बसू लागे. सपत्तीचे बरोबर असेच आहे ती सपादण्यापूर्वी माणसाला तिचा उपयोग काय करावयाचा हे कळलेले असले पाहिजे नाही

तर सपत्तीच्या उठविलेल्या या राक्षसाच्याच आधीन माणूस होऊन जातो. प्रभाशकर यानी हा अर्थ समजून आपल्या मनाशी तशी खूणगाठ बाधून ठेवली!

यानतर प्रभाशकरानी पृथ्वीप्रदक्षिणा केली ती कशी ते सागेन

× × ×

भूमध्य समुद्रातून जाणाऱ्या एका ट्रॅम्प जहाजावर प्रभाशकर यानी 'जॉन मेसन' या नावाने बॉयलरमध्ये कोळसे भरणाऱ्या आगवाल्या स्टोकरची जागा घेतली होती अलेक्झाड्रिया बदरामध्ये आलेल्या या अमेरिकन ट्रॅम्प जहाजावर स्टोकरची जागा रिकामी होती, आणि कोठेतरी काम धरायचे, मग या जहाजावर काय हरकत आहे अशा वृत्तीने त्यानी 'हो' म्हटले होते अलेक्झाड्रिया बदरामधल्या खलाशाची व्यवस्था पाहाणाऱ्या अधिकाऱ्याने, म्हणजे 'शिपिग-मास्टर'ने, त्याना म्हटले होते "जॉन मेसन! या 'क्वीन ऑफ क्लब्स' (किलवरची राणी) जहाजावर आगवाल्याच काम दर आठवड्याला तेरा डॉलर्स पगारावर करावयाची तुझी खुषी आहे का?"

जॉन मेसनने 'हो' म्हटले.

"हे जहाज हव तिकड हिडणार असल्यामुळ सफरीला सहा महिन्यावर अवधि लागेल तेव्हा सहा महिन्याऐवजी पुऱ्या सफरीभर हे काम करण्यासाठी बाधून घेण्याची तुझी खुषी आहे का?"

जॉन मेसनने फिरून मान हलविली होती आणि त्यावर जॉन मेसनने आणि त्याच्या नव्या कप्तानाने आपापल्या सह्या रजिस्टरावर 'शिपिग मास्टर'समोर केल्या होत्या

ही ट्रॅम्प बोट प्रथम अलेक्झाड्रियाहून ओरॅन व तेथून मार्सेल्स बदरात जावयाची होती ट्रॅम्प बोटीवर अधिकारी व खलाशी मिळून पाऊणशेवर माणसे नसत अधिकाऱ्यापासून ते बटलरापर्यंत सारे लोक सारख्याच भगडपणाने वागत आणि त्यात बहुतेकजण अमेरिकन असल्यामुळे जुन्या रीतीभाती पाळून जिवाला तोशीस लावण्याची त्याना कधीच सवय नाही अगात असले असले, नसले नसले बहुतेक वेळ ते एखाद्या छोट्या विजारीवरच काढीत पण याचा अर्थ ते गरीब असत असा मात्र नव्हे जुन्या परपरेची आवड ही

जर इग्रज माणसाच्या हाडीमाशी खिळलेली तर रोज नवनवे थेरथेर करीत राहाणारा अमेरिकन नवलाईचा खरा भोक्ता. त्याची श्रीमती त्याच्या जेवणाखाणात आणि राहावयाच्या जागेत असलेल्या ऐषारामाच्या सोयीत दिसून येई. जॉन मेसनची राहाण्याची आणि खाण्याची सोय मोठी झकास झाली होती. आपली कामाची वेळ असेल तेव्हा खपून काम करावे, आणि फावल्या वेळात पुस्तके वाचावी, असा क्रम आता जॉन मेसनने सुरू केला आगवाल्याचे काम अगमेहनतीचे असे बोटीतल्या तळमजल्यावर खोल, बॉयलर रूममध्ये जाऊन फावड्याने कोळसा मारणे म्हणजे चेष्टा नव्हती बॉयलर रूम अगोदरच अतिशय गरम, त्यात कोळसा मारण्यासाठी भट्टीचे छोटे दार उघडले म्हणजे आगीची एवढी झळ लागे की अग शेकून निघे त्यात भरीसारखे कोळसे मारण्याचे श्रमाचे काम केले की, साऱ्या अगातून घाम घळघळा वाहू लागे पण या कष्टाच्या कामाची जॉन मेसनला हौस वाटे किबहुना कुठल्याहि कष्टामध्ये काही नवीनच आनद असतो ही आता त्याची खात्री पटली होती कोळसा मारताना भट्टी उघडली म्हणजे त्याला आतल्या अग्नीची मोठी मौज वाटे धगधगीत अग्नीच्या ज्वाला साखळ्या जोरजोरात उसळत असत अग्नीच्या त्या अनेक जिव्हा हलू लागल्या म्हणजे ही दैदीप्यमान शक्ति जणू काही जवळ आलेल्या सर्व गोष्टी ग्रासून आत्मसात् करावयास उद्युक्त झाली आहे असे वाटे. त्या अधाशी जिव्हावर फावडे भरून कोळशाचा ढीग धप्‌दिशी टाकला म्हणजे त्या क्षणकाल दबत आणि पुन बघता बघता त्या नवीन सर्पणाने जास्तच फुलून आणखीच धगधगू लागत भट्टीचा दरवाजा फावड्याने लोटून मागे बाजूस सरून हवेच्या मोठ्या गवाक्षाखाली, उभ्या टेकलेल्या हातातील फावड्यावर रेलून तो उभा राही घामाने डबडबलेल्या अगावर वारा खाऊ नये, त्याने थडी बाधते, सर्दी होते, प्लूरसी अथवा न्युमोनिया होतो इत्यादि साऱ्या कल्पना येथे कशा लागू पडत नाहीत याचे त्याला आश्चर्य वाटे घामाने निथळत्या अगावर डेक्‌वरून लोखडी गवाक्षातून खालवर येणाऱ्या स्वच्छ थड वाऱ्याच्या झोतात हातातल्या जाड टुलावाने तोड पुशीत तो उभा राही आणि अगातून घामाने ओघळून गेलेल्या पाण्याची भरपाई करण्यासाठी मोठ्या टिनपाटाने घटाघटा किती तरी पाणी पिई.

अशा कामाची पाळी सपल्यावर डेक्‌वर येऊन समुद्राच्या मोकळ्या वाऱ्यात बसणे मोठें सुखावह होई.

आघोळ करून व पोटभर जेवून हातात पुस्तक घेऊन तो वाचीत बसला म्हणजे त्याला वाटे यासारखे दुसरे सुख नाही नाहीतरी अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला दुसरे काय लागते ? पोटभर जेवण मिळून, तब्येत चागली राहाण्यासाठी अगमेहनत करण्यास मिळाली, इतर कोणतीहि मोठी जबाबदारी अगावर नसली आणि अभ्यास करण्यासाठी भरपूर वेळ मिळाला म्हणजे झाले ! जॉन मेसनने आगबोटीवरच्या आपल्या आयुष्यात हवे तेवढे वाचन केले.

मनोविकास होण्यासाठी बुद्धीला खाद्य लागते आणि ते खाद्य सुद्धा जितके चौरस असेल तितके ते बुद्धीला मानवते बुद्धीला जर खाद्य एकागी मिळाले, तर तिची वाढहि एकाच दिशेने होईल खाद्य पुरेसे न मिळाले, तर तिची वाढ खुटेल बुद्धि कोती होणे, एकागी होणे वा विकृत होणे हे सर्व, बुद्धीचे पोषण कुणी कोणत्या खाद्यावर केले आहे त्यावरच अवलबून असणार

आपण ज्या जगात राहातो त्याचे खरेखुरे सम्यक् आणि यथार्थ ज्ञान आपल्याला व्हावे अशी जॉन मेसनला मोठी ओढ लागली होती आणि लॉरेन्स ऑफ अरेबियाशी झालेल्या त्याच्या सवादात हा अभ्यास करण्याची युक्ति त्याला सुचली होती या भटकणाऱ्या बोटीवर कष्ट करून थोडे पैसे मिळवावे, आणि त्याशिवाय राहाण्याला आणि पोटापाण्याला फुकट अशी ही उत्तम सोय होती. बोट जगपर्यटण करणारी असल्यामुळे बोटीबरोबर आपोआप देशोदेशी जाऊन जग पाहाण्याचा सुयोग येत होता. नाही तर एवढी मोठी पृथ्वीप्रदक्षिणा करावयास तो उतारू म्हणून जाता तर हजारो रुपये त्याला खर्चावे लागले असते उलट आता एखादी शिष्यवृत्ति मिळाल्याप्रमाणे एवढा मोठा प्रवास आपली कपर्दिकहि खर्च न करता करणे त्याला शक्य झाले होते

कुठल्याहि गोष्टीचें ज्ञान नाही तरी आपण कसे करून घेतो ? आपण ती गोष्ट हातात धरून खालून, वरून, बाजूने नीट न्याहाळून पाहातो, मग ती उघडता आली तर उघडून आपण पाहातो, हेतु असा की त्या गोष्टीचे रग, रूप, आकार, गुणधर्म आणि मर्यादा याची आपल्याला ओळख पटावी. जॉन

मेसनने विचार केला होता, की जगाचे यथार्थ ज्ञान होण्याची पद्धतीहि काहीशी अशीच आहे जगभर प्रवास करून सर्व दृष्टिकोणातून हे जग दिसते तरी कसे हे त्याला पाहाण्याची इच्छा होती पण त्याने जग पाहिले तरी, त्याच्या दृष्टीस ते पडेल त्या क्षणी ते असेल, तेवढेच आणि तसेच फक्त त्याला दिसले असते म्हणून हे जग चौथ्या बाजूने पाहणेहि जरूर होते ही चौथी बाजू, चौथे परिमाण ( Fourth Dimention ) म्हणजेच 'काल'! आणि हीच बाजू अशी होती की पुस्तके वाचून अभ्यास केल्याशिवाय ती त्याला उलगडली नसती हे जग उत्पन्न कसे झाले, त्याची विश्वामधली गति नियमबद्धतेत कशी बसली, त्यावर हलके हलके प्राणिमात्राची कशी उत्पत्ति झाली आणि ते कसे उत्क्रांत होऊ लागले हे सारे तो मोठ्या अधाशीपणाने वाचत असे मानववंशाची रानटी अवस्था आणि नतर मानवाचे ज्ञान हळू हळू वाढू लागल्यावर त्याच्या सुधारणेचे निरनिराळे टप्पे वाचून एखाद्या रोमांचकारी कथेचे परिशीलन केल्यासारखा त्याला आनंद होई

अश्मयुगातल्या माणसाला अग्नीचा शोध लागला आणि त्यावर मृगया करून आणलेले अन्न शिजवून त्याने प्रथम खाल्ले त्या वेळी त्याच्या चेहऱ्यावर काय भाव दिसले असतील याची कल्पना करणे जॉन मेसनला मोठे गमतीचे वाटे प्राचीन कालातून प्रागैतिहासिक कालात, प्रागैतिहासिक कालातून इतिहास कालात आणि इतिहास कालातून अर्वाचीन कालात अशी झालेली मानववंशाची उत्क्रांति त्याने अतिशय विस्ताराने समजून घेतली

हा अभ्यास करताना अनेकदा त्याला लहानपणची आठवण होऊन हसू येई घरच्या वृद्ध बायका तिनिसाजा झाल्यावर पुराणाहून घरी परत येत त्या वेळी त्याच्या तोंडी चाललेली चर्चा त्याच्या कानावरून गेलेली होती एखादे थोर पुरुषाचे चरित्र आपण जणू काहीं वर्तमानकालात प्रत्यक्ष घडताना पाहात आहोत, अशा त्या पुराणातल्या कथाभागाशी समरस होऊन रमून गेलेल्या असत त्या दिवशीचा रामायणातील कथाभाग पुराणिक बोवानी कुठवर सांगितला याची चर्चा करीत त्या म्हणत, "आज राम वनवासाला जावा म्हणून कैकेयी हट्ट धरून बसली आहे. उद्या राम वनवासाला निघतील !"

आपल्याशीच खदखदा हसून आत्मप्रत्ययाने तो म्हणे, 'माझ्या या पुराणात

मीहि नाही का खरोखर तसाच रगून गेलेलो ? फक्त रामाऐवजी वा कृष्णा-ऐवजी खुद्द मानववशालाच मी वाचीत असलेल्या पुराणात नायकाचे स्थान दिलेले आहे !'

अर्वाचीन कालाचा इतिहास–छे, इतिहास म्हणणे बरोबर नाही !– अर्वाचीन परिस्थिति वाचताना त्याने भूगोल विषयाचाहि पुरा अभ्यास केला. मग बदरोबदरी हिडून, देशोदेशीचे, अनेकविध धर्माचे, पथाचे लोक त्याने त्याच्यात मिसळून पाहिले

ओरॅन बदरातून मार्सेल्समध्ये, मार्सेल्सहून बार्शिलोना, लिस्बन, लहाव्र, यथून लडन, रॉटरडम्, ॲम्सटरडम्, ब्रेमेन, हॅम्पबर्ग, स्टॉकहोम, तेथून लडन आणि लिव्हरपूल, आणि मग तेथून ती बोट न्यूयॉर्कला गेली मग बहामा, जमेका येथे जाऊन परनाब्युको, रिओडो जानेरो, मॉटे व्हिडिओ येथे गेली तेथून 'केप ऑफ गुडहोप'ला जाण्यासाठी त्याना माल मिळाला 'केप ऑफ गुडहोप'हून लुरेको मार्क्स, मॉरिशस् बेटे, तेथून कोलबो, बटेव्हिया, तेथून पर्थ, फ्री मॅटल्, मेलबर्न, सिडने, सिडनेहून सामरॅग, सिगापूर, सैगॉन, हॉगकॉग, शाघाय येथे बोट गेली शाघायहून नागासाकी, योकोहामा, येथून मिडवे बेटे, होनोलुलु आणि तेथून सानफ्रान्सिस्को, ॲकॅपल्को येथून पनामा कॅनॉलमधून ते परत गॅल्व्हेस्टन बदरात आले तेथून परत न्यूयॉर्कमध्ये बोट पोचल्यावर जॉन मेसनने ती बोट सोडली या बोटीवरून काम सोडून जाण्याची त्याला वास्तविक काहीच गर्दी नव्हती आणि सहा महिने किवा दीड दोन वर्षे काय कितीहि लागली तरी त्याच्या तरी दुसऱ्या कामाचा काय खोळबा झालेला होता ? म्हणून ही ट्रॅम्प बोट जिकडचा माल मिळेल तिकडे भटकेल, त्याचप्रमाणे तोहि सचार करीत होता त्याने या बोटीबरो-बर बहुतेक सर्व मोठी बदरे हिडून पाहिली होती बहुतेक मोठ्या देशाची तोडओळख त्याला आता चागली झाली होती खूप प्रवासाने माणसाला जो एक बहुश्रुतपणा, अनुभवाचा शहाणपणा आणि कुणाशीहि सहज मिसळून वागण्याची सफाई येते, ती आता जॉन मेसनला आली होती. आपला आप-ल्यात केवढा बदल झाला आहे हे लक्षात आल्यावर त्याला अनेकदा आश्चर्य वाटे आपण केवळ हिदुस्थानातच वाढलो असतो, तर आपली दृष्टि किती कोती राहिली असती, त्याला वाटे पण या पृथ्वीप्रदक्षिणेमुळे आपल्याला विशाल

दृष्टीचा लाभ झाला, हा केवढा फायदा ! या अनुभवाची किमत पैशाने कधीच मोजता आली नसती न्यूयॉर्कला त्याने अॅटलाटिक महासागरातून युरोप आणि अमेरिका यामध्ये सारख्या फेऱ्या करणाऱ्या एका मोठ्या पॅसेंजर बोटीवर नोकरी धरली तो याप्रमाणे आणखीहि बराच प्रवास करीत राहिला असता पण अधूनमधून जगाला आपल्या तद्रीतून जागे करणाऱ्या ज्या काही उलाढाल्या घडतात, तशा एका घटनेने सारे जगच हादरले, मग त्याबरोबर जॉन मेसनचे आयुष्यहि एकाएकी बदलले असल्यास नवल नाही!

ती घटना म्हणजे पहिले महायुद्ध ! कुठल्या का क्षुद्र प्रसगाने होईना, पण महायुद्धाचा पेटलेला वणवा भरभरा पसरू लागला आणि त्यामध्ये सर्व राष्ट्रे आपल्या पोळीवर, कोणत्या बाजूस सामील झाले असता, तूप लागेल या विचाराने, पण तोडाने मात्र मानव्याची चाड, न्यायाचा कैवार, परपरेचा अभिमान इत्यादि गोष्टीबद्दल मोठमोठ्याने ओरडून सागत, या नाही तर त्या बाजूने युद्धात पडली

तो न्यूयॉर्कला असताना एक दिवस त्याच्या नावचे एक पत्र आले जॉन मेसन याला कुठलीच पत्रे कधी येत नसत त्यामुळे आपल्या नावचे पत्र पाहून त्याला मोठे आश्चर्य वाटले त्यावर अलेक्झाड्रियाचा शिक्का होता पाकीट फोडून त्याने पत्र पाहिले ते अगदी छोटे होते त्यात म्हटले होते –

" महायुद्ध पेटले आहे मी त्यात माझ्या मनाप्रमाणे काही काम करीत आहे. माझ्या खाद्याला खादा लावून रणागणावर युद्ध करण्याची सधि तुला साधावयाची असली, तर लागलीच असशील तसा निघून अलेक्झाड्रियाला ये. 'होटेल् सेमिरॅमिस्' मध्ये उतर तेथे मी तुझी गाठ घेईन

–टी ई एल् "

त्याच्या इतके दिवस चालू असलेल्या सथ जीवनक्रमात जॉन मेसनला आताच्या इतका आनद कधीच झाला नव्हता ! तो आपल्याला फिरस्ता मानी. जगामध्ये आपल्याला कुठलेच मायापाश नाहीत, अशी तो स्वत शीच थोडी प्रौढी मारी पण आपल्या जानी दोस्ताची बोटभर चिठ्ठी पाहून त्याच्या मनात अनपेक्षितपणे आनदाची एवढी भरती आली की, माणसाचे मन कसे ना कसे तरी, पण आपल्यासारख्या इतर मानवाच्या सगतीच्या मोहात पडल्याशिवाय राहात नाही, याची त्याला प्रचीति आली

त्याने जग हिंडून पुष्कळ पाहिले होते, पण समरांगण कसे असेल याचे त्याला कुतूहल वाटत होते आपल्या अभ्यासात हा अनुभव तरी का वगळा-वयाचा ? आणि टी ई लॉरेन्सबरोबर लढाईत भाग घ्यावयाचा, ही तर फारच आनंदाची गोष्ट होती या बाबतीत फार विचार पडण्यासारखे काहीच नव्हते जॉन मेसनने त्याच पावली कॅप्टनकडे जाऊन आपला राजीनामा सादर केला, आपली पडशी खांद्यावर टाकली व इजिप्तला जाणाऱ्या, मिळालेल्या पहिल्याच बोटीवर त्याने उडी मारली

---

# प्रकरण : १०–एक अप्रसिद्ध युद्ध-कारस्थान

अलेक्झांड्रियाच्या 'सेमिरॅमिस' हॉटेलमध्ये येऊन उतरल्यावर जॉन मेसन टी ई लॉरेन्सची गाठ कोठे घ्यावी, या विचारात होता पण त्याला फार थांबावे लागले नाही, कारण त्याने घेतलेल्या पेयाचे बिल त्याने मागितले तेव्हा तबकात बिलाच्या ऐवजी एक छोटी चिठ्ठी त्याच्यापुढे आली तिच्यात म्हटले होते,–

'तू मला भेटावयास आलेला आहेस, असे कळता उपयोगी नाही माझी चौकशी कुणाजवळ करू नको पण तुझ्या पलीकडच्या टेबलावर बसलेला वृद्ध जर्मन गृहस्थ पुराणवस्तुसंशोधक आहे त्याच्याशी गट्टी कर मी तुला संध्याकाळी भेटेन ' – टी ई एल्

ती चिठ्ठी उचलून घेत एक पिएस्ट्राचे नाणे जॉन मेसनने तबकात टाकले आणि ते उचलून, सलाम करून हॉटेलचा नोकर चालता झाला जॉन मेसनने पुढच्या पाचदहा मिनिटात भराभर मनाशी बराच विचार केला जर्मन पुराणवस्तुसंशोधकाशी गट्टी करण्याचे कारण बरोबर काय असावे याचा जरी पुरा उलगडा त्याला होणे शक्य नव्हते तरी, हे काहीतरी हेरगिरीचे काम आहे इतके त्याच्या ध्यानात आले, व युद्धामध्ये हेरगिरीसारख्या धोक्याच्या कामात आपण एकदम पडणार याची त्याला गमत वाटली.

जॉन मेसनने उठून मोठमोठ्याने चौकशी सुरू केली की, उत्खननाचे काम

पाहाण्याची त्याची इच्छा असल्याने त्याला कोणी वाटाड्या मिळेल का ? त्याचा मोठ्याने चौकशी करण्याचा हेतु साध्य झाला आणि तो जर्मन उठून जवळून सहज जाता जाता जॉन मेसनला म्हणाला, "यग मॅन ! तुला पुराण-वस्तुसशोधनाचा नाद आहे वाटत ?"

" नाद कसला ! मी आहे विद्यार्थी पोर्तुगीज-हिदुस्थानातला घरची सुबत्ता असल्यान पोटाकरता मला काही उद्योग करण्याची गरज नाही बापान होसेन सागितल होत की, खुशाल प्रवास कर हवा तितका आणि जग पाहा इजिप्त-मध्ये येऊन पिरॅमिड पाहाण्याच्या हेतून इथ आलो आणि ते पाहिल्यावर मला वाटू लागल आहे फार की, इजिप्तमध्ये जे उत्खनन वगैरे शास्त्रज्ञ कर-तात, ते आपल्याला पाहावयास मिळाल तर फार बर होईल म्हणून मी सारखा चौकशी करत आहे पण उत्खनन करून इजिप्तच्या एखाद्या जुन्या राजाची ' मर्मी ' सापडण्यापेक्षाहि इथ पुराणवस्तुसशोधक सापडण जास्त मुष्किलीच झालेल दिसत !"

जॉन मेसन हा खरोखरीच एखाद्या उत्साही पण अविचारी आणि भोळसट विद्यार्थ्याप्रमाणे बोलत होता आपल्याबद्दलची माहिती आपण कुणाशी बोलतो आहो हे न लक्षात घेता भडाभडा बोलून टाकणे, उत्साहाने मोठमोठ्याने हसत खिदळत मनमोकळेपणाने बोलणे हा निष्काळजीपणा परक्या देशात नाहीतर कुणा करणे कसे सभवेल !

या गोष्टी लक्षात घेत तो जर्मन शास्त्रज्ञ म्हणाला, " छे, छे ! इतके काही पुराणवस्तुसशोधक दुर्मिळ झालेले नाहीत मीच आहे की एक !"

" हो का ? –" असे म्हणत आनदाने उठून त्याचे दोन्ही हात हातात घेऊन हर्षाने हलवीत जॉन मेसन म्हणाला, " देव पावला ! काय हो तुमच नाव? "

" माझ नाव मॅक्स मॅनरहेम ! "

" म्हणजे जर्मन ? " –त्याने आश्चर्याने विचारले आणि ता पुढे म्हणाला, " छे बुवा, आपल्याला नको तुमचा सबध ! तुम्ही जर्मन आणि ब्रिटिशाचे तर जर्मनाशी युद्ध सुरू झालेल आपल्याला नाही तुमच्याशी मैत्री करून तुरु-गात पडण्याची इच्छा ! पण काय हो ! तुम्ही जर्मन आहा म्हणता नी तुम्हो अजून मोकळेच ? तुम्हाला इथल्या सरकारन डाबून अजून तुरुगात का नाही टाकल ?"

तो जर्मन हसत हसत म्हणाला, " कारण ब्रिटिश लोक तुला वाटतात तितके बुद्दू नाहीत म्हणून अरे, गेली पधरावीस वर्ष इथ इजिप्तात पुराण-वस्तुसशोधनात गुतलेला मी वृद्ध आणि सर्वांच्या परिचयाचा सशोधक केवळ जर्मन सरकारच ब्रिटिशाशी युद्ध सुरू झाल एवढ्या एकाच कारणावरून, मी जर्मन जन्मलेलो एवढ्याचसाठी, काही तारतम्य न वापरता मला कैदेत टाकण कस बरोबर होईल ? आम्ही शास्त्रज्ञ आतरराष्ट्रीय नागरिक आहो. तुमच्या राजकारणाशी आम्हाला यत्किचितहि कर्तव्य नाही ! त्यापेक्षा आम्हाला जास्त प्रिय गोष्टी म्हणजे इजिप्तची ऐतिहासिक राणी हॉथशेपटस् अथवा राजा रॅमेसिस् यानी हजारो वर्षापूर्वी काय केल, ते शोधण हा पाहि-लास माझा परवाना, इथल्या सरकारकडून मिळालेला पाहा नीट म्हणजे तुझी खात्री होईल –" असे म्हणत मॅनरहेमने आपला परवाना खिशातून काढून जॉन मेसनपुढे धरला

तो नीट न्याहाळून पाहिल्यावर जॉन मेसनने, पक्की खात्री पटून, आपण विनाकारण सशय घेतला, अशा आविर्भावाने उघड म्हटले, " माफ करा ह मला काय ठाऊक तुम्ही सरकारमान्य आहा म्हणून ? हो, नाही तर मी सशोधनाच्या नादात तुमच्यावर विसवून घोटाळ्यात पडायला नको, कारण तुम्ही जर्मन नावाचे, अशा विचारान प्रथम बोललो पण तुमचा सरकारी परवाना पाहून जिवाची खात्री पटली उत्तम झाल नाहीतर मला एकटा एक सशोधक भेटला पण तोच शत्रुपक्षीय अस नको ! बोला आता ! झालेल उत्खननाच काम मला कोण दाखवू शकेल ? तुम्ही दहापधरा वर्ष या कामात आहा म्हणता तर मग कुणाला ना कुणाला तरी तुम्ही सागवून, मला हे उत्खननाच काम दाखवण्याची व्यवस्था करू शकाल ?"

" दुसर कोणी कशाला, मीच तुला हाताशी धरीन दुसऱ्याला शिकवून आपला विषय जास्त पक्का होतो, असा माझा अनुभव आहे "

आपण शिताफीने काम केले, असे समाधान मॅक्स मॅनरहेम आणि जॉन मेसन या दोघानाहि वाटले असावे आणि कशी पण आपण कुशलतेने दुस-ऱ्याची ओळख काढली व सधान बाधले, असे त्याना दोघानाहि वाटले

मध्याकाळी फेरफटका करण्यासाठी जॉन मेसन बाहेर पडल्यावर त्याच्या-मागून येऊन लॉरेन्सने त्याच्या खाद्यावर हात ठेवला "एवढा चकित होऊ

नकोस, शिकदर माझ्याबरोबर चल म्हणजे मी तुला सारा उलगडा करून सागेन "

ब्रिटिशाच्या अलेक्झाड्रियामधल्या एका युद्धखात्याच्या ऑफिसात तो त्याला घेऊन गेला लॉरेन्सला बोलण्याचा अति कटाळा असे तरी पण जॉन मेसनने थोडक्यात सागितलेली स्वत ची हकिकत ऐकून लॉरेन्सला समाधान वाटले तो म्हणाला, "शिकदरचा तू आता जॉन मेसन झालास का ? ठीक आहे नाही तरी नावात काय आहे ? बदकाच्या पिल्लाला पोहायला काही कुणी शिकवाव लागत नाही ते पाण्यात गेल की आपोआपच पोहू लागत तसच तुझ झाल आहे त्या जर्मन प्रोफेसराची तू ज्या सफाईन ओळख करून घेतलीस ती पाहून मला मोठी मौज वाटली तू मला पाहिल नाहीस तरी, मी तो सारा प्रकार प्रत्यक्षाच पाहिला

" जर्मनीशी युद्ध सुरू झाल्यावर युद्धाच्या या रणक्षेत्राच आधिपत्य लॉर्ड अलेन्बी याच्याकड आल आणि ते त्याच्याकड केवळ आल म्हणूनच मी माझा बेत पार पाडू शकत आहे कारण अनुभविक युद्धविशारदाचा सल्ला बाजूस ठेवून माझ्यासारख्या नवख्या वाटणाऱ्या माणसाचा बेत मान्य करून, मला तो पार पाडण्यासाठी सर्व सहाय्य इतर कोणी सेनाधिपति करण सभवल नसत

" माणसाच्याप्रमाणच राष्ट्र, ज्या बाजूची सरशी होत असते, त्या बाजूकड मिळतात आजवरचा युद्धाचा रागरग पाहून जर्मनाची सरशी होत आहे, अस पाहून तुर्कस्तानन जर्मनीशी दोस्ती केली आणि त्याच्या बाजून तुर्कस्तान युद्धात पडल आहे इजिप्त ही मध्यपूर्वेची किल्ली असल्यामुळ ती आपल्या हातात असावी अस जर्मनी व तुर्कस्तान याना वाटत जर्मनाच्या नावान का होईना, पण पुढमाग पूर्वापार चालत आल्याप्रमाण पुन इजिप्त गिळकृत करता आला तर तुर्कस्तानला हवाच आहे इजिप्त हातात आल्यास सुएझ कॅनाल आपल्या हाती ठेवता येईल व सुएझ कॅनालमधून जाणारी जहाजाच्या मार्गाची इग्लडची नस बरोबर दाबता येईल, हाहि त्याचा हेतु आहे या हेतून उद्युक्त होऊन तुर्कस्तानन जर्मनीच्या पाठबळान या बाजूस युद्ध सुरू केल आहे इकडच्या त्याच्या आघाडीवर लढणाऱ्या सैन्याची रसद आणि दारूगोळा तुर्कस्तानपासून इथवर मुद्दाम घातलेल्या लोहमार्गान पोचवला जात

आहे या सगळ्या अरबस्तानच्या रेताड प्रदेशातून त्यानी घातलेला लोहमार्ग जर उध्वस्त केला तर तुर्कस्तानची या आघाडीवरची शक्ति, रसद आणि दारू-गोळा याच्या अभावी, रसातळाला जाईल रेताडातून गेलेला एवढा मोठा लोह-मार्ग रक्षण करण हे त्याना मोठ अवघड काम झालेल आहे कारण साऱ्या अरब जमातीना त्याच्याविरुद्ध उठावणी करण्यास लावून, गनिमी काव्यान तो लोह-मार्ग जागोजाग तोडावा–मोडावा, पूल पाडावे, हा माझा बेत पाहिलास किती सोपा आहे दोन आणि दोन चार इतका सोपा! या बेताच्या पूर्तीसाठी युद्धखात्याकडून पैशाची व साधनाची मदत लॉर्ड अलेन्बी यानी देण्याचा हुकूम सोडला आहे तुर्कस्तान हे मुसलमान राष्ट्र आणि साऱ्या अरब जमाती याहि मुस्लीमधर्मीय! तेव्हा त्याच्यामध्ये धर्मैक्यान एकबधुत्व वास्तविक असावयाच पण राष्ट्राचे इतिहास अनेकदा प्रमुख व्यक्तीच्यामुळ ठरतात आणि स्वार्थापुढ यच्चयावत् लोकाना जास्ती काहीहि महत्त्वाच वाटत नाही पोलडला रशिया-विरुद्ध मदत करण्याची कबुली नेपोलियनन देण्यापूर्वी नाही का स्वतःचा केवळ स्वार्थ साधला? आपल्यापुढ लोटांगण घालीत आलेल्या पोलिश मुत्सद्याना त्यान सागितल होत की, पोलडातील एका वृद्ध उमरावाची बायको, मेरी वालेवस्का ही जर त्याला मिळाली तरच पोलडला मदत करण्याच्या भान-गडीत तो पडेल त्याचप्रमाण लोकाच्या आपमतलबीपणाच्या दोषाचा फायदा मीहि या वेळी घ्यावयाचा ठरविला. अरब जमातीतील काही प्रमुख नेत्याना मी हाताशी धरल आहे इराकच राज्य फझलला, आणि ट्रॅन्स–जॉर्डनच राज्य अब्दुल्लाला हव आहे त्यानी तुर्कस्तानाविरुद्ध आम्हाला मदत केली, तर त्याना मित्रराष्ट्राच्या पाठिब्यान ती राज्य बहाल करू, अस आम्ही वचन दिल आहे आणि त्याचप्रमाण मक्केचा राजा हुसेन यालाहि आम्ही नादी लावल आहे. खुद्द मक्केचा राजा हुसेन, फझल आणि अब्दुल्ला याना हाताशी धरून या मुस्लीम जमातीमध्ये फूट पाडण्याच आमच काम साध्य झाल आहे. इकड इजिप्तच्या खेदीव राजालाहि आम्ही तुर्कस्तानच्या माडलिकत्वातून सोडवून आमच्या माडलिकत्वाखाली आणल आहे त्याची खेदीव पदवी बद-लून आम्ही त्याला आता इजिप्तचा सुलतान केल आहे अर्थात् नावान त्याला सुलतान म्हटल तरी त्याच दाव आमच्याच हाती आहे. अशा एकदर चार मुसलमान राजाना फोडून आमच्याकड आणल्यावर त्याच्या हाताखालच्या

साऱ्या अरब जमाती तुर्कस्तानविरुद्ध चिथावून उठवावयाला कितीस अवघड जाणार ?

" माझा बेत पुष्कळ साधला आहे आणि आता जास्त जोराची उठावणी करून तुर्कस्तानच सार दळणवळण तोडाव, अशी मी हिमत धरली आहे वाळवटात माझ्या बाजून लढण्याला मी तुला पाचारण केल खर पण तस करण्यापूर्वी तुझ्यावर मी एक महत्त्वाची जबाबदारी सोपवणार आहे त्या कामाची सुरुवात तू तर अगोदरच केली आहेस प्रो मॅक्स मॅनरहेम हा वर्षानुवर्ष मध्यपूर्वेत, अरबस्तानात, आणि इजिप्तमध्ये उत्खनन आणि पुराणवस्तुसशोधन करीत आला आहे त्याचा या विषयाचा अभ्यास आणि व्यासग फार दाडगा आहे युद्ध चालू नसत आणि मला शक्य असत तर त्याच शिष्यत्व पत्करून मी आनदान या विषयात पडलो असतो परतु त्याच्याविषयी वाटणारा माझा व्यक्तिश आदर तूर्त बाजूस सारून मला कार्यभाग साधावा लागत आहे तू काल पाहिलसच की मॅक्स मॅनरहेमला इजिप्त सरकारकडून त्याच उत्खननाच काम चालू ठेवण्यासाठी परवाना दिला गेला आहे तो देण्यासाठी इजिप्तमधल्या ब्रिटिश वकिलातीतील सर रोनाल्ड स्टॉर्स याना मीच मसलत दिली मी असा विचार केला, की एखाद्या राष्ट्राच्या लोकामध्ये जे विशिष्ट गुण असतात ते अनेकदा त्या देशाच्या कुठल्याहि नागरिकामध्ये आहेत अस धरून चालण जास्त शहाणपणाच असत मला वास्तविक मॅक्स मॅनरहेम याच्या स्वभावाची काहीच ओळख नाही आणि माझा कयास चुकण्याचाहि तितकाच मोठा सभव आहे पण त्याच्या स्वभावाची पुरी माहिती नसताना, मी जर त्याच्यात सर्वसाधारण जर्मन माणसात आढळणार स्वराष्ट्राच उत्कट प्रेम आणि त्यासाठी वेळप्रसगी स्वार्थत्यागपूर्वक काम करण्याची हौस हे गुण आहेत अस धरून चाललो, तर ते बरोबर ठरेल माजराला मोकळ सोडल तर ते उदराचा माग बरोबर शोधून काढत ना ? तद्वत् मॅक्स मॅनरहेम याला उत्खननाचा मुक्त परवाना देऊन इजिप्तमध्ये आम्ही मोकळ सोडल आहे माझा तर्क असा आहे की शत्रुपक्षाकडील लोक या आघाडीवर जी कारस्थान करीत आहेत त्यात मॅक्स मॅनरहेम याला ते नक्की घेणार व मॅक्स मॅनरहेमवर बारीक नजर ठेवली तर शत्रूच्या कारस्थानाचा सुगावा आपल्याला लागू शकेल ! तुझा आमच्या

कुणाशी काही संबंध नाही असे दाखवण्यासाठी व मॅक्स मॅनरहेमशी संधान बांधण्यासाठी म्हणून मी तुला सुचविले होते तू पोर्तुगीज हिंदुस्थानचा रहिवासी म्हणून आज म्हटल्याचे स्मरते मग जॉन मेसन या ऐवजी गोव्याकडचे एखादे फ्रॅन्सिस, फरनांडिस वा मेंडिस असे नाव का नाही घेतलेस ? पण हरकत नाही त्याप्रमाणे तुझ्या नावचा पासपोर्ट युद्धखात्याकडून करवून घेत आहो त्याचप्रमाणे मॅक्स मॅनरहेम याच्या शिफारशीने सरकारात तू अर्ज दाखल कर, की तुला उत्खननाचे काम करण्याचा परवाना मिळावा तोहि तुला मग देण्यात येईल मॅक्स मॅनरहेमच्या शिफारशीने अर्ज पाठवल्यामुळे त्याच्यावर आमचा पुरा विश्वास आहे, असा त्याचा समज होण्याला जास्त मदत होईल आणि तो तसाच होणे आपल्याला सोयीचे आहे !"

जॉन मेसनने शांतपणाने आणि लक्षपूर्वक हे सारे म्हणणे ऐकून घेतले मग तो म्हणाला, "नेड ! (कारण लॉरेन्सचे कुटुंबीय लोक आणि त्याचे फार जवळचे मित्र त्याला 'नेड' म्हणून संबोधीत) तुझी माझी मैत्री असली तरी माझा होकार अथवा नकार न घेता एवढे महत्त्वाचे गुप्त काम माझ्यावर सोपवणे व तुमचे गुप्त बेत माझ्यापुढे उघड सांगणे तुला धोक्याचे वाटले नाही का ?"

"मुळीच नाही"—लॉरेन्स म्हणाला, "त्यात मला यत्किंचितहि धोका वाटला नाही कारण जॉन, मी माझे मित्र फार काळजीपूर्वक निवडतो आणि निवडल्यानंतर मग त्याच्याबरोबर स्वर्गात अथवा नरकात, कुठेहि जाण्याची माझी परिपूर्ण तयारी असते मला माणसाची चांगली परीक्षा आहे अशी मला प्रौढी वाटते ! शिवाय माझ्या बोटभर चिठ्ठीकडे पाहून, तू होतास तेथून हातचे काम टाकून धावत आलास, एवढ्यातच माझ्या बोलण्यातल्या सत्यतेची प्रचीति नाही का पटत ?"

प्रो मॅक्स मॅनरहेम याच्या शिफारशीने केलेल्या जॉन मेसनच्या अर्जाला सरकारी उत्तर आले की, उत्तर–आफ्रिकेमध्ये उत्खनन करावयाला सरकारची परवानगी आहे परन्तु त्यात असेहि म्हटले होते की, "जॉन मेसनने केलेल्या उत्खननाचा रिपोर्ट त्याने सरकारात वारंवार कळवावा, व उत्खननात सापडलेल्या वस्तु सरकारच्या परवानगीवाचून इजिप्तबाहेर हलवू नयेत " सरकारची मंजुरी कळल्याचे ऐकून प्रोफेसर मॅनरहेमना खरोखरीच पुष्कळ समाधान वाटले. त्यांनी जॉन मेसनला प्रथम काही महिने गिझाचे पिरॅमिडस्, लुक्झार,

फराओ राजवशाच्या मसणवटीचे खोरे वगैरे पुष्कळ जुनी ठिकाणे दाखवून आणली प्रोफेसर साहेबानी हे दाखविताना त्याला एवढी जुनी व उपलब्ध झालेली आणि त्याचबरोबर इतराना आजवर उपलब्ध नसलेली इतर माहिती ऐकविली की जॉन मेसनला ोफेसरसाहेबाच्या व्यासगाचे व सखोल अभ्यासाचे कौतुक वाटल्याशिवाय राहिले नाही हे युद्ध चालू नसते आणि युद्धकारस्थानात तो गुतलेला नसता, तर प्रोफेसर मॅनरहेम याच्या हाताखाली हे पुराणइतिहाससशोधन करणे खरोखरीच किती फायद्याचे झाले असते असा लॉरेन्सने बोलून दाखविलेला विचार त्याच्या मनात आल्याशिवाय राहिला नाही

ज्या वेळी आता पुढे काय करावे असा प्रश्न उपस्थित झाला त्या वेळी प्रोफेसर मॅनरहेम यानी सागितले की, " अलेक्झाड्रिआ शहराच्या पश्चिमेस काही कोस दूर, समुद्रतीराच्या अगदी लगत अशी एक जागा अस्तित्वात असावी की जिथ उत्खनन सुरू केल्यास पुष्कळ नव्या गोष्टी सापडतील त्यामुळ पुराण इतिहासावर नवा प्रकाश पडण्याची पुष्कळ शक्यता आहेच पण त्याहीपेक्षा जास्त म्हणजे मी जो एक तर्क बसविला होता त्याच्या खरेखोटेपणाचा पुरावा उपलब्ध होईल "

फराओ राजवशातील एक शाखा इजिप्त सोडून परत मध्ययुरोपात व तेथून आशिया खडातून चीनकडे गेली असावी असा त्याचा एक सिद्धात होता तेव्हा भूमध्यसमुद्राच्या तीरावर अलेक्झाड्रिआ बदराच्या लगतच एका विशिष्ट भागात उत्खनन केल्यास या गोष्टीचा पुरावा सापडावा असा त्याचा तर्क हे उत्खनन सुरू करण्याचा प्रोफेसरसाहेबाचा मानस होता व त्याचे शिष्यत्व पत्करलेल्या जॉन मेसनने या गोष्टीला दुजोरा दिला

जर्मन प्रोफेसर साहेबाच्या तर्काला खरोखरीच आधार आहे अशी जॉन मेसनची दिवसेदिवस खात्री पटू लागली कारण उत्खननाची जागा ही रणभूमीच्या इतक्या निकटच्या परिघात येत होती की प्रोफेसरसाहेब जर्मन आहेत या गोष्टीवरून शका घेणाराना ही जागा जणू काही बुद्ध्याच शोधून काढली असे वाटावे परतु जागा शोधणे निराळे आणि ती जागा खणू लागल्यावर त्यातून इजिप्शियन पुराणवस्तु खरोखरीच निघू लागणे निराळे शकेखोराना जोपर्यंत असा दावा सागता येत नव्हता की १९१४–१९१८

मधल्या महायुद्धात सोयीस्कर पडावे म्हणून अडीच हजार वर्षापूर्वी फराओ राजानी स्वत.ला याच ठिकाणी मुद्दाम पुरून घेतले होते, तोवर प्रोफेसर मॅनरहेम याच्या या विशिष्ट ठिकाणी होणाऱ्या उत्खननावर पुराण इतिहास-सशोधनाऐवजी काही राजकीय कारस्थानाचा त्याचा हेतु आहे असा आरोप करणे बाष्कळपणाचे ठरले असते !

प्रोफेसरसाहेब स्वत च मुद्दाम जॉन मेसनला सागत, " जॉन ! सरकारन परवाना देताना कामाची प्रगति त्याच्याकड वारवार कळविण्यास तुला सागितल आहे ना ? त्यात हयगय करू नकोस आपल्या उत्खननाची इत्थ-भूत हकीकत ज्या आठवड्याची त्या आठवड्याला पाठवीत चल पाठविण्या-पूर्वी माझ्याहि नजरेखालून घालीत जा, म्हणजे काही राहिल असल्यास मी सुचवीन ! "

हे रिपोर्ट पाहिल्यावर लॉरेन्स ऑफ अरेबिआसुद्धा चकित झाला प्रोफेसर-साहेब हे जर्मन असल्याने ते शत्रूस सामील असणारच अशा कयासाने आपण त्याना उत्खनन करू देत आहो, नी खरोखर पाहावे तो या सशोधकाने अशा तीक्ष्ण बुद्धीने काम सुरू केले आहे की युद्ध राहो बाजला, पण खरेच पुराणइतिहासासबधी दुर्मिळ व अगदी नवीन साहित्य हा प्रोफेसर मिळवीत आहे ! इजिप्तमधल्या आजवर उपलब्ध झालेल्या कुठल्याहि जागेपेक्षा ही जागा इतिहाससाधनानी जास्त समृद्ध आहे की काय, असे रिपोर्टावरून वाटत होते !

लॉरेन्स हा जरी अरब जमातीच्या करवी तुर्काच्या इकडच्या आघाडीला पायबद घालण्यात गुतला होता, तरी त्याला सारखे सगळीकडे हिंडावे लागत होते कैरोला येऊन युद्धखात्यात जाऊन वारवार विचारविनिमय करावा लागत होता शत्रूच्या नव्या कारस्थानाचा कानोसा घ्यावा लागत होता. अशा त्याच्या एका फेरीमधे अलेक्झाड्रिआमधे जॉन मेसनला सरकारी कचेरीत आलेला पाहून लॉरेन्स म्हणाला, " आपले सगळे कयास मूर्खपणाचे ठरणार असा रग दिसतो तर युद्ध सपल्यावर तुझ्याप्रमाण मॅनरहेमच शिष्यत्व पत्कराव असा तुझे उत्खननाचे रिपोर्ट वाचून मलासुद्धा मोह पडू लागला आहे, जॉन ! पण काय रे, तू आता इथ काय करतो आहेस ? "

"तुझ्या तुर्कीच्याविरुद्ध चालू असलेल्या मोहिमेचा रागरग समक्ष समजून घेण्यासाठी मी इथ आलो "

"का ? पुराणइतिहास सशोधनाचा इतक्यातच तुला कटाळा आला की काय ! तुझ्या रिपोर्टावरून पाहिल तर इतिहाससाधनाची जणू काही सुवर्ण-खाण तुम्हाला सापडल्याच सुदैव लाभलेल दिसत मग तुला युद्धविषयाकड लक्ष द्यावयास सवड कशी मिळत आहे ? "

"नेड ! तुझ्या सगळ्या प्रश्नाची उत्तर मला इतक्यात काही देता येणार नाहीत पण तू तुझ्या मोहिमेसबधी मला आता सर्व माहिती सविस्तर सम-जावून साग खर म्हणजे तुमच्या नकाशाच्या दालनात नेऊन नकाशावर मला तुझ्या हालचाली दाखव "

"का, तुला काही सशय आला आहे का प्रोफेसरसाहेबाचा ?"—लॉरेन्सने विचारले

"छे, म्हणण्यासारखा सशय तर काहीच नाही परतु आमच उत्खननाच काम इतक अपेक्षेबाहेर चागल चालू आहे की त्यामुळच मला वाटू लागत की सर्व गोष्टी इतक्या बेत आखल्यासारख्या व्हाव्या हा योगायोग फारच और आहे ! "

लॉरेन्सने पुढचा दीड तास मोहिमेची सविस्तर माहिती जॉन मेसनला समजावून सागितली एवढेच नव्हे तर तुर्काच्या हालचाली कसकशा होत आहेत हेहि समजावून सागितले तो म्हणाला, "तुर्की फौजा अशी मुसडी मारत आहेत की मला अनेकदा असा विचार पडतो की, युद्धनीति याना कळते का नाही ! कुठलाहि सेनापति आपली फौज चढाई करून पुढ नेताना आपल्या पुढ गेलेल्या सैन्याला भरपूर रसद मिळत राहील याची काळजी घेतो. पण तुर्काची सध्या चढाई अशी चालू आहे की तुर्की फौजा केवळ हवा-पाण्यावर जगतात, किवा हवेतून दारूगोळा उत्पन्न करतात, असच जणू काही वाटाव रसद कोठून मिळविण्याचा त्याचा विचार आहे, हा मला प्रश्न पडतो रसद मिळाल्याशिवाय त्याची अशी चढाई सभवतच नाही ! हा त्याचा रसदीचा साठा त्याना कोण देणार, हा मला प्रश्न पडला आहे आम्ही फोड-लेल्या अरब जमातीमध्ये कुणी तरी शत्रूला फितूर झालेले असले पाहिजेत, हा एक सभव ! व तुर्की सैन्याधिपतीना युद्ध कशाशी खातात, हे समजत

नाही, हा दुसरा सभव ! पण खर म्हणजे, हे दोन्ही सभव खरे नाहीत, अशी माझी जवळजवळ खात्री आहे, आणि तरीसुद्धा माझ्या प्रश्नाला उत्तर असलच पाहिजे नाही तर तुर्की सैन्य तीन आठवड्याच्या आत उत्तर इजिप्त-वर स्वारी कशाच्या जोरावर करण्याचा बेत करीत आहे, याचा मला उलगडा होत नाही !"

"तीन आठवड्याच्या आत इजिप्तवर स्वारी !" आपल्याशीच मोठ्याने म्हणत व शीळ वाजवीत जॉन मेसनने विचार केला आणि मग त्याने एक-दम प्रफुल्लित मुद्रेने म्हटले, "हा ! हा ! नेड्, तुझ्या प्रश्नाच उत्तर मला बहुतेक देता येईल, अस दिसत पण त्याअगोदर मला अस साग की, तुला अशी व्यवस्था करता येईल का इथल्या युद्धखात्याशी, की मी सूचना दिल्या-पासून तीन तासात आपल्या सैन्याच्या दोन निवडक बटॅलियन्स आमच्या उत्खननाच्या जागी दत्त म्हणून उभ्या राहू शकतील ?"

"हो, येईल की तस करता. पण का ?" लारेन्सने विचारले जॉन मेसनचे उत्तर ऐकून लॉरेन्सने त्याला नेऊन युद्धखात्याच्या मुख्य ऑफिसात लॉर्ड अलेन्बीपुढे उभा केला मुख्य सैन्याधिपतीची गाठ अशी सहजासहजी पडणे इतर कुणाला शक्यच नव्हते पण लॉरेन्सला सर्वत्र पूर्ण मुभा होती आणि म्हणूनच ते दोघे तेथपर्यंत लागलीच जाऊ शकले

लॉर्ड अॅलेन्बी याना जॉन मेसनने सर्व सविस्तर समजावून सागितल्यावर त्यानी त्याला विचारले, "प्रोफेसर मॅनरहेमच्या उत्खननाबद्दल तुला आजवर मुळीच शका आली नव्हती, अस असता आता तू एकदम साशक झालास हे कस ?"

"त्याच कारण लॉरेन्सन त्याची तुर्काविरुद्धची मोहीम मला आता सविस्तर समजावून सागितली ती मला न कळती, तर मला शकाहि आली नसती. इत्तक उत्खननाच काम सशयातीत तऱ्हेन चाललल्यासारख दिसन ! लॉरेन्सन मला आता सागितल की तीन आठवड्याच्या आत तुर्की फौजा इजिप्तपर्यंत पोचण्यासारखी मुसडी मारत आहेत परन्तु त्याच्या दारूगोळ्याच्या पुरव-ठ्याची तरतूद कशी होणार, याच त्याला गूढ पडल आहे. लॉरेन्सच्या या वाक्याची सागड माझ्या मनात चटकन् प्रो मॅनरहेमच्या एका वाक्याशी घातली गेली. उत्खननाच्या कामात परवा आम्हाला सापडलेल्या एका आश्चर्य-

कारक 'ममी'कड पाहून मी जेव्हा, 'काय आश्चर्यकारक आहे हा तुमचा शोध,' अस प्रोफेसर साहेबाना म्हटल, त्या वेळी त्याच्या तोडून अवचितपण वाक्य बाहेर पडल की, 'जॉन मेसन, हे तर काहीच नव्हे! तीन आठवडे थाब, मग आपल्या उत्खननाच्या शोधान तूच काय पण सार जग आश्चर्यचकित होईल!' प्रोफेसरसाहेबाच्या तीन आठवड्यान जगाला आश्चर्यचकित करण्याच्या वाक्याच खर मर्म लॉरेन्सच्या मोहिमेतील तीन आठवड्यात घाटत असलेल्या शत्रुचढाईच्या बेताच्या उल्लेखान माझ्या एकदम ध्यानात आल! तुर्की सैन्याला रसद कोठून मिळणार, याच उत्तर उत्खननाच्या जागी अस आहे!"

"मग आत्ताच ती सर्व जागा ताब्यात का नाही घ्यायची?" लॉर्ड अॅलेन्बीने विचारले

"एवढ्याचकरता की जर महत् प्रयासान शत्रु दारूगोळ्याचा जगी साठा तिथ करीत असला तर त्याना आणखी दोन आठवडे व पाच दिवस तसच करीत राहू द्या आणि दोन आठवडे सहा दिवसानी जर शत्रु त्या साठ्याचा उपयोग करणार असला, तर दोन आठवडे पाचच दिवसानी तो सर्व साठ्याच्या साठा आपल्या ताब्यात घेतल्यान त्या साठ्यावर अवलबून फार दूरवर चालून आलेल्या शत्रूच्या चढाईच्या सैन्याची केवढी धूळधाण उडेल!"

लॉर्ड अॅलेन्बी यानी आनदाने प्रफुल्लित झालेल्या चेहऱ्याने उजव्या हाताने जॉन मेसनच्या डाव्या खाद्यावर थोपटून म्हटले, "जॉन मेसन, तू तर झाकल माणिक आहेस, अस दिसत! कुठ शिकलास तू एवढ युद्धशास्त्र? यग मॅन, ठीक आहे तुझ्या बेताप्रमाण सर्व कर. तुला जे हव ते ते ताबडतोब तुला देण्यासाठी मी आता हुकूम सोडीत आहे पण लक्षात ठेव की फार हाव धरून एक क्षणाचाहि जास्त विलब लागता उपयोगी नाही. नाही तर शत्रूसाठी केलेल्या खड्ड्यात आपणच पडू शकू! तुझ्या बेताप्रमाण जर तू यश मिळवलस तर दोस्ताच्या तुर्कीविरुद्धच्या आघाडीवर मिळणाऱ्या यशाचा मोठा वाटा उचलणाऱ्या काही थोडक्या व्यक्तीमध्ये तुझी गणना होईल! गुड लक्, अॅण्ड गॉड स्पीड!"

त्यानंतर दोन आठवडे चारच दिवसानी जॉन मेसनने सैन्य मागवले व उत्खननाची सारी जागा आपल्या ताब्यात घेतली!

उत्खनन चालू होते ती सर्व जागा पूर्णत ताब्यात घेऊन, शोधून पाहिल्यावर मगच आपण आजवर केवढ्या मोठ्या ज्वालामुखीवर निर्धास्त बसलो होतो याची दोस्त राष्ट्राच्या इकडच्या सैन्याधिपतीची खात्री पटली !

प्रो मॅक्स मॅनरहेम हा दहा पधरा वर्षे या भागात पुराणइतिहाससशोधक म्हणून वावरत होता म्हणून वर म्हटलेच आहे. जर्मन युद्धनीतिविशारदानी अतिशय दूर धोरणाने या प्रोफेसर साहेबाना या कामावर पहिल्यापासून नेमले होते जग पादाक्रात करण्याची हाव त्याना नवीन नव्हती म्हणून भूमध्यसमुद्राचे, इजिप्तचे व सुएझ कॅनालचे महत्त्व ओळखून ही नाक्याची ठिकाणे आपल्या हाती पुढे मागे घ्यावीच लागणार अशी खूणगाठ त्यानी मनात बाधली होती व त्यासाठी कुणालाहि न कळत तयारी हलके हलके करून ठेवण्याचा त्याचा बेत होता. म्हणून प्रो मॅक्स मॅनरहेम यानी आपल्या सिद्धाताचे पिल्लू हलकेच इजिप्शियन इतिहासात सोडून दिले हा सिद्धात असा सोयीनेच बसविलेला होता की ठरलेल्या ठिकाणी केव्हाहि खणू लागावे की सिद्धाताच्या सत्यतेचा हवा तेवढा पुरावा बाहेर येतो आहे कारण सर्व पुराणवस्तु जशा हव्या तशा जर्मनीमध्यें कुशल कारागिराकडून बनवून जर्मन युद्धखात्याने उत्खननाच्या जागी प्रो मॅनरहेम याच्या सागण्याबरहुकूम पुरवून घेतल्या होत्या जुने करडक, जुन्या खुर्च्या, पलग, माळा, मणी कठ्या साऱ्या अगदी तीन हजार वर्षापूर्वीसारख्या ! नी काय अचबा की त्याचा रग वगैरे म्हणे इतका चागला असे त्या वेळी, की अगदी काल रगवल्यासारख्या दिसायच्या त्या ! इतकेच नाही तर इजिप्शियन ममी करणे शक्य झाले नाही, तर जर्मन युद्धखात्याने कुठून तरी तशा दोन ममी महत्प्रयासाने मिळवून त्या सुद्धा आणवून येथे गाडून घेतल्या ! सारी उत्खननाची जागा अशी बेमालूम करवलेली की खरा पुराणइतिहाससशोधक सुद्धा पार फसावा !

पण उत्खननाच्या या हुकमी सशोधनाच्या जागेखेरीज, त्याला लागूनच जमिनीत खूप ऐसपैस तळघरे खदक, भुयारे त्यानी खणवून घेतली होती. ती अशी की उत्खनन केल्यावर उत्खननाची माती या भुयारावर अनायासे आपोआप रचली जावी उत्खनन कुणी नीट पाहिले तरी त्याच्या लक्षात सुद्धा येऊ नये की आपण दारुगोळ्याच्या मोठ्या कोठारावरूनच चालत

आहो ! ही सर्व जागा हलके हलके तयार करून झाल्यावर भूमध्य समुद्रातून या किनाऱ्यावरून जाणाऱ्या जर्मन व्यापारी बोटीवरून हलके हलके अनेक वर्षे गुपचूप दारूगोळा तेथे पोचवून त्याचा साठा केला गेला होता

आता या तयारीचा उपयोग करवन घेण्याची संधि आली होती तुर्कांची चढाई मुसडी मारून पूर्वेकडून सुएझ कॅनॉलवर आली की जर्मन पाणबुड्या बोटी या समुद्रभागाचा काही काळच कबजा घेणार होत्या तेवढ्यात काही बोटीवरून जर्मन सैन्य या किनाऱ्यावर उतरून या दारूगोळ्याच्या व युद्ध-साहित्याच्या कोठाराचा ताबा घेणार होते तेथून अलेक्झाड्रिआवर विद्युत्-वेगाने चढाई करून ते काबीज केले की इजिप्त काबीज करणे मग अगदी सोपी गोष्ट होती

मॅनरहेमला जॉन मेसन हा शत्रुपक्षाकडील हेर असू शकेल ही कल्पना नव्हती असे नाही, पण फाजील आत्मविश्वासाने तो फसला ! जॉन मेसनला जाणून बुजून आपल्या हाताखाली घेतल्याने व त्याच्याच करवी रिपोर्ट जाऊ दिल्याने दोस्ताच्या युद्धखात्याला सहजासहजी गुंगारा देता येईल अशी त्याची कल्पना व मुख्य म्हणजे 'जॉन मेसन'च्या असामान्य बुद्धिमत्तेची व कर्तबगारीची त्याला खरी परीक्षा झाली नाही ! जॉन मेसनला तो अगदी लेचापेचा समजून चालला नी शेवटी जॉन मेसनच्याचमुळे सर्व बाजू त्याच्या अगावर उलटली, नी इतकी अनेक वर्षे रचलेले कारस्थान अजिबात फसले !

पश्चिमेकडून खुद्द जर्मन सैन्याचा येणारा अवचित छापा व मदत बार-गळल्यावर तुर्की फौजेची पूर्वेकडून येणारी चढाई पार बारगळली ! लॉरेन्सने अरब जमातीच्या करवी तुर्कांविरुद्ध केलेल्या बडाळीमुळे तुर्कांचा डाव व मोहीम फसली हे इतिहासात नमूद झाले, पण जॉन मेसनने केलेल्या प्रचड पण गुप्त कामगिरीचा उल्लेख कुठेहि होऊ शकला नाही हे प्रकरण युद्धाच्या अप्रसिद्ध रहस्यातच दडन राहिले !

उत्खननाची जागा काबीज होत आहे हे पाहिल्यावर प्रो. मॅनरहेमने आपल्या रिव्हॉल्वरच्या चार गोळ्या जॉन मेसनवर मारल्या पण त्याची सद्दीच बळकट ! त्या साऱ्या त्याच्या डाव्या दडाच्या वरवरच्या मासात मात्र घुसल्या त्याहून त्याला काही झाले नाही उरलेल्या दोन गोळ्या स्वत च्या मस्तकावर उडवून प्रो. मॅनरहेमने आत्महत्या केली !

त्याला शाबासकी देताना लॉर्ड अलेन्बी त्याला म्हणाला, " जॉन मेसन ! तुझी कामगिरी एवढी मोठी आहे की तुझं कस उतराई व्हाव हे समजत नाही तुला सैन्यात व परराष्ट्रखात्यात काही मोठा हुद्दा हवा तर तो मी देववीन तुझ्या बादशहाकडून काय हवा तो मानमरातब करवू शकेन तुला काय हव ते माग मी ते तुला देवविण्याची हमी घेईन !"

जॉन मेसन म्हणाला, "तुमची शाबासकी मिळाली बस्स झाल ! मी मागीन ते इतकच की हे सार प्रकरण अप्रसिद्ध राहाव आणि माझा नाम-निर्देश चुकूनहि कुठ होऊ नये ! "

लॉर्ड अलेन्बी उद्गारला, " तू वेडा तर नाहीस ? "

लॉरेन्स मधेच शिरून म्हणाला, "आहे, तो अगदी ठार वेडा आहे ! मी ओळखतो ना त्याला ?"

" म्हणजे, तुला हव तरी काय ?" पुन. लॉर्ड अलेन्बीने आपल्या कानावर विश्वास न बसून विचारले

"एक पासपोर्ट मी मागीन त्या नावाचा, दुसर म्हणजे कराचीला जाण्या-साठी बोटीच एक तिकीट व परवाना, आणि तिसरी गोष्ट म्हणजे तुमची मैत्री !"

या सर्व गोष्टी सहजच होण्यासारख्या होत्या जेव्हा शेवटी लॉर्ड अलेन्बीने जॉन मेसनशी हस्तादोलन करून त्याचा निरोप घेतला तेव्हा त्याने फक्त, "यग मॅन ! गॉड् ब्लेस यू !" एवढेच उद्गार काढले कारण अशी अगदी जगावेगळी व्यक्ति त्याने जन्मात कधी पाहिली नव्हती !

आणि लॉरेन्सने तर जॉन मेसनशी हस्तादोलन करताना चकार शब्दहि काढला नाही !

---

# प्रकरण : ११–कराचींत आगमन

हिंदुस्थानचा किनारा आज दिसू लागणार दुपारी म्हणून बोटीवरच्या अधिकाऱ्याच्याकडून जॉन मेसनला कळले, आणि त्या वेळेपासून त्याच्या जिवाला ओढ लागली मायदेश ! कित्ती वर्षांनी आपण मायभूचा किनारा पाहाणार आपण सडेफटिंग आपल्याला मायापाश कुठलेच नाहीत जगाच्या पाठीवर कुठेहि हिंडलो तरी सारखेच कुठेहि आपण मेलो तरी कुणाला आपले ना सोयर ना सुतक असे असूनसुद्धा आपण मायदेशी परत पोचणार या विचाराने आपले अंतःकरण का उचंबळून यावे हे त्याला कळेना विचाराने पाहिले तर याच मायदेशातून परिस्थितीच्या गाजणुकीला कटाळून त्याने कित्येक वर्षापूर्वी देशांतर केले होते परदेशी जावे नि नशिबाची परीक्षा पाहावी म्हणून ! मुक्याचे सोंग घेऊन अरबी पडावावरून देश सोडून जाताना कन्याकुमारीच्या भूशिराचे, मायदेशाच्या पदकमलाचे आपण कसे दर्शन घेत उभे राहिलो होतो हे त्याला आठवले या देशातून गाजून जावे लागत असून त्याहि वेळी त्याच्या मनात कालवाकालव झाली नी आज पाहतो तो आपल्या टणक झालेल्या हृदयात मायदेशचे दर्शन होणार या विचाराने आपुलकीचा पाझर फुटलेला या देशात त्याला आपले म्हणणारे कुणी चिटपाखरूहि थाबलेले नव्हते त्याची वाट पाहात मग कशाची ही ओढ ? दगडमातीची ! होय असेल. त्या देशच्या मृत्तिकेचीहि असेल ओढ नाही तरी याच देशाच्या मृत्तिकेतून तो आला ते रजकण नी त्याच्या शरिरातील रजकण आत्मीयतेच्या सहसवेदनेने झंकारत असतील ! का ज्या पिढ्यान्‌पिढ्याच्या ऋणानुबंधामुळे या देशाची सांस्कृतिक व ऐतिहासिक बीजे त्याच्या हाडीमाशी खिळली होती त्यानी हा कोलाहल मांडला होता ! कशाने का असेना मायदेश दिसणार या विचाराने उत्पन्न झालेली जिवाची आतुरता नी ओढ त्याला जाणवल्याशिवाय राहिली नाही

या अनेक वर्षाच्या देशांतराने आपल्यात केवढे महदंतर पडले आहे हे त्याच्या लक्षात आले, जाताना आपली बुद्धि किती अप्रगल्भ होती ज्ञानाचा खरा म्हणजे आपल्याला संपर्कसुद्धा झाला नव्हता असे म्हणायला हरकत नाही तेव्हा आपल्या भोवतालच्या छोट्या परिघात होणाऱ्या लहान सहान

घटनानी आपले मन अस्वस्थ होत असे क्षुल्लक गोष्टीना आपण फाजील महत्त्व देत होतो तेव्हा, आणि म्हणून त्याच्या बधनातून आपल्या मनाची सुटकाच कशी ती होत नसे आपले छोटे जग तेवढे आपल्याला दिसावयाचे आणि आपण स्वत म्हणजेच त्याचा मध्यबिदु मानीत आल्याने श्वासानिश्वासानी देखील त्या खुरटलेल्या जगात मोठाल्या उलाढाली घडल्याप्रमाणे वाटे

पण या अनेक वर्षाच्या पर्यटनाने बाह्य जगाची यथार्थ ओळख पटली होती आता. या विस्तीर्ण जगाच्या पसाऱ्यात आपण किती अणुवत् आहोत हे त्याला कळले होते परिश्रमपूर्वक केलेल्या अभ्यासाने बुद्धि कमावलेली होती बुद्धीला बाळसे आले होते ! त्याच्या जवळची ती अमोघ शक्ति होती आता ! त्या बुद्धीच्या कुशाग्रतेमुळे भोवतालच्या परिस्थितीचे आकलन हा हा म्हणता आता होत होते कुठल्याहि गोधळातून चट्दिशी त्याच्या बुद्धीला त्या प्रश्नातली मखी एकदम समजत असे

त्याशिवाय त्याच्या दृष्टीतला पूर्वीचा कोतेपणा जाऊन तिला आता मखोलता नी विशालता आली होती सारी चराचर सृष्टि ही एकमयी आहे हे त्याला कळून आले होते त्यामधून कुठलीहि गोष्ट वेगळी काढून तिचा अन्वयार्थ बरोबर लावता येत नाही लावला तर तो जगावेगळा ठरतो कुठलीहि गोष्ट जिथल्या तेथे बसवून सृष्टीच्या सपूर्ण पार्श्वभूमीवर कल्पून पाहिल्याशिवाय तिचे यथार्थ ज्ञान होऊ शकत नाही हे त्याला कळले होते

त्यामुळे मायदेश सोडून जाणारी व्यक्ति आणि आज परत येणारी व्यक्ति याच्यामधे महदतर पडले होते आज त्याच्यात एवढा आत्मविश्वास आला होता की, त्यामुळे कुठेहि रिक्तहस्ताने जावे, पण थाबावे तेथे परिस्थितीला बघता बघता लगाम घालून आपण तीवर आरूढ होऊन स्वामित्व हमखास मिळवावे, अशी त्याला धमक वाटे ! परिस्थितीच्या दुगाण्या खात धुळीत पडणारा रडतराऊत तो आता उरला नव्हता त्याच्यामध्ये आता पुरुषार्थ होता कर्तबगारी बाणलेली होती परिस्थिति त्याच्या सशक्त हातामधे चिकणमातीसारखी असे आपल्या इच्छेनुरूप तो ती वळवी, वाकवी व घडवी केवळ आपल्या शरीरमनावरच त्याने प्रभुत्व मिळविले नव्हते, तर आता तो खुद्द परिस्थितीचाच परमेश्वर झाला होता !

दोन प्रहरीची वेळ असल्यामुळे जरी ऊन लख्ख पडले होते तरी किनारा फारसा चटकन् ध्यानात येत नव्हता किनाऱ्याजवळचे उथळ पाणी गढूळ मातट रगाचे दिसत असल्याने त्यातून उजाड, रेताड किनारा कुठे सुरू होतो, हे लावून सहज ध्यानात येत नव्हते सिंधच्या किनाऱ्यावर कुठेहि ताडा-माडाच्या झाडाचा औषधालाहि मागमूस दिसत नव्हता नाही तर कारो-मांडल वा मलबार किनारपट्टीवर ताडमाडाच्या झाडाच्या लयलगीने पांढऱ्या धोतरावर करवतीकाठ उठून दिसावा, तद्वत् चटकन् किनारा लक्षात येई

प्रथम कराचीचे दीपगृह दिसू लागले त्यावर तांबड्या नी पांढऱ्या रंगाच्या आडव्या पट्ट्या काढलेल्या होत्या सहज आणखी पुढे आल्यावर मनोरा बेटाची पक्की बांधलेली दगडी भिंत दिसू लागली त्या भिंतीच्यापुढे आण-खीन एक लांबलचक भिंत लाटांचा जोर शोषवण्यासाठी व खाडीच्या आतल्या अंगाला पाणी जास्त स्थिर व्हावे म्हणून बांधलेली होती खाडीच्या उजव्या बाजूला चुनखडी दगडाची लाटांमुळे झिजून झिजून मुळकाडच्या झालेली ऑयिस्टर बेटे वर आली होती, तर डाव्या बाजूस रेताड खडकाळ किनारा लांबच लांब वेलांटी घेऊन हॉग्ज्बेवरून केप मॉन्सपर्यंत दूरवर पसरला होता. जहाज हलके हलके खाडीच्या तोंडातून बंदरात शिरू लागले तेव्हा मनोरा बेटावरची घरे स्पष्ट दिसू लागली, तर उजव्या बाजूला केमारीचे छोटे खेडे दिसू लागले या बोटीवर हिंदुस्थानला परत येणारे बरेच सैनिक आणि इतर लोक होते त्या बहुतेकांचा आनंद त्यांच्या पोटात मावत नव्हता ते हात हालवत होते, व टाळ्या उडवीत होते आणि त्यांच्या आनंदाला धक्क्यावर जमलेल्या अनेक लोकांकडून प्रत्युत्तर मिळत होते

त्यालाहि आनंद वाटला होता, पण त्याच आनंदातून आता सूक्ष्म खेदाची लकेर उठून गेली तो खेद त्याच्या स्वतःकरता नव्हता त्याला वाटत, तर त्याच्या पायाला घट्ट बिलगून बावरून उभ्या राहिलेल्या एका छोट्या बालिकेबद्दल! ती बिचारी इतकी घाबरून गेली होती की मोकळपणाने रडणेसुद्धा तिला मुष्कील झाले होते माणसांचा कोलाहल आणि ती गर्दी पाहून पक्षाच्या पिल्लाप्रमाणे तिची वाचा भीतीने हृदयाच्या घरट्यात दडून जाऊन बसली होती प्रभाकराचा, म्हणजेच आतापर्यंत जॉन मेसन म्हण-

विणाऱ्याचा हात ममतेने त्या छोट्या बालिकेच्या मस्तकावरून फिरला. त्याने तिच्या खाद्यावर हलके हलके थोपटले आणि तिला धीर दिला

ज्या वेळी हे जहाज ताबड्या समुद्रातून एडनच्या आखातातून बाहेर पडले होते, त्याच वेळी त्या जहाजाला दुसऱ्या एका टॉर्पिडो लागून बुडलेल्या जहाजाच्या मदतीला जावे लागले होते त्याचे जहाज जवळ आल्यावर बुडणाऱ्या बोटीवरील अनेक माणसाना भरून घेऊन दहावीस लाईफबोटी त्याच्याजवळ आल्या प्रभाशकर तो सर्व प्रकार पाहात आपल्या बोटीच्या डेकवर उभा होता एका बोटीतून ही छोटी बालिका आणि तिची आई याना डेकवर घेतले गेले पण डेकवर पोचल्यावर त्या मुलीची आई फार वेळ जगली नाही टॉर्पिडो लागल्यानतर झालेल्या स्फोटात त्या बाईला जखमा झालेल्या होत्या ती मरण्यापूर्वी शुद्धीवर न आल्याने तिला भेदरून गेलेल्या आपल्या छोट्या मुलीची दृष्टभेटहि घेता आली नाही, की तिला कुणाच्या हवाली करता आले नाही त्या भयानक प्रसगामधे सर्वत्र एवढा हलकल्लोळ झाला होता की कुणालाच इतराची फारशी वास्तपुस्त करत बसण्याला सवड नव्हती ती छोटी बालिका आपल्या मृत आईच्या देहावर पडून तिला 'आई' 'आई' म्हणून मारखी हाक मारत होती तिने आपल्या आईचे हात उचलले तर ते जडपणाने खाली पडत तिने आईचे तोड खूप हलविले की कदाचित् तिला झोप लागली असेल आईला झालेल्या जखमा तिला दिसल्या तरी तिचे प्राणोत्क्रमण झाले आहे, हे कळण्याइतकी ती मोठी नव्हती आजुबाजूच्या गोधळात ज्या वेळी त्या बालिकेला आपल्या आईच्या कुशीत घाबरून दडावेसे वाटत होते, त्याच वेळी तिच्यावरची मायापाखर नाहीशी होऊन गेली होती. ती बालिका खूप खूप आक्रदून रडत होती प्रभाशकराने बुडणाऱ्या बोटीवरच्या आणलेल्या लोकाची व्यवस्था करण्यात इतका वेळ स्वखुषीने भाग घेतला होता पण ज्या वेळी त्याच्या दृष्टीस वरचे दृश्य पडले त्या वेळी त्याची सारी सहानुभूति त्या बालिकेसाठी त्याच्या हृदयात उसळली त्याच्या जन्मभरच्या अनुभवात जे काही अनुभव अतिशय परिणामकारक होते, त्यापैकी तो एक होता निराधार पोरके झालेले ते मूल त्याच्या आईच्या मृत शरिरावरून ओढून वेगळे काढताना त्याला जेवढे प्रयास पडले तेवढे फारच क्वचित् त्याला इतरत्र पडले असतील सूर्याच्या गुरुत्वा-

कर्षणातून पृथ्वीला खेचून बाहेर काढणे कदाचित् जास्त सोपे झाले असते, इतका आईच्या वात्सल्याचा बळकट पाश त्या मुलीभोवती पडलेला होता. मोठ्या मुष्किलीने प्रभाशकरने तिला त्या कलेवरापासून दूर केले आणि तेव्हापासून त्या बालिकेचे लालनपालन प्रभाशकराकडे आले त्या दिवसापासून त्याने त्या मुलीच्या नात्यागोत्याची कोण मडळी आहेत याबद्दल खूप तपास केला पण त्याचा काही उपयोग झाला नाही स्वत आजवर लग्न करून तो ससारात पडलेला नसताहि अशा अकल्पित रीतीने एका लहान बालिकेच्या प्रतिपालनाची जबाबदारी त्याच्यावर आली ती जबाबदारी झाडून टाकून त्यातून मोकळे होणे योग्य आणि रीतसर असूनहि त्याने ती जबाबदारी खुषीने अगिकारली

म्हणून आता बोट कराचीच्या धक्क्यापाशी येऊन लागल्यावर प्रभाशकराला एकटेच बोटीवरून उतरायचे नव्हते तर त्याच्याबरोबर ही छोटी बालिकाहि होती आणि तिलाच तो गोजारून धीर देत होता

ज्या वेळी कस्टमच्या अधिकाऱ्यानी त्याचे सामान कोणचे म्हणून विचारले तेव्हा त्याने एक छोटी हॅडबॅग तेवढी बोटाने दाखविली "तुम्ही परदेशातून येत आहा, नी एवढच तुमच सामान?" कस्टमच्या अधिकाऱ्याने महदाश्चर्याने विचारले

"हो का?"

"इतराच्या सामानाकड पाहा एकदा म्हणजे कळेल!"

"त्याशी मला काय कर्तव्य? सामान कमी असण हा गुन्हा तर नाही ना मानीत तुम्ही?"

"छे! आमच हो काय जात त्यात?" कस्टम अधिकाऱ्याने हसत म्हटले, आणि हातातल्या खडूने, प्रभाशकराच्या, झाकण उघडून पुढे धरलेल्या, बॅगच्या बाजूवर खूण करून ती पास केली

प्रभाशकरने आपले व त्या बालिकेचे बस्तान एका चागल्याशा हॉटेलात तात्पुरते ठेवले आणि पुढचा आठवडाभर तो सर्व कराचीतून पायी हिंडला. त्याची चाणाक्ष नजर साऱ्या गोष्टीचे सूक्ष्म निरीक्षण करीत होती अधून मधून तो थाबून कुणाला तरी काही वेचक प्रश्न विचारी नी पुन्हा पुढे चालू लागे

प्रत्येक शहराला स्वतःचे असे वैशिष्ट्य प्राप्त झालेले असते, असे त्याच्या मनात आले न्युयॉर्क पाहा विसाव्या शतकाच्या आधिभौतिक, शास्त्रीय प्रगतीचा छाप त्या शहराच्या चेहेरेपट्टीवर दिसतो त्या शहराचे जीवन एकंदरीने अद्यावत् यांत्रिक युगाच्या द्रुतलयीच्या ठेक्यावर चालते ! एखाद्या गडबड्या श्रीमंत, चलाख पोरीशी तरुण मुलाची आठवण होते त्याकडे पाहून तर लंडन पाहा पूर्ववयात कष्ट करून संपत्ति मिळवून आता सुखसमृद्धीत राहाणाऱ्या, पण हौस मनात असली तरी शरीर थकल्याने आलेल्या संथपणाचा भारदस्तपणा म्हणून आरामाने दिवस काढणाऱ्या वृद्ध माणसासारखे ते वाटते पॅरिस पाहिले तर वाटते, त्याच्या मनात विचार आला, की मुलीच्या अजाणतेपणी पैसेकरी वृद्धाला आई-वडिलांनी मुलगी विकली, नि आता तो वृद्ध पति मरून साऱ्या संपत्तीची मालकीण ती झाली नेमके वयात आल्यावर नवरा नसल्याने कुचंबणा झालेल्या व म्हणून लाजलज्जा सोडून थेरथेर करणाऱ्या रंगेल, गुलहौशी तरुणीप्रमाणे हे शहर आहे ! आणि मक्का, बनारस, जेरुसलेमसारखी पुरातन शहरे पाहून वाटते की स्वतःच्या धार्मिकपणाचा टेंभा मिरवणाऱ्या कर्मठपणाने वठून गेलेल्या, नी खरखरमुंडेपणाने ना स्वतःला ना इतरांना सुख, अशी वृत्ति असणाऱ्या जरठ, खाष्ट, दुष्ट व्यक्तीप्रमाणे ती आहेत !

ज्या शहरचा स्वभाव व्यक्तीच्या स्वभावाशी जमतो, तेथ रहाण्यात त्या व्यक्तीला सुख लागते कराची पाहिल्यावर त्याला वाटले की, आपण पालन करीत असलेल्या छोट्या बालिकेप्रमाणेच ते आहे कारण कराची शहर अगदी नवे वसलेले होते हवापाण्याला अतिशय नामी नी निरोगी, भौगोलिक दृष्ट्या मोठ्या नाक्याच्या जागी असल्याने भरभराटीला येऊन त्याला लौकरच फार महत्त्व प्राप्त होईल, हे प्रभाशंकरच्या तेव्हाच लक्षात आले अगदी नवे बंदराचे शहर असल्याने त्याला जुनाटपणाचा कसा तो संपर्क नव्हता शहराची वस्ती हळके हळके वाढू लागली होती व्यापार उदीम वाढत होता नवी नवी घरे बांधली जात होती संस्था, शाळा, कॉलेजे, बाजार, सारे काही नवीनच उघडले जात होते थोडक्यात म्हणजे, कराची शहराला मोठे उज्ज्वल भविष्य होते आणि म्हणून प्रभाशंकराने कराचीलाच वास्तव्य करायाचे मनात ठरविले नाही तरी आजवर तो खूप खूप हिंडला होता

" केल्याने देशाटन " व " शास्त्रग्रंथ विलोकन " हे चातुर्य येण्याचे दोन भाग त्याने अगोदरच अनुसरले होते कुठे तरी रहावयाचेच मग त्यातल्या त्यात हिंदुस्थानात का नको ? आणि त्यातहि निवडावयाचे तर हे नूतन आणि वर्धिष्णु शहर बरे असा त्याने विचार केला विचार ठरल्यावर तो सफल करण्याचे बेत योजावयाचे आणि ते हमखास पुरे करावयाचे यातच प्रभाशंकराची कर्तबगारी होती

प्रभाशंकराने प्रथम त्या छोट्या मुलीची व्यवस्था लावून दिली तिथल्या ख्रिश्चन मिशनच्या कॉन्व्हेन्टच्या शाळेत त्या मुलीला त्याने दाखल करवून घेतली आणि तिच्या राहण्याची व अभ्यासाची तेथे सोय झाल्याने, इतर व्यवसायाकडे लक्ष देण्यास तो मोकळा झाला प्रभाशंकराने हॉटेल सोडले, आणि केमारीला एक खोली मजूर वस्तीत त्याने राहावयास घेतली रोज सकाळी उठून तो बंदरात धक्क्यावर काम करावयास जाणाऱ्या मजूर लोकाबरोबर कामाला जाऊ लागला तो त्याच्या भाषेत बोले, त्याच्यासारखा राही, त्याच्यात मिसळे आणि त्याच्या बरोबरीने बंदरात काम करी आणि लौकरच 'शंकर' हा साऱ्या मजूरवर्गात मजूर म्हणूनच सर्वांच्या परिचयाचा झाला. मजूर म्हणून काम केले तरी व्यक्तीचे महत्त्व कोठेहि झाकू शकत नाही, या न्यायाने तेथेहि तो वर चढू लागला लौकरच पुढाकार घेऊन त्याने आपल्याबरोबर काम करणाऱ्या मजुरांचे टोळके बनविले त्या टोळक्यातील साऱ्या मजुरांना दिवस रात्र न पाहाता परोपरीने मदत करून त्यांच्या अडिअडचणीला पाठीशी उभे राहून, त्याने त्यांचा एवढा विश्वास संपादन केला, की शंकर मुकादमला ते जीव की प्राण मानू लागले त्यानंतर त्याने आपल्या टोळक्यातल्या चार विश्वासू व चलाख मजुरांना त्याच्या देखरेखीखाली काम करणारी चार टोळकी जमवून दिली शंकर मुकादमाच्या हाताखाली काम करणारी अशी आता शंभर मजूर माणसे झाली होती

एकदा बंदरात दारूगोळा लादलेले एक जहाज आले जहाजावरून थोडा दारूगोळा उतरवून झालेला असताना तो ठेवलेल्या भागाच्या शेजारच्या भागात धूर येऊ लागला बोटीच्या अधिकाऱ्यांनी धूर येत असलेल्या भागात वाफ भरून त्यातील साध्या मालाला आग न लागावी म्हणून करावयाचा तो सर्व बंदोबस्त केला, पण न जाणो त्या भागाच्या तापलेल्या लोखंडी

भितीमुळे पलीकडचा दारूगोळा एखाद वेळेला पेटला तर मोठा स्फोट होऊन तेथील सर्व माणसाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडतील, अशा भयाने सारे काम करणारे मजूर ती बोट सोडून निघून आले एवढेच काय, पण बोटीवरचे खलाशीसुद्धा भरभरा पळून धक्क्यावर दूर जाऊन उभे राहिले बोट समुद्रात असताना आग लागती, तर ती वाचविणे खलाशाना भागच होते कारण बोट सोडून समुद्रावर ते जाणार तरी कुठे ? पण येथे तशी स्थितिहि नव्हती झाले ! बघता बघता, एकाच्या तोडून दुसऱ्याला अशी कळता कळता, या बातमीला एवढे अतिरजित व भयकर स्वरूप आले की अर्ध्या तासात त्या बोटीच्या अर्ध्या मैलात उभा राहायला कुणी चुकून कबूल होईना वाफ भरल्याने ज्वलनाला लागणारा ऑक्सिजन न मिळाल्याने आग तग धरू शकत नाही व वाफ भरल्यामुळे तिच्या जोराने ती साधीफटीतून बाहेर येते व बाहेरची हवा आत जाऊ शकत नाही, हे सर्व आग विझविण्याचे अगदी योग्य उपाय होते बोटीच्या अधिकाऱ्यानी त्याचा अवलब केला, तरी शेजारच्या भागातला दारूगोळा शक्य तितक्या लौकर उतरून दूर नेणे हेहि जरूरीचे होतेच होते व तो उतरविण्याइतकी सुरक्षितता होती असे बोटीच्या कप्तानाने व थोरल्या मालिमाने कितीहि जीव तोडून सागितले तरी कोणीहि बोटीकडे फिरकण्याला कबूल होईना सगळे म्हणत, "याना काय होत वाटेल त्या थापा मारायला काम झाल तर हातावर दीड रुपाया टाकतील आणि समजा झाला स्फोट तर जीव जाईल आमचा ! काय नडल आहे एवढ आमच सुखासुखी जीव धोक्यात घालण्याच !" बदरातले दोन चार पारशी स्टीव्हेडोर ( माल लादण्या–उतरविण्याची कत्राटे घेणारे कत्राटदार ) आपल्याकडून काही मजुराना बक्षिसाची लालूच दाखवून तेथे जाण्यास उद्युक्त करण्याचा प्रयत्न करू लागले त्याच्या बक्षिसाची रक्कम जो जो वाढू लागली, तसतसा त्याचा अर्थ धोका खरोखरीच फार आहे, असा मजूर करू लागले या वेळी शकर पुढे आला त्याने विचारले, "काय बक्षीस देणार आहात तुम्ही तो माल उतरविण्याबद्दल ?"

त्या पारशाने म्हटले, "तू काय मागशील ते !" पारशाला वाटले मजूर मागून किती मागणार, हजार दोन हजार मागेल

पण शकर म्हणाला, "तुझ्या धद्याची अर्धी भागिदारी !"

पारशी इंग्रजीमध्ये शिवी हासडून म्हणाला, " अरे, जारे भागिदारीवाल्या ! "

प्रभाशकरने अतिशय अस्खलित इंग्रजीमधे त्या पारशाला म्हटले, " माझी समजूत होती की तुम्हा कंत्राटदाराना अक्कल आणि धडाडी दोन्हीहि पुष्कळ असतात पण तुझ्या बोलण्याचा नूर पाहून मला वाटू लागल आहे की तुम्हा लोकाना धडाडी तर नाहीच नाही, पण तुमच्या अकलेचहि दिवाळ वाजल आहे ! ठीक आहे माझ काय गेल ! दारूगोळा लादलेली बोट केवढ्या धडाक्यान उडते हे पाहाण्याचा मोका काही वारवार येत नाही पण त्या बोटीबरोबरच तुमच्या कंत्राटाचहि दिवाळ वाजणार हे खूप समजून असा ! कारण तुमची पत सरकारात उरावयाची नाही की, बोटीच्या कपन्यात उरावयाची नाही आणि तुमच्यावर मजुराचा विश्वास किती आहे, त्याचा तर मासला आपण आताच पाहिला आहे तुम्हाला यातून एकच माणूस वाचवू शकेल आणि तो म्हणजे मी ! "

पारशाने ओळखले की, हे काम न्यारे आहे हा साधा मजुराचा मुकादम नव्हे तो त्याला म्हणाला, " ठीक आहे तुला भागिदारी देऊ "

प्रभाशकराने आपल्या तुकडीला विश्वासात घेऊन म्हटले, " चला रे गड्यानो ! माझ्यावर विश्वास टाका, नी चला माझ्याबरोबर. "

त्याची तुकडी तयार होईपर्यंत त्याने त्या पारशाला म्हटले, " मी केवळ तोंडी आश्वासनावर जाणार नाही या क्षणी कागदावर लिहून द्या तसे, नी त्यावर तुम्ही बाकीचे अधिकारी लोक साक्षीच्या सह्या घाला तो कागद जाकिटाच्या खिशात घालीन तेव्हा मी पुढे जाईन आणि समजा स्फोट झाला आणि मी मेलो तर माझ्याबरोबर तुमच्या कराराचा कागदहि जाईल ! "

पारशी कंत्राटदाराने तसे लिहून दिले एवढेच नव्हे तर बदरावरच्या सरकारी मुख्य अधिकाऱ्याने आणि बोटीच्या कप्तानाने त्या करारावर गर्दीगर्दीने साक्षी घातल्या तसे न करून गत्यतर नव्हते तो कागद घडी करून जाकिटात ठेवीत प्रभाशकर हसला आणि आपली तुकडी घेऊन त्याने दारूगोळा उतरविण्यास सुरुवात केली

काहीहि अपघात न होता, काम फत्ते झाले सारा दारूगोळा सुरक्षित काढून, दूर पोचविला गेला आणि धोका नाहीसा झाल्यावर बोटीची आग विझविण्याचे काम जास्त जोरात करता आल्याने ती आगहि विझली.

सगळ्यांना हसे आले. प्रभाकरच्या कर्तबगारीने तो पारशी एवढा बेहद्द खुष झाला की केलेल्या करारातून सुटण्याचा अल्पकालहि प्रयत्न न करता, आपण होऊन त्याने प्रभाकरला वकिलाकडे नेऊन, कायद्याबरहुकूम करारमदाराचा कागद नीट तऱ्हेने करविला. जो प्रभाकर थोड्या महिन्यापूर्वी मजूर म्हणून काम करू लागला होता, तो आता कराची बंदरातल्या कंत्राटदाराचा निम्मा भागिदार झाला होता.

---

# प्रकरण : १२—कांहीं जुने ऋणानुबंध

जगात बहुतेक असे आढळते की जो जो एखादी गोष्ट जास्त जास्त उच्च प्रतीची बनत जाते, त्या त्या मानान तिच्यात नाजुकपणा येऊ लागतो. हापूसचा आंबा उंची वस्तू असतो, पण त्या झाडामध्ये रायवळ आंब्याच्या झाडामधला चिवट तगडेपणा नसतो. एखाद्या फुलाची जात मोठी नामी आणि दुर्मिळ असते, पण ती इतकी नाजुक असते की त्याचे रोप मोठ्या कष्टाने कडक ऊन, थंडी, वारा यापासून रक्षिलेल्या पुष्पकुंजात लावावे लागते. त्याउलट रानफूल वासाला नी रंगाला कमी असले तरी उघड्या माळरानावर हवापाण्याच्या कडाक्याला न जुमानता तग धरून राहते. माणसाचेंहि तसेच आहे. माणूस जितका जास्त सुसंस्कृत आणि सुधारलेला, तितकी त्याच्या अंगातली प्रतिकारक्षमता आणि जोम कमी होतो. म्हणूनच इतिहासात वारंवार सुधारणेच्या शिखरावर पोचलेली राष्ट्रे त्याच्या मानाने रानटी वाटणाऱ्या जमातीच्या आक्रमणाखाली नामशेष होऊन गेल्याची उदाहरणे आढळतात. पण सुसंस्कृतपणा अंगी आणताना आपल्या अंगचा कडवेपणा जर माणसांना राखता आला तर खरोखर सोन्याहून पिवळे होईल. प्रभाकराने आपल्यामध्ये कष्टपूर्वक बुद्ध्याच सुसंस्कृतपणा आणि कडवेपणा या दोन्ही सद्गुणांचा मोठा सुंदर समन्वय केला होता. याला एक प्रकारे सिद्धीच म्हणावयाची, नाही तर काय? "मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास, कठिण वज्रास भेदू ऐसे" ते असेच नाही का? सुसंस्कृत माणूस मेणाहूनहि मऊ असतो, कारण

इतराच्या हितासाठी त्याला स्वत्व विसरून गम खाण्याची सवय असते पण ध्येयाचा वा तत्त्वाचा प्रश्न उद्भवतो तेव्हा सारे जग पुढे आले तरी बेगुमानपणे आपला सत्याग्रह सोडणार नाही, पोटचा गोळा आडवा आला तरी कापून काढीन, अशी कडवी वृत्ति असल्यावाचून चालत नाही जेथे या दोन्ही विरोधी गुणाचा उत्तम सयोग होतो तेथे माहात्म्य सहजच सभवते

प्रभाशकराने वर्षा दीडवर्षात धक्कयावरील जहाजाच्या मालाची चढउतार करण्याच्या कत्राटात एवढा जम बसविला होता की त्याचा भागिदार आणि तो याच्या खेरीज बाकी सर्व कत्राटवाल्याना या धद्यातून चबूगवाळे आटपावे लागले होते याचे कारण असे की प्रभाशकराने त्याची फारशी वाच्यता न करता मजुराचा एक सघ स्थापन केला आणि आपल्या भागिदारीपैकी बरीचशी रक्कम त्या सघाच्या जोपासनेकडे आणि मजुराच्या अडीअडचणीत त्याना हुकमी मदत मिळण्याच्या एका योजनेकडे लावून दिली त्याने या सर्व गोष्टी इतक्या गाजावाजा न करता केलेल्या होत्या की हा कत्राटदार इतका निस्वार्थी असेल, गुलुखावेगळ्या तऱ्हेने आपला फायदा इतक्या मोठ्या प्रमाणाने तो परत मजुराच्याच हिताकडे परत खर्ची टाकीत असेल, ही गोष्टच फारशा लोकाना कळली नाही परतु मजूरमडळीच्यातील जी कोणी पुढारी वजनदार माणसे होती, त्याना मात्र ही गोष्ट पक्की ठाऊक असल्याने प्रभाशकर त्याना देवमाणस वाटू लागला आणि त्यातहि फारसे नवल नाही कारण त्या वेळी हिंदुस्थानातल्या मजूरवर्गाचे सघटन फारसे सुरू झालेले नव्हते त्यांच्या प्रश्नाची कैफियत जोराने पुढे आलेली नव्हती अशा काळात इतर भाडवलदाराप्रमाणे मजुराच्या कष्टाच्या कमाईतून झालेला अवाढव्य नफा केवळ स्वत गिळकृत न करता तो जर परत त्या कष्ट करणाऱ्या मजुराच्या प्रीत्यर्थ खर्च करणारा असामान्य माणूस निघाला तर, मजूरवर्गाला त्याच्याबद्दल केवढी आदरबुद्धि वाटेल ?

पण प्रभाशकरच्या भागिदाराला मात्र प्रभाशकरप्रमाणे पैसे द्यावे लागत नसत त्याचा सर्व नफा तो भागिदार केवळ स्वत घेई त्यामुळे त्यालाहि तिकडे वाटे की प्रभाशकर हा आपल्याच जातीचा दिसतो मात्र त्याची हुशारी निःसशय फारच आहे सुदैवाने तो भागिदार घेतल्यापासून धद्याला अशी बरकत आली आहे की याच्या अगोदरच या माणसाची नी आपली

गाठ पडली नाही, याबद्दल त्याला फार खत वाटे पेस्तनजीचा प्रभाशकरावर एवढा लोभ आता जडला होता, आणि त्याबद्दल त्याला एवढा विश्वास उत्पन्न झाला होता की, पेस्तनजीचे पान प्रभाशकरावाचून हालत नसे. म्हणून जेव्हा प्रभाशकरने पेस्तनजीला सागितले की आपण एक पडाव विकत घेतला आहे, त्या वेळी पेस्तनजी त्याला म्हणाला की, "अरे शकर तू हा नवा उद्योग सुरू केलास तर मला त्याच्यात भागिदार म्हणून का नाही घेतलस ?"

प्रभाशकर म्हणाला, "पेस्तनजी, या नव्या धद्यात मी माझी या धद्यातील कमाई घालत आहे बुडलो वाचलो त्या धद्यात तर मी एकटा ! पण तुला या नसत्या जोखमीत कशाला घालावयाच ? म्हणून नाही विचारल "

पेस्तनजी म्हणाला, "प्रभाशकर मी बिझिनेस करता करता बुढ्ढा झालो चागला असामी पाहिला म्हणजे मी त्याला तेव्हाच हेरतो तुझ्या हाताला यश आहे, तेव्हा तुझी जर हरकत नसली तर तुझ्याबरोबर माझहि भाडवल त्यात घालायची माझी तयारी आहे आहे का तुला कबूल ?"

आणि त्यामुळेच पेस्तनजीने घातलेल्या व त्याच्या स्वत च्या भाडवलावर, असे मिळून प्रभाशकराने पाच पडाव विकत घेतले होते त्याच्या पडावाची दुसरी सफर झाल्यावर त्याने पडावाच्या मोठ्या नाखुद्याला हिशोब विचारला तेव्हा असे आढळून आले होते की किफायत फारशी न होता, पडावाच्या डागडुजीखाली त्याने खर्चच जास्त दाखविला होता पेस्तनजी ते पाहून इतका सर्द झाला की आपले भाडवल परत सोडवून घ्यावे की काय अशा विचारात तो होता पण शकर म्हणाला, "तुला हव तर मी तुझ भाडवल परत देऊन टाकीन, पण तस करू नको. या धद्यात पुष्कळ किफायत आहे तो नीट चालविला पाहिजे मात्र !"

"ते कस करावयाचा तुझा विचार आहे ?"

"पाहाशीलच आता तू !"

प्रभाशकराने पाची पडावाच्या नाखुद्याना पुढे बोलावून आणून सागितले होते की, "हे पाची पडाव निरनिराळे न पाठवता एकाच वेळी मी पाठवणार आहे तुम्हा पाचापैकी जो जास्त वाकबगार ठरेल त्याला मी एका पडावाच्य

नफ्यातील एक तृतियांश भाग देणार आहे दहा दिवसात सफरीवर निघायची तयारी करा मोठ्या नाखुद्याच्या पडावावर मी स्वत येणार आहे !"

त्या सफरीवर मोठा पडाव खुद्द प्रभाशकरने आपणच स्वत हाकारला पडावाचा मालक स्वत इतका कुशल दर्यावर्दी आहे याची प्रत्यक्ष खात्री पटल्यावर सर्व पडावाचे नाखुदे इतके मऊ आले की बोलता सोय नाही. त्याना कळून चुकले की आपली मात्रा प्रभाशकरपुढे चालणे शक्य नाही पडाव चालवण्यात नी सफर करण्यात अशी कोणतीच गोष्ट नाही की जिच्यामध्ये प्रभाशकराला स्वत ला गम्य नाही स्वत च्या देखरेखीखाली केलेल्या या सफरीच्या शेवटी प्रत्येक पडावामागे एवढा नफा झाला की तो पाहून पेस्तनजीने प्रभाशकराला शाबासकी देत उद्गार काढले की, "अरे बाबा, तू तर झाकल माणिक आहेस ! "

हिशोब खोटा दाखवलेल्या नाखुद्याला प्रभाशकरने रजा दिली होती आणि त्यातल्या त्यात जास्त अनुभविक पण विश्वासू वाटलेल्या एका तरुण नाखुद्याला त्याने पाची पडावाच्या काफिल्यावर मोठा नाखुदा म्हणून नेमले.

वेचक, कर्तृत्ववान व इमानी माणसे शोधून हाताशी धरण्याचे प्रभाशकराचे कसब काही औरच होते त्यामुळे त्याने एकच नव्हे तर अनेक धदे हातात घेतले प्रत्येक धद्यात जातीने लक्ष घालावयाचे, त्या त्या धद्याची घडी सुरळीत बसवून द्यावयाची, व तो विश्वासू मदतनिसाच्या हाती सोपवून आपण केवळ देखरेख ठेवून अग काढून घ्यावयाचे, अशी प्रभाशकराने पद्धत सुरू केली त्याचा परिणाम असा झाला की सात आठ निरनिराळे धदे प्रभाशकर करू लागला त्या सर्वांची सूत्रे स्वत च्या हाती त्याने ठेवली होती पण कुठल्याहि धद्यात तो स्वत ला पूर्ण गुरफटून घेत नसे त्यामुळे त्याला स्वत ला हवी तेवढी मोकळीक असे तो म्हणे, "धद्याच बस्तान अस बसविल पाहिजे की सर्व गाड एखाद्या घड्याळाप्रमाण बिनबोभाट सुरळीत चालल पाहिजे मोठ्या घड्याळाला आपण आठवड्यातून एकदा किल्ली देतो, मग आठवडाभर त्याला हात लावावा लागत नाही तशी धद्याची चक्र आपोआप फिरत राहिली पाहिजेत, तर त्याला म्हणायच सुव्यवस्था!'

कराचीमधे मोठमोठ्या जुन्या व्यापाऱ्याचा एक सघ होता व्यापाऱ्यापैकी

बडीबडी धंडे त्यात असत काही वर्षातच प्रभाशकरला या व्यापारी मघात सभासद होता आले या "व्यापारी महाजन सघ" सस्थेचे सभासदत्व मिळणे म्हणजे मान्यता मिळाल्याची खूण मानीत व्यापारी सघातली बहुतेक मडळी कित्येक वर्षे व्यापारधदा करीत असल्याने स्वत ला मुरब्बी मानीत बहुतेक सभासद चागले वयस्क होते सुरुवातीला त्याना प्रभाशकरासारख्या तरुण माणसाला पाहून वाटे की आपल्या मानाने या पोरसवदा तरुणाला व्यापार-धद्यात काय समजते पण हलके हलके ज्याला त्याला कळून येऊ लागले की वय नी अक्कल याचे नेहेमीचे त्रैराशिक प्रभाशकराच्या बाबतीत लागू पड-णारे नाही कारण प्रभाशकराने अनेकविध धद्यामधे आपले बस्तान बसविले असल्यामुळे या ना त्या रीतीने प्रत्येक व्यापाऱ्याशी त्याचा नेहेमी सबध येऊ लागला खरा व्यापारी असा काही लोकाच्या सागीवागीवरून कधी आपली मते बनवीत नाही अतिशय धोरणीपणा नी धूर्तता हे तर त्याचे भाडवल तेव्हा ज्या वेळी प्रत्यक्ष अनुभवाती त्या प्रत्येकाची पक्की खात्री झाली, प्रभा-शकराच्या पक्केपणाबद्दल, त्याच वेळी त्या सर्वांनी त्याला मान्यता दिली

एकदा त्यापैकी सट्टे करणारा एक सटोदिया सर्व व्यापाऱ्यादेखत प्रभा-शकरला म्हणाला होता की, "अहो तुमच ठीक आहे कुठलाहि धोका पत्करायला नको तुम्हाला थोडा थोडा नफा मिळवत वर्षानुवर्ष बसायच त्यात जीव नाही धद्याचा राजा म्हणज सट्टा ! सट्टा न करील तो व्यापारी कसला हो ?" प्रभाशकरने म्हटले होते, "मी तर उभा जन्म सट्टाच करीत आलो आहे ! माझ सर्वस्व पणाला लावून गमावायची माझी तयारी असते आणि त्यामधे सर्वस्व गेल तरी त्याबद्दल माझ्या मनाला यत्किचितहि खत वाटणार नाही !"

"मग तुम्ही तर कधी सट्ट्यात पडत नाही"

"कारण मला सपत्तीची हाव नाही वाटत तुमच्यासारखी !"

"मग व्यापारधदा कशासाठी करता ?"

"त्या प्रश्नाच उत्तर तुम्हाला सागत बसण्याची मला गरज दिसत नाही!"

सभाषण तापत आहे असे दिसल्याने जो तो पुढे सरकून जास्त लक्ष देऊन ऐकू लागला त्यामुळे तर सटोदियाला जास्तच ईर्षा चढली ता उद्गारला, "तुम्ही उत्तर सागितल नाहीत, तर आम्ही आमच्या मनात काय समजायच

ते समजू आणि ते असे की तुम्ही डरला! जाऊ द्या. सगळ्यानाच काही सट्टा खेळायची धडाडी असत नाही! पण प्रामाणिकपणाने ते कबूल करा की! " सगळे व्यापारी सटोदियाने जिंकली, अशा बुद्धीने हसले

खरे म्हणजे प्रभाशंकर इतका मनाचा टणक होता की केवळ कुणी हसले कुत्सितपणाने, एवढ्यावर त्याला काहीहि वाटले नसते त्याने त्याकडे अजिबात दुर्लक्ष केले असते पण या वेळी का कोण जाणे, त्याने दुर्लक्ष केले नाही त्याचे डोळे विस्फारित झाले त्याने ओठ दाबून धरून क्षणभर विचार केला मग ना म्हणाला, " प्रामाणिकपणाबद्दल तुम्ही बोललात वाटते? माझ्या बोलण्याची प्रचीति दाखविण्याची माझी तयारी आहे, या सर्व व्यापारीमंडळीच्या साक्षीने, पण तुम्ही एवढे सटोदिये, तुमची आहे का? "

सटोदिया उत्तरादाखल खदखदा हसला " अर्थात्च!"

" बघा बरं! मागून त्यातून शब्दांचे श्लेष काढू लागाल, चेष्टेत बोलत होतो अशी पड घ्याल, इतर पळवाटा शोधाल!"

" छे, हो, तशी आम्हाला सवय नसते तुमच्यासारखी! "

" ठीक आहे मग मी तुम्हाला आव्हान करतो की तुमची सर्व मालमत्ता तुम्ही, व माझी मालमत्ता मी सट्टा खेळल्याप्रमाणे पणाला लावू या. या व्यापारी मंडळीपैकी आपण दोघे म्हणू त्या एकाला, एक नाणे वर फेकून ओली सुकी करू द्यावे त्यात जो हरेल त्याने आपली सर्व मालमत्ता दुसऱ्याच्या हवाली करावी कायदेशीर तऱ्हेने बक्षिसपत्र करून, आणि हे शहर सोडून जावे! द्यूताचाच हा प्रकार याहून आणखी सट्टा जास्त काय? सर्वस्व घालवायचे, वा दुसऱ्याचे सर्वस्व मिळवायचे! आहे का तुमची तयारी "

आता मात्र बाकीच्या व्यापाऱ्यांना वाटू लागले, हा प्रकार ठीक नाही आणि ते त्या दोघांना परावृत्त करण्याच्या भरीस पडू लागले पण सटोदियाला प्रभाशंकर म्हणाला, ' खुशाल माघार घ्या आता, पण धडाडी-प्रामाणिकपणा याबद्दल तुमचे शब्द परत घेतले असे कबूल करा '

तो सटोदिया शब्द परत घ्यायला तयार नव्हता, शेवटी तो या जुगाराला तयार झाला त्या दोघांनी सर्वांच्या देखत एका व्यापाऱ्याला नाणे वर फेकायला सांगितले. तसे करण्यापूर्वी प्रभाशंकर म्हणाला, "पाहा नीट

विचार केला आहेत ना ? तुम्हाला माझी माफी मागून माघार घ्यायची असली तर अजून माझी हरकत नाही !"

पण तोहि हट्टाला पेटला होता तो म्हणाला, "पाहा बर राजेश्री ! माझ्याजवळ मग दयामाया मिळायची नाही ! सर्वस्व हरलात तर राहत घरसुद्धा माझ्या हवाली कराव लागेल ! " शेटजीचे डोळे त्याच्या मनात दयामाया नाही, याची जणू काही साक्षच देत होते त्याच्या बुबळावरच्या लाल शिराचे जाळे एवढे दाट होते की त्यामुळे त्याच्या दृष्टीला भयानकता आली होती

तिरस्काराने प्रभाशकर नुसता हसला शेवटी त्या दोघानी निवडलेल्या एका व्यापाऱ्याने रुपाया बाहेर काढून आपल्या हगेरीयन कॅपमधे गदगदा हलवला आणि समोरच्या टेबलावर ती टोपी एकदम पालथी घातली त्यावर उजवा हात धरून त्याने विचारले, " तुम्हापैकी रुपायाची वरची बाजू कोण सागणार ?" प्रभाशकर म्हणाला, " शेटजी म्हणतील त्याप्रमाण करू त्याना हव तर त्याना मागू द्यात अथवा त्याची इच्छा असली तर मी सागेन "

शेटजी प्रभाशकराला म्हणाले, " होऊन जाऊ द्यात तुमच्याच तोडून "

" ठीक आहे " प्रभाशकर म्हणाला त्याने क्षणभर एकाग्र नजरेने त्या पालथ्या टोपीकडे निरखून पाहिले, आणि तो म्हणाला, ' राजाचा छाप वर आहे "

बघणाऱ्या साऱ्या व्यापाऱ्याना या अजब तऱ्हेने होणाऱ्या सट्ट्याची मोठी मौज वाटत होती. टोपी घालून नाण्याची आता कुठली बाजू दिसणार, व हट्टाला पेटलेल्या या दोन जुगारी माणसापैकी कोण जिकणार नी कोण भिकेला लागणार याचे भयकर कुतूहल वाटू लागले होते माना ताणून सर्वजण पाहात होते

कदाचित् शेटजीची सद्दी सपून गेलेली असावी, किवा प्रभाशकराचे नशिब फार उच्चीवर आलेले होते, म्हणून असेल, पण प्रभाशकराचा बोल खरा ठरला ! उथळ पाण्याला खळखळाट फार म्हणतात. तसेच झाले धडाडीने सट्टा खेळण्याची भाषा बोलणारा शेटजी हा विचित्र जुगार हरल्यावर अगदी अनपेक्षितपणाने थरथर कापू लागला त्याचा खालचा जबडा सैल होऊन खाली लोबू लागला. त्याच्या चेहऱ्यावर भीतीची अवकळा पसरली.

आणि मोठ्या कष्टाने इतर लोकानी त्याला सावरत सावरत त्याच्या गाडीत नेऊन बसविले !

मजूरवस्तीतली आपली खोली जरी त्याने ठेवली होती, तरी 'रणछोड लाईन्स' मधे व्यापारीमडळीच्या वस्तीमधे त्याने एक घर घेतले होते. तेथे प्रभाशकर आता राहात असे त्या दिवशी सध्याकाळी सारे काम आटपून प्रभाशकर जो घरी पोचतो तो त्याचा नोकर म्हणाला, "आपली वाट पाहात एक वृद्ध बाई बसल्या आहेत." त्याने आत जाऊन पाहिले तो वार्धक्याने अगदी वाकलेली, आणखी त्यात तोडावरचा पदर पुढे लोबत असल्याने चेहरा जवळ जवळ न दिसणारी अशी वृद्ध स्त्री उभी होती ती म्हणाली, "प्रभाशकरशेटजी आले का ? मला त्याच्याशी बोलायच आहे"

प्रभाशकर म्हणाला, "माताजी, मीच प्रभाशकर काय हव आहे आपल्याला ?"

"शेटजी, तुम्हा लोकाना असले जुगार खेळून काय फायदा होतो हे मला तर कळत नाही तुम्ही आमच्या शेटजीच्या बरोबर जुगार खेळून त्याच सर्वस्व हिरावून घेतल आहे अस मला कळल आहे आमच्या शेटजीची मालमत्ता त्यानी राखली वा गमावली तरी मला त्याबद्दल चकार शब्द काढावयचा नाही पण मी तुमच्याजवळ केवळ भिक्षा मागावयास आले आहे सारें गमावल्याच्या धक्क्याने आमच्या शेटजीना अर्धान्ग वायूचा झटका येऊन घरी आल्यापासून त्यानी हातरूण घेतले आहे मी जन्मभर परक्याच्या दमडीलाहि शिवले नाही नी आता शेवटच्या थोड्या दिवसातहि मी माझ सत्व सोडणार नाही ! आता तुमच्या झालेल्या घरी शेटजीना राहू द्या, अशी भिक्षा मला तुमच्याजवळ मागायची आहे त्याच्या पश्चात्, कारण यातून ते वाचतील असे वाटत नाही, मी तुमचे घर सोडून काशीयात्रेला तत्क्षणी चालती होईन"

प्रभाशकरचा मनात काही शका आली आणि त्याने एकदम विचारले, "माताजी, तुम्ही शेटजीच्या कोण ?"

"मी त्याची धर्मपत्नी" ती वृद्ध स्त्री कापऱ्या आवाजात म्हणाली.

"म्हणजे तू निपुणाबेन तर !" प्रभाशकर एकदम ओरडून म्हणाला. आणि त्याने पुढे होऊन निपुणाबेनचे पाय धरले निपुणाबेनला अधत्व आले होते. तिने आपला हात आपल्या पायाजवळ आलेल्या प्रभाशकराच्या डोक्या-

वरून आणि चेहऱ्यावरून फिरविला. आधळ्या माणसाच्या डोळ्याची गेलेली दृष्टि त्याच्या तळहातात येते त्या स्पर्शाने तिला आपल्या मानलेल्या मुलाची ओळख पटली. ती म्हणाली, " किरण, बाळा ! तू मला म्हातारीला पुन्हा भेटशील अस मला वाटल नव्हत ! कित्ती वर्ष झाली, तू घर सोडून गेल्याला ! तुला डोळेभरून पाहायची फार इच्छा होती, पण देवान माझी दृष्टी नेली. त्यामुळ आता मला तू दिसायचा नाहीस पण माझी दृष्टि गेल्याच मला वाईट वाटत नाही. दृष्टि असती तर आयुष्यातल्या निरनिराळ्या गोष्टी पाहून माझ्या जिवाला वाईट वाटल असत म्हणून ईश्वरान दयाबुद्धीन माझ्या डोळ्यावर आपला हात ठेवला, अस मी समजते बाळा, तुझच का नाव आता प्रभाशकर ? "

" होय मा, तुला सोडून गेल्यापासून मी जी अनेक नाव धारण केली, त्यापैकी हे एक नाव पण ती सारी इतर जगाकरता–तुला मी पूर्वीचा किरणच आहे. "

प्रभाशकरने तिला हातानी धरून बैठकीवर नेऊन बसविल्यावर ती वृद्ध स्त्री पुढे म्हणाली, " काय देवाघरचा न्याय आहे पाहा तू आमचा मानलेला मुलगा. आमच्या साऱ्या मालमत्तेचा वारस तू पण मी सारख सागत असताना शेटजीनी तुला द्यायच जे नाकारल आणि ज्यानी तुला घरातून हाकून दिल, त्यानीच स्वत इतक्या वर्षानी तुझ्याशी सट्टा खेळून त्यात हरून, शेवटी तुझ्या ते स्वाधीन केल ! किती विचित्र आहे दैवाचा हा सारा खेळ! पण किरण, तू केव्हापासून सट्टा खेळू लागलास ?"

" छे, छे ! मा, तुझ्या आशीर्वादान सार जग फिरून आलो मी पण कुठल्याच लाछनास्पद मोहाच्या मी आजवर बळी पडलो नाही गुलाबशेटानी माझ्यावर भित्रेपणाचा आणि अप्रामाणिकपणाचा आरोप केला, त्यामुळ मला दुसर गत्यतर उरल नाही पण मा, आता तू मनात यत्किचितहि आदेशा येऊ देऊ नको जे सार गुलाबशेटच आहे, ते जरी मी जिकल, तरी सारच्या सार परत तुझ्या चरणी वाहात आहे एवढंच नव्हे तर जे मी मिळविल असेल तेहि सर्व तुझच आहे. आता तुझ सत्व जाण्याचा यत्किचितहि प्रश्न उद्‌भवत नाही ! तुझ्या स्वत च्या घरी तू मानान आणि मालकीन राहा. एवढच काय, पण मी स्वत येऊन गुलाबशेटला, त्याची मालमत्ता त्याना

परत दिली आहे अस सागण्यान जर त्याच्या तब्बेतीला काही उतार पडण शक्य असल तर तेहि आनदान मी करीन."

"शेटजीनी तुला ओळखल नाही का, किरण ?"

"नाही, मा ! पण मी त्याना ओळखल आणि त्यामुळच इतक्या अनेक वर्षांनी त्याच्या स्वभावात यत्किंचितहि अतर न पडल्याच पाहून मी इरेला पडलो. आणि खर विचारशील तर, मी ज्या स्थितीत घर सोडून गेलो, त्या दुर्धर स्थितीत तू त्या घरी राहिल्यावर इतके दिवस जिवत राहशील, अशी मला मुळीच आशा नव्हती म्हणूनच गुलाबशेटना तिथ पाहिल्यावर मी त्याना तर केव्हा ओळख दिली नाहीच, परतु तुझी चौकशी करण्याच्याहि भरीस पडलो नाही "

"किरण बाळ, मी तुला मोठ केल्याचे तू खरोखरीच चागले पाग फेडले आहेस मी जसा देवाला मागितला तसाच सद्गुणी मुलगा तुझ्या रूपान मला देवान दिला आहे पण बाळा, आता तुझ्याजवळ शेवटच आणखी एक मागण मागते. तू येऊन शेटजीना काय सागशील ते साग, पण एवढी बरीक गोष्ट कर की, त्यानी देशोधडी लावलेला किरण तो तूच याची मात्र जाणीव त्याना देऊ नकोस कारण त्या धक्क्यान त्याचा जीव जास्तच बेचैन होईल. पण मी तुझ्याजवळ मागते ते हे नव्हे मी मागते ते अस की, त्यानी तुझे जे काही अपराध केले असतील वा तुला अन्याय केला असेल, ते सर्व उदार मनान विसरून मनापासून त्याना क्षमा कर कारण सूडाची भावना तुझ्या मनात राहिली असली तर त्याच्या जिवाला काही शातता मिळणार नाही. मी त्याची धर्मपत्नी पापपुण्याच आमच खात आमच्या दोघाच्या नावाच आहे मी केलेल्या तुझ्यावरच्या ममतेसाठी त्यानी तुझे केलेले अपराध तू विसर नी त्याना अत करणपूर्वक क्षमा कर ते तस वागतात याच खर कारण म्हणजे आपण काय करत आहो याची त्याना खरी ओळख पटली नाही, असच मान "

"मा, तुझी आज्ञा मला शिरसावद्य आहे. त्यामध्ये मला मागण्यासारख काय आहे ? कारण जरी तू 'गुलाबशेटला क्षमा कर' म्हणून सागण्यास इथ नसतीस, तरीसुद्धा मी गुलाबशेटला आपणहून क्षमा करून त्यानी मला केलेला अन्याय विसरून गेलो असतो जर सूडाची भावना माणसान हृदयात

वागवून आपल्याला लोकानी केलेल्या लहानमोठ्या अन्यायाची परतफेड करावयाच ठरवल, तर त्याला उभा जन्म पुरा पडणार नाही आणि पूर्वी झालेल्या अन्यायाची भरपाई करेपर्यंत बोलून चालून अपूर्ण स्वभावाच्या माणसानी भरलेल्या या जगात तुम्हाला नवे अन्याय होणार नाहीत, याची तरी काय शाश्वती ? आपल्याला अन्याय घडू न देण्याची खबरदारी घेण, हे माणसाच कर्तव्य आहे, झालेला अन्याय दूर करून घेण, हा त्याचा धर्म आहे पण निष्फळ सूडाची भावना मनात धरून ठेवण्यात ना कर्तव्य ना धर्म त्या भावनेन माणसाचा आत्मा करपून वठून मात्र जातो म्हणून सूडाच्या हीन भावनेला माझ्या मनात मी केव्हाच थारा दिलेला नाही माझ्यापुढ या अल्प जीवनात करण्यासारख्या गोष्टी इतक्या दिसतात की सूड आणि इतर क्षुद्र गोष्टीकड मला ढुकूनहि बघावयास वेळ नाही ! ”

प्रभाशकराने गुलाबशेटला जरी त्याची मालमत्ता परत दिली आहे असें सागितले, तरी त्याचा फारसा उपयोग झाला नाही गुलाबशेटच्या चेहऱ्याचे स्नायु लुले पडल्याने त्याला लिहिता येत नव्हते त्याच्या मनात काही सागावयाचे असले तरी सृष्टीने जगाशी सबध ठेवण्याची त्याची शक्तीच पार हिरावून घेतली होती आणखी काही दिवसातच त्याला मरण आले.

गुलाबशेटने मृत्युपत्र केले नव्हते त्याच्यासारख्या स्वभावाच्या माणसाला एवढा हव्यास असतो की त्याना कधी काही पुरेसे होतच नाही आणखी आणखी ! अशी त्याना सारखी हाव सुटलेली असते. त्याना स्वत लाच पुरे होत नाही, तर मग अशी माणसे उचलून इतराना काय देणार ? उभा जन्म मिळवण्याकडेच खर्ची पडतो त्याचा-बिचाऱ्याच्या ध्यानात येत नाही की हव्यासाने जरी एवढे सपादन केले तरी या पृथ्वीवरच्या गोष्टी मृत्यूचा उबरठा ओलाडून पलीकडे जाताना परलोकात का कुणी घेऊन जाऊ शकतो? वाचा असेपर्यंत गुलाबशेटने तिचा उपयोग हव्यासाकडे केला आणि शेवटी कालाचा गळफास त्याच्याभोवती इतक्या आकस्मिकपणे पडून आवळला गेला की निरवानिरव करण्याची इच्छा त्याच्या मनात असती तरीसुद्धा तिला वाव उरला नाही !

गुलाबशेटला औरस सततीहि नव्हती की इतर कुणी प्रेमाचे नव्हते. त्याच्या पश्चात् त्याची भलीमोठी इस्टेट त्याची धर्मपत्नी निपुणाबेन हिला

मिळाली. गुलाबशेट नी निपुणाबेन या उत्तर दक्षिण ध्रुवाइतक्या विरोधी स्वभावाच्या माणसानी उभा जन्म बरोबर कसा काढला हे आश्चर्य तर खरेच जिचा हव्यास गुलाबशेटला जन्मभर सुटला नाही, ती त्याची प्रचड संपत्ति आणि मालमत्ता त्याच्या पश्चात् निपुणाबेनने एका क्षणात प्रभाशकरला देऊन टाकली आणि उर्वरित आयुष्य पुण्यक्षेत्री घालविण्यासाठी दोन वस्त्रानिशी ती काशीक्षेत्री निघून गेली निपुणाबेनसारख्या निष्ठावान, एकमार्गी, दृढनिश्चयी आणि आजन्म व्रतस्थ राहणाऱ्या थोड्या माणसाची पुण्याई थोर, म्हणून मला वाटते, धर्म म्हटली जाणारी सस्था आणि काशीसारखी क्षेत्रे टिकू शकतात नाहीतर धर्माच्या नावाखाली या क्षेत्रातून चालणाऱ्या अनाचाराच्या अतीवतेने ती पृथ्वीवरून केव्हाच नामशेष झाली असती.

---

# प्रकरण : १३–प्रथितयश

कालगतीचा प्रवाह चालू होता. प्रभाशकर कराचीत आल्याला बारा वर्षे लोटली होती त्या तपात देशस्थितीत एवढे स्थित्यतर पडले होते की ते कुणाच्या स्वप्नीहि पूर्वी आले नसेल देशाच्या राजकीय स्वातत्र्याचा झगडा जोराने रगत होता. सारी जुनी घडी बदलून गेली होती अशा बदलणाऱ्या परिस्थितीत समाजाला नेहमी नेता हवा असतो पण खरा पुढारी होणे ही गोष्ट सोपी नव्हे ते सतीचे वाण आहे पुढारी जर सर्व तऱ्हेने आपल्या अनुयायाच्या स्वाधीन असला तर त्याला सवग लोकप्रियता मिळणे शक्य आहे पण लोकहिताच्या गोष्टी कोणत्या याचे निर्भयपणाने आणि निस्पृहपणाने मार्गदर्शन करणे त्याला अनेकदा जमत नाही कारण लोकमतापुढे पड खावी लागते लोकाच्या पसतीला येईल तेच बोलावे, त्याना मानवेल तेवढेच उघड करावे, अशाने जरी पुढारीपण टिकून राहिले तरी त्याच्या सदसद्विवेक बुद्धीला पटणाऱ्या गोष्टी त्याला जनमनाला सागता येत नाहीत आणि 'हित मनो-

हारि च दुर्लभ वच ' या न्यायाने सगळयाच गोष्टी लोकाच्या हिताच्या कशा असू शकतील ?

प्रभाशकराने कराचीला आल्यापासूनच्या कालावधीत एवढी प्रचड सपत्ति मिळविली होती की सरकार वा जनता या दोन्हीच्या होणाऱ्या रागलोभाच्या पलिकडे त्याने आपले स्थान स्थिर केले होते कराचीत आता असा कोणताच मोठा व्यवसाय धदा उरला नव्हता की ज्याच्यात प्रभाशकराचा मोठा भाग नव्हता गव्हाचा व्यापार असो की कापसाचा, मोटारी यत्रे याची आयात असो वा हिदुस्थानात होणाऱ्या हरतऱ्हेच्या कच्च्या मालाची निर्यात असो, त्या सर्व बाबतीत प्रभाशकराचा मोठा हिस्सा असे एकोणीसशे सालाच्या सुमारास कराचीच्या आजूबाजूला जमीन एवढी मोकळी पडलेली होती, की नवीन स्थायिक होणाऱ्या माणसाने आपल्याला चाहील तेवढया जागेभोवती कुपण घालावे, म्हणजे ती जागा त्याची होत असे त्या वेळी कराचीत स्थायिक झालेल्या लोकाकडून प्रभाशकराने कराची शहरातली हवी तेवढी जमीन अतिस्वस्त भावात खरेदी करून टाकलेली होती त्याखेरीज कराचीभोवतालच्या अनेक दिवाळखोर जमीनदाराच्याकडून त्याने शेकडो एकर जमीन घेऊन ठेवलेली होती त्यामुळे कराची शहर कुठल्याहि दिशेने वाढू लागले तरी ती सर्व जमीन प्रभाशकराच्या मालकीची होती खुद्द कराची शहरात प्रभाशकराने नवी नवी घरे व चाळी बाधून घेतल्या होत्या ही घरे व चाळी बाधणारे इजिनियर व मजूर हे सर्व त्याचे स्वत चेच असत ही घरे बाधून झाल्यावर खालच्या जमिनीच्या तुकडयासकट ती तो विकून टाकी अथवा अनेक घरे तो भाडयाने देई

कराची बदरातल्या बोटीवर मालाची चढउतार करण्याच्या कामातील बहुतेक मोठा हिस्सा त्याच्याकडे होता एवढेच नव्हे तर त्याने घेतलेल्या पडावाचा किनारपट्टीवरील मालाच्या वाहतुकीचा धदा मोठया उर्जितावस्थेला आला होता. प्रभाशकरच्या मालकीचे तीनशे पडाव आता हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर, इराणच्या आखातात आणि एडनपर्यंत सफरी करीत असत. त्याने एक छोटी आगबोट कपनीहि चालवलेली होती, तिच्या सहा आगबोटी होत्या त्याचा व्यापार मुख्यत. ताबडया समुद्रात एडनपासून सुएझ व पोर्टसय्यदपर्यंत चालत असे.

ग्लेझ्ड् टाईल्स करण्याचा त्याचा कराचीत मोठा कारखाना होता कराचीच्या समुद्रकिनाऱ्यावर घेतलेल्या मिठागरात मीठ तयार करून ते तो कराचीहून कलकत्त्यास व हिंदुस्थानातल्या इतर ठिकाणी पाठवीत असे

कराचीच्या आजुबाजूच्या किनाऱ्यालगतच्या समुद्रात मासे इतके विपुल असत, की मासे पकडन, सुकवून, ते कराचीहून निरनिराळ्या बाजारपेठात विक्रीस पाठविण्याचा मोठा धदा चालू असे त्यातहि प्रभाशकराचा भाग असे.

त्याखरीज एक फार मोठी, आयुष्याचा व इतर विमा उतरणारी कपनी, त्याने काढली होती. ती पण मोठ्या जोरात फोफावली होती.

इतक्या अनेकविध धद्याची सूत्रे हातात ठेवल्यामुळे आता खरोखर अशी स्थिति आली होती की, कराचीतला कुठलाहि शहरवासीय, आपला प्रभाशकराशी कुठल्याहि नात्याने सबध येत नाही, असे म्हणू शकला नसता या ना त्या रीतीने प्रत्येक व्यक्तीच्या दैनदिन जीवनाशी प्रभाशकराचा त्याच्या अनेक उद्योगधद्यामुळे दाट सबध येई जर प्रभाशकर केवळ श्रीमत असता तर लोकाना त्याच्या अस्तित्वाची एवढी जाणीव झाली नसती. पण आता कराची शहराच्या सार्वजनिक जीवनात एकहि गोष्ट प्रभाशकरच्या उपस्थितीशिवाय होऊ शकत नव्हती खासगी सस्थाच्या नियामक मडळावर त्याच्यामुळे मिळणाऱ्या मान्यतेसाठी, लोक त्याला आग्रहाने बोलवीत, तर सार्वजनिक सस्थात त्याच्या सहकार्यावाचून पान हलणे शक्य नाही, अशी स्थिती असल्यानें, त्याला निवडून घेत शिक्षणसस्था असो वा रुग्णालय असो, त्या सर्वांमध्यें प्रभाशकराला निर्णायक मत असे

पण या सर्वांपेक्षाहि जास्त महत्त्वाची प्रभावी गोष्ट म्हणजे प्रभाशकरचे व्यक्तिमत्व ! त्याच्या तोडावर एवढे दैवी तेज असे, आणि त्याच्या मितभाषणात एवढा जोर आणि जादुगिरी असे की त्याच्या व्यक्तिमत्वाच्या आकर्षणात सापडला नाही, असा माणूसच नव्हता कुठल्याहि तऱ्हेच्या जुनाट धार्मिक, वा सामाजिक, वा राजकीय मतमताताराच्या भिती त्याच्या आणि लोकाच्या स्नेहामधे आडव्याउभ्या राहू शकत नसत त्याचे भाषण मृदु, आर्जवी असूनहि इतके सडेतोड, मुद्देसूद, आणि सत्य व व्यवहार यावर आधारलेले असे की ऐकणारावर त्याची छाप दृढ बसत असे तो लोकाच्या मनाची पकड तेव्हाच घेई किबहुना त्याच्या सान्निध्यात असे एक उत्साही

आणि आनद शातिमय वातावरण सदैव असे की तो आपल्याजवळ हवा हवा असं सर्वाना वाटे आपल्याला प्रभाशकर का आवडतो याचे खरे स्पष्टीकरण जरी कोणाला सागता आले नाही, अथवा अनेकाना आपल्याला तो किती आवडतो याची पुरी जाणीवहि झालेली नसली तरी, सर्व त्याला अतिशय चाहात लहान असो वा थोर असो, रक असो वा राव असो, सर्वाना मनोमन खात्री वाटे की कुठल्याहि आणीबाणीच्या परिस्थितीत ज्याच्याकडे मदतीसाठी धाव घ्यावी अशी व्यक्ति म्हणजे प्रभाशकर

पण असे असले तरी कुणीहि त्याच्याशी फाजील सलगीहि करू शकत नसे. कुणीहि योग्य अतर सोडून त्याच्याशी लगट केली, असे होत नसे त्यामुळे त्याचा कधीहि अनादर होत नसे जरी तो कनवाळू आहे असे वाटले व हाकेला हमखास ओ देईल अशी खात्री असली तरी कुणीहि त्याच्या चागुलपणाचा गैरफायदा घेण्यास धजावत नसे

त्याच्या, कुणावरहि आता अवलबून नसलेल्या स्वतत्र आणि भक्कम आर्थिक परिस्थितीमुळे तो लोकमताचा अनुनय करण्याच्या वा सरकार-मान्यता मिळविण्याच्या मुळीच फंदात पडत नसे सर्व बाबतीत आपले मत तो साकल्याने विचार करून, दूर दृष्टीने ठरवी आणि कुणाला रुचेल वा रुचणार नाही याची एवढीहि कदर न बाळगता, निर्भिडपणाने ते पुढे माडी.

माणूस नुसताच तोडापुरता गोड बोलणारा असल्याने त्याचा इतराच्याशी विरोध आला नाही तरी हलके हलके अनुभवाने सर्वांना कळून चुकते की हा माणूस तोडदेखले बोलणारा आहे त्याउलट प्रामाणिक माणसान सागित-लेली अप्रिय गोष्ट जरी त्या वेळी मनाला लागली तरी कालातराने त्याच्या प्रामाणिकपणाची खात्री पटल्यावर लोकाचा त्याच्याबद्दल आदर द्विगुणित होतो.

लौकरच वर सागितलेल्या अनेक गुणसमुच्चयामुळे प्रभाशकरला कराची-च्या कॉर्पोरेशनचे मेयरपद मिळाले कराची शहरातील अनेक सुधारणा त्याने मेयरपदावर असताना इतक्या जोराने पुढे दामटल्या की त्याची कारकीर्द मोठी गाजली

इडियन मर्चंट चेबरचे अध्यक्षपद त्याच्याकडे आले आणि कराची पोर्टट्रस्ट-च्या नियामक मडळावर तो सभासद म्हणून निवडला गेला.

प्रभाशकर ही व्यक्ति कराचीला कमिशनरानी पुष्कळदा ऐकली होती. परतु त्याचा त्याशी परिचय फारसा झालेला नव्हता इतर धनवान लोक पदव्या मिळविण्यासाठी गव्हर्नमेन्ट हाऊसच्या सारख्या वाऱ्या करीत. पण प्रभाशकर चुकूनहि त्या भानगडीत पडत नाही, याचे कमिशनरला मोठे नवल वाटे

एकदा कमिशनरानी प्रभाशकराला मोठ्या कुतूहलाने आपल्याकडे जेवावयास बोलाविले होते प्रभाशकर पाश्चिमात्य तऱ्हेचा वेष नेहमी करत नाही, हे माहिती असूनहि कमिशनराच्या खाजगी कारभाऱ्याने प्रभाशकराना भेटून त्यानी गव्हर्नमेन्ट हाऊसवर जेवावयास येताना डिनर ड्रेस घालून येण्याचा शिष्टाचार पाळावा, असे सागण्याचे धाडस केले

कमिशनराच्याकडे जेवावयास इतरहि लोक आलेले होते जेवणाची वेळ होत आली, तरी प्रभाशकर अजून कसा आला नाही अशी विवचना करीत असताना, प्रभाशकरच्याकडून त्याचा खासगी सेक्रेटरी, फार सुदर तऱ्हेने पारदर्शक कागदात गुडाळून, वर सुदर फिता बाधलेले एक मोठे पुडके घेऊन गव्हर्नमेन्ट हाऊसवर आला आणि त्याने त्यासोबत आणलेले एक पाकीट कमिशनरसाहेबाना दिले.

"प्रभाशकर आजारी आहे वाटत," असे तोडाने म्हणत कमिशनरसाहेबानी चिठ्ठीवरून नजर टाकली आणि त्याचा एकदम भडका उडाला कारण चिठ्ठीत म्हटले होते, "आपल्या सेक्रेटरीच्या समक्ष भटून केलेल्या सूचनेवरून आपल्याला प्रभाशकर या व्यक्तीपेक्षा त्याच्या डिनर ड्रेसचे जास्त कुतूहल आहे, अशी समज झाल्याने व मी डिनर ड्रेस आता वापरीत नसल्याने शिष्टाचाराचा भग होऊ नये म्हणून स्वत जेवणास येऊ शकत नाही, याबद्दल दिलगीर आंहे. मात्र आपले आमत्रण ज्या माझ्या ड्रेससूटला आहे, अशी कल्पना मला दिली गेली तो पत्रासोबत पाठवीत आहे."

— प्रभाशकर

दुसरे दिवशी सकाळी कमिशरनसाहेबानी प्रभाशकराना ऑफिसात बोलावणे धाडले. आजपर्यंतच्या त्याच्या आयुष्यात इतके अपमानकारक त्याच्याशी कुणी वागल्याचे त्यांच्या आठवणीत नव्हते. प्रभाशकर ऑफिसात आल्या-

बरोबर कमिशनरसाहेबानी उसळून म्हटले, "तुमची कालची वागणूक अतिशय अपमानकारक होती, अस तुम्हाला वाटत नाही का ? "

"नाही आपल्या अपमानकारक आमत्रणापुढ माझी वागणूक काहीच नाही-- " प्रभाशकर उद्‌गारला.

"तुम्ही कुणापुढ बोलत आहात याची तुम्हाला आठवण आहे ना ? "

"हो, सिधच्या कमिशनराशी बहुतेक, पण खऱ्या इग्लिश सभ्य गृहस्थाशी की नाही, त्याची मात्र मला खात्री नाही."

"तुम्ही आपल्या सपत्तीच्या तोऱ्यात आहात ? "

"होय, जितके तुम्ही अधिकाराच्या आहात, तितकेच जवळजवळ "

"तुमच्या या वागण्याचा परिणाम काय होईल, याची तुम्हाला कल्पना आहे का ? "

"नाही मला कल्पना नाही. पण मी तुम्हाला अस आश्वासन आता देतो की ती कल्पना तुम्ही मला जरूर आणून देण्याचा प्रयत्न करा, म्हणजे तें किती अशक्य आहे, याची बरोबर कल्पना तुम्हाला येईल "

योगायोग असा की याच सुमाराला लॉरेन्स ऑफ अरेबिया कराचीत ड्रिग रोडला रॉयल एअरफोर्समध्ये साधा एअरमन म्हणून आला होता महायुद्धातील त्याच्या मोठ्या कामगिरीबद्दल बादशहानी त्याला " कमाडर ऑफ धी ऑर्डर ऑफ धी बाथ " व 'डी एस् ओ " या बहुमानाच्या पदव्या देऊ केल्या असताना, लॉरेन्सने त्या दोन्हीचा स्वीकार करण्याचे नाकारले होते एवढेच नव्हे तर खुद्द विन्स्टन चर्चिल हे ब्रिटिश कॅबिनेटमध्ये असल्याने त्यानी लॉरेन्सला त्याला चाहील ते कुठलेहि मोठे अधिकारपद देऊ केले होते. परतु तोहि बोलून चालून पडला प्रभाशकरच्या जातीचा ! त्याने रॉयल एअरफोर्समधल्या कमिशन्ड ऑफिसरचीसुद्धा नव्हे, तर साध्या विमानाच्या मेकॅनिकचे काम करणाऱ्या शिपायाची जागा स्वत.साठी मागून घेतली होती! अचानकपणे लॉरेन्सची आणि प्रभाशकरची रस्त्यावर गाठ पडली होती दोघानाहि एकमेकाच्या भेटीने आनद तर झालाच, पण आपला परिचय पुन. वाढविण्याची सधि मिळाली याच सुमारास लॉर्ड ॲलेन्बी हे कराचीला आले होते. अर्थात् त्याचा मुक्काम गव्हर्नमेन्ट हाऊसवरच होता त्यानी लॉरेन्सला भेटण्यास बोलावले असताना, त्याचेकडून जॉन मेसन हा येथे प्रभाशकर म्हणून

स्थायिक झाल्याचे व मोठ्या नावारूपास चढल्याचे त्याना कळले त्याच वेळी मुबईचे गव्हर्नर हेहि कराचीस आले होते त्याच्या गप्पात लॉर्ड अॅलेन्बी यानी लॉरेन्स व प्रभाशकर याच्याबद्दलची हकीगत गव्हर्नरसाहेबास ऐकविली त्यामुळे त्या दोघानाहि भेटण्याची त्याना एवढी इच्छा झाली, की दोघानाहि त्या बड्या खान्यास आमत्रणे करण्याबद्दल कमिशनरसाहेबास सागण्यात आले.

कमिशनरसाहेबानी जेव्हा प्रभाशकराला बोलावण्यात अर्थ नाही असें सुचवून पाहिले, तेव्हा गव्हर्नरसाहेबानी त्याचे कारण विचारले, व कमिशनरानी पूर्वीच्या जेवणाचा प्रकार सागितला गव्हर्नर म्हणाले होते, "तुम्हाला प्रभाशकरच्या पूर्वेतिहासाची ओळख नसल्यान तुमची वागणूक त्याबरोबर अशा तऱ्हेची झालेली दिसते तो माणूस असामान्य आहे त्याच्यासारख्या कर्तबगार पुरुषाशी जर आमच्या सरकारच्या जबाबदार अधिकाऱ्यानी 'डिनर ड्रेस वापरीत नाही' अशा क्षुल्लक व पुरातन झालेल्या समजुतीवरून भाडणे काढली तर आमच्या राजनीतीच दिवाळ वाजल अस समजायला हरकत नाही! मी जर तुमच्या जागी असलो तर त्याला खासगी तऱ्हेने भेटून, झालेल्या गैरसमजाबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून, त्याशी हस्तादोलन करून, त्याची मैत्री सपादन करण्याची कोशीस करीन त्याच्यासारख्या माणसाना दुखवून सरकारच कधीच भागणार नाही!"

कमिशनरसाहेब राजकारणात अगदीच अनाभिज्ञ नव्हते. आपल्या सरकारची इभ्रत ठेवण्याच्या नेहेमीच्या कोष्टकात ही गोष्ट बसली नाही, एवढेच नव्हे तर गव्हर्नरसाहेबाच्या, 'सूज्ञास जास्त सागणे नलगे' अशा आशयाच्या कानउघाडणीत वारा कुठल्या बाजूने वाहात आहे हे त्याच्या तेव्हाच ध्यानात आले. त्यानी आपली पगडी शहाणपणाने चटकन् फिरविली

प्रभाशकर याच्या ऑफिसात कमिशनरसाहेब सहज आले त्यानी पूर्वीच्या गैरसमजाबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली–अगदी इग्लिशमन्सारखी–आणि गव्हर्नरसाहेबाच्या बड्या खान्यास प्रभाशकराना त्यानी आमत्रण केले. आमत्रण-पत्रिका मागून येईलच. ते म्हणाले,

"डिनर ड्रेस लागणार असेल ?" प्रभाशकरानी मिस्किलपणाने विचारले

"छे, छे काय वापराव ते तुमच्या खुषीवर आहे! डिनर ड्रेस नाहीतरी या देशच्या हवेला जरा गरमच असतो!" ते हसून जात जात म्हणाले.

सरकारमान्यता मिळण्यास अथवा लोकमान्यता मिळण्यास आरभ कसा झाला यावर बरेचसे अवलबून असते

इंग्लिश माणसाच्या मनाची ठेवण अशी असते की, जर सुरुवातीसच त्याची व तुमची चकमक उडाली, नी त्यात तुम्ही तुल्यबल, अथवा काकणभर त्यापेक्षा वरचढच ठरलात, तर तो त्यानतर तुमच्याशी मोठ्या मित्रभावाने व आदराने वागू लागतो त्याच्या मैत्रीमधील चागली बाजू मगच आपल्या अनुभवास येते

कमिशनरसाहेबाशी प्रथमच दोन हात झाल्याने, आणि त्यानतर खुद्द गव्हर्नरसाहेबाच्या करवी प्रभाशकराच्याबद्दलची अनाहूत शिफारस आल्याने त्या प्रसगापासून प्रभाशकराना एकदम सरकारमान्यतेचा शिक्का सरकारदरबारी मिळाला. कमिशनरसाहेबाचे मत बदलल्यावर बाकीच्या सर्वांचे मत बदलायला किती वेळ? तेव्हापासून सारी सरकारी दारे प्रभाशकरापुढे 'तिळा दार उघड' अशी जादूसारखी उघडू लागली आणि प्रभाशकराचे सार्वजनिक कार्य व व्यापारधदा जो अगोदरच फोफावला होता त्याला जास्तच ऊत आला!

प्रभाशकराना एकदा कोणी, विचारले "काय हो! तुम्ही इतक्या थोड्या अवधीत इतके यश कसे मिळविलेत?"

"कोण म्हणाले मला यश मिळाले आहे म्हणून?"

"वा! मग तुम्हाला एवढी सपत्ति मिळाली आहे ती का उगीच! यश म्हणजे आणखी दुसर काय?" तो उद्गारला

"केवळ रुपयाचीच सख्या माझ्या नावे वाढली कशी, एवढाच जर तुमचा प्रश्न असला तर त्याच उत्तर फार सोप आहे"

"ते कस?"

"हिंदुस्थानची लोकसख्या बघता बघता चाळीस कोटि, व त्याचप्रमाणं चीनची लोकसख्या साठ कोटि जशी होते, तसच हे आहे!"

"म्हणजे मला नाही समजल."

"हवापाणी उत्तम, खायला बेताच, अशा अनुकूल परिस्थितीमधे दोन माणसाची दहा, दहाची शभर, शभराची हजार, अशी नाही का माणस वाढत? तशीच बरोबर स्थिति रुपयाची आहे. ते एकदा गुणाकार करीत

वाढू लागले की त्याला काही अतच नाही. आणि मग पुढं तर अशी परिस्थिति येते की तुम्हाला काही करावच लागत नाही पैसे आपल्याआपण वाढत जातात ! "

" मग तुम्ही केलत ते काय ? "

" पहिल्या थोडया रुपयाना गुणाकार करण सोप जाव, एवढी अनुकूल परिस्थिति तेवढी मी निर्माण केली. "

प्रभाशकरानी वर म्हटल्याप्रमाणे, खरोखरच आता त्याना पैसे मिळविण्याचा कामाकडे मुळीच पाहाण्याचे कारण नाही, अशी स्थिति येऊन ठेपली होती त्यानी चालू करून दिलेल्या अनेकविध धद्याच्या द्वारा संपत्तीचा ओघ त्याच्याकडे अप्रतिहत वाहात येत होता आणि पैशाच्या मागोमाग येणाऱ्या मानमान्यता, प्रतिष्ठा आणि मनकामनासिद्धि, या सर्व गोष्टी त्याच्यापुढें हात जोडून दासानुदासाप्रमाणे उभ्या राहिल्या होत्या

पण प्रभाशकराची यश मिळविण्याची धडपड अजून सपली नव्हती कारण केवळ सपत्ति व तदनुषगिक गोष्टी म्हणजे यश, असे त्याना कधीच वाटलेले नव्हते ! खरे यश म्हणावयाचे त्याला की ज्या मानसिक परिस्थितीमध्ये माणसाला चिर शाति आणि अनिर्व्याज आनद याचा लाभ होतो. आणि तीच मानसिक स्थिति कोणती हे ते अजून शोधत होते. आपल्या सपत्तीचा ओघ जनहिताकडे लावून सर्व परीनी आपल्या मनुष्य बाधवाचा उद्धार कसा होईल याकडे अलिकडे कित्येक वर्षे त्यानी लक्ष पुरविले होते जर केवळ पैशानी दलितोद्धार होणे ही गोष्ट शक्य असती तर ऐहिक सपदेच्या लयलुटीत लोळणाऱ्या उत्तर अमेरिकेसारख्या देशात दलितवर्ग उरावयासच नको होता. पण त्याना तर नक्की ठाऊक होते की विसाव्या शतकातील सुधारणेच्या शिखरावर असणाऱ्या देशातसुद्धा, मागासलेल्या देशाप्रमाणेच सर्व गोष्टी जशाच्या तशा आढळून येत होत्या. केवळ राष्ट्राची गरिबी वा श्रीमती एवढयावर ते दोष अवलबून नव्हते एवढेच काय, त्यानी असेहि पाहिले होते की आपण ज्याला सुशिक्षण म्हणतो तेवढयाने सुद्धा वास्तविक व्यक्तीच्यामध्ये फेरबदल होत नव्हता. आणि त्यामुळे राष्ट्राचे काय अथवा ज्या व्यक्तीमिळून राष्ट्र बनते त्या व्यक्तीचे काय, खरे कल्याण केवळ गरिबी अथवा श्रीमती, केवळ अशिक्षितपणा अथवा सुशिक्षितपणा, एवढयाच गोष्टीमध्ये सामावत नाही.

या गोष्टीच्याहि पलिकडे कशात तरी व्यक्तीचें चिरकल्याण आणि राष्ट्राचेहि चिरकल्याण आहे, अशी त्याना खात्री वाटू लागली होती.

म्हणून जरी प्रभाशकर राजकीय लढ्याला धनसपत्तीचे सर्वतोपरी सहाय्य करीत होते, आणि राजकारणाच्या अग्रभागी असणाऱ्या अनेक महापुरुषाच्या चळवळीला सक्रीय पाठिबा देत होते, तरी केवळ परदास्यातून देश सुटल्यामुळे सध्या देशापुढे असलेल्या अनेक प्रश्नाची समाधानकारक उत्तरे सापडतील, अशी त्याना खात्री वाटत नव्हती म्हणून केवळ चालू राजकारणात प्रभाशकराचे मन रमत नव्हते, तर भविष्यकाळात कोणती परिस्थिति निर्माण केल्याने राष्ट्राचे आणि व्यक्तीचे खरे चिरकल्याण होऊ शकेल, व तशी परिस्थिति निर्माण करण्याचे खरे मार्ग कोणते, हे ते शोधीत होते

या कल्पनेने त्याच्या मनाची एवढी पकड घेतली होती की अलिकडे बाकी बहुतेक सर्व दिनक्रमातून शक्य तेवढे आपले अग काढून घेऊन ते एकातात मनन आणि चितन करीत बसत

गेल्या काही वर्षांत त्याचा जुन्या क्लिफटनवरचा प्रासादतुल्य बगला पुरा होऊन जरी ते त्यात राहू लागले होते, तरी त्या बगल्याला त्यानी दिलेल्या "आभास" या नावात त्याची जगाकडे पाहाण्याची दृष्टि प्रतीत होत होती मलीरला, कराची शहरापासून दहा मैल दूर, त्यानी एक खूप मोठी विस्तृत जमीन खरेदी केली होती तिथल्या एकातात, ते मनात आले की कराचीहून उठून जाऊन राहात त्याच्या या अज्ञातवासाबद्दल कराचीमधे अर्थात् निरनिराळे लोकप्रवाद उठलेले होते. पण नसेल तेथे गौप्य निर्माण करण्यात रिकामटेकड्या लोकाचा नेहमी हातखडा असतो, नाही ?

---

# प्रकरण : १४—स्रग्धरेचें प्रेम

प्रभाशंकरांचे चरित्र माहिती शोधून काढून लिहिण्याचे जे काम मी स्वत होऊन शिरावर घेतले होते ते आता बहुतेक पुरे झाले होते. नुसत्या कालानुक्रमानें गोष्टी सगतवार लावण्यात फारसा अर्थ नाही हे माझ्या ध्यानात आले होते. कारण क्रमवार त्याच्या आयुष्यातील घटना सागण्याने

कालक्रम साधेल, पण त्याच्या आयुष्यातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे व्यक्ति-विकास, तिला गौणपणा आला असता तशाने म्हणून प्रभाशकराच्या मनो-रचनेशी जितके मला मनानें एकरूप होता येणे शक्य होते तितके होऊन, त्याच्या आयुष्यातील मनोविकासाला जे योग्य ते प्राधान्य देऊन मी ही चरित्रकथा एवढी लिहून काढली

आता जमशेदाच्याकडे जाऊन त्याना माझे हस्तलिखित दाखवावे, मग त्यानी कबूल केल्याप्रमाणे त्याना प्रभाशकराच्याबद्दल काय माहिती आहे ती विचारायला मी मोकळा होईन असा माझा बेत

पण मग एकदम माझ्या ध्यानात आले की एका त्याच्या निकट परिचया-तल्या व्यक्तीला मी परिपूर्ण माहिती विचारली नाही. इतर लोकाच्या कडून केलेल्या चौकशात मला एवढे कळले होते की स्रग्धरा लहान असतानाच तिची आई वारली–टॉर्पेडो लागून फुटलेल्या बोटीत जखमी होऊन–आणि कराचीला पाय ठेवतानाच तिच्या लालनपालनाची जबाबदारी स्वत वर घऊन प्रभाशकर आले होते कसल्या दारुण प्रसगात सापडून ती पोरकी झाली व प्रभाशकरानी तिची जबाबदारी कशी स्वीकारली हे मी पूर्वीच सविस्तर सागितले.

प्रभाशकराचे चरित्र शोधून काढण्यानेसुद्धा जर माझ्या मनावर त्याच्या चारित्र्याचा ठसा उमटल्याशिवाय राहात नाही, तर मग प्रभाशकर कराची-ला आल्यापासून ते जाईपर्यंत त्याच्या निकट परिचयात प्रत्यक्ष राहिलेल्या या स्रग्धरेवर प्रभाशकराच्या व्यक्तिमत्वाचा केवढा पगडा बसलेला असेल ! ग्रहणामधे चद्राच्या चेहेऱ्यावर पडलेल्या पृथ्वीच्या सावलीवरून जर पृथ्वीचा आकार गोल आहे हे आपल्याला दिसते, तर प्रभाशकराच्या छायेत लहाना-ची मोठी झालेल्या स्रग्धरेच्या स्वभावावरून प्रभाशकराच्या स्वभावाची परीक्षा जास्त नीट झाल्याशिवाय कशी राहील ?

मी आभास बगल्यात स्रग्धरेची गाठ घेण्यास गेलो तेव्हा मला कळले की "स्रग्धराबाई मलीरला राहतात." मी भैय्याला विचारले, "मग या आभास बगल्यात कोण राहते ?"

"शिरीषभाई इथ राहतात," भैय्याने उत्तर दिले. आणि हातातल्या खुरप्याने एका झाडाभोवतीच्या आळ्यात खुरपत त्याने आपण होऊन पुढे सागितले की, "थोरल्या साहेबानी हा बगला आणि मलीरचा बगला स्रग्धरा-

ताई आणि शिरीषभाई या दोघाना दिला होता पण शिरीषभाईंना शहरात काम असते म्हणून हा सारा बगला त्याना देऊन स्रग्धराताई मलीरच्या बगल्यात राहायला गेल्या आहेत."

चागल्या धन्याच्या जुन्या नोकराच्यात धन्याच्या कनवाळूपणामुळे एक प्रकारची लाघवी मृदुता येते आल्यागेल्याशी त्याची बोलण्याची पद्धत गोडीची असते तो माळी उठला आणि म्हणाला, "जा ना आत. शिरीषसाहेब नुकतेच घरी आले आहेत. भेटा ना त्याना "

मी माळ्यामागोमाग गेलो आणि शिरीषभाई बाहेर व्हराड्यात उभे होते त्याना नमस्कार करून माझे काम सागितले ते एकून ते म्हणाले, "माझ्यापेक्षा स्रग्धराताईना या बाबतीत जास्ती सागता येईल मला माहिती असलेल्या गोष्टी माझ्यापेक्षा त्याना जास्त सागता येतील त्यानाच तुम्ही भेटा."

मी मलीरला जाऊन स्रग्धराबाईची गाठ घेतली त्या वेळी काही बोलण्यापूर्वी मी दोन गोष्टीनी फार चकित झालो पहिली गोष्ट म्हणजे त्याचा एखाद्या सन्यासिनीसारखा पाढरा शुभ्र साधा वेष, आणि दुसरी गोष्ट म्हणजे त्याचे सौदर्य! माझे आश्चर्य तोडावर दाखवणे शिष्टाचाराचे नाही, हे माझ्या एकदम ध्यानात आले आणि मी दुसरीकडे पाहून म्हटले, "प्रभाशकराच्या बद्दल आपल्याला जी काही माहिती असेल ती विचारायला मी आलो आहे "

त्यानी विचारले, "कशासाठी ?"

"मी त्याचा फार चाहाता आहे म्हणून "

"त्याच्याबद्दलच्या माझ्या माहितीचा कुणाला उपयोग होईल अस मला वाटत नाही. म्हणून ती न सागणच बर, अस मला वाटत."

एवढ्या परिश्रमाने लिहून काढलेले माझे हस्तलिखित मी वास्तविक इतर कोणाच्याहि हातात देण्यास तयार झालो नसतो पण स्रग्धराताईंच्या चर्येकडे पाहून एवढा विश्वास सहज वाटू लागला होता, की मला प्रभाशकराचे चरित्र त्याच्या हाती देण्यास मुळीच अवघड वाटले नाही. मी त्याना म्हटले, "हे हस्तलिखित मी आपल्याजवळ ठेवून जातो. आपण ते वाचून पाहा. आणि तें वाचून झाल्यावर जर आपल्याला प्रभाशकराच्याबद्दल असलेली माहिती मला सागावीशी वाटली तर ती सागा, एवढच माझ म्हणण आहे. —मी आठवड्यान हस्तलिखित नेण्यास परत येईन."

मी स्वत. बोलतो त्यापेक्षा जास्त चागले लिहितो माझ्या मनातले विचार म.ना लिहून जास्त चागले दाखवता येतात. त्यामुळे स्रग्धराबाईना जास्त बोलून आपला हेतु पटविण्यापेक्षा मी लिहिलेले चरित्र वाचण्यास देऊन जास्त कार्यभाग होईल असे मला सहज वाटले होते पण माझ्या मनात सहज आलेली कल्पना कशी शभर हिश्शाने बरोबर होती, याचे प्रत्यतर मला आठवड्याने आले मी ठरल्या दिवशी मलीरला पुन. गेल्यावर मला बोलण्याची सवड न देता स्रग्धराबाई म्हणाल्या, "तुम्ही लिहिलेले हस्तलिखित वाचून माझ पूर्वीच मत बदलल आहे प्रभाशकराच्याबद्दल मला जी माहिती आहे तीपैकी बहुतेक माहिती तुमच्या चरित्रग्रथात तुम्ही अगोदरच नमूद केली आहे. परन्तु त्याचा चरित्रग्रथ पुरा करण्यासाठी जरूर अशी जी माहिती मला ठाऊक आहे, ती या कागदावर लिहून काढलेली आहे. तोडान ती मला सागता येईल अस वाटल नाही, म्हणून मी ती लिहून काढली. तुमच्या चरित्र-ग्रथात त्या माहितीचा तुम्ही उपयोग करण्यास माझी काहीहि हरकत नाही.

मी परत येऊन ते कागद वाचल्यावर मला फार हर्ष झाला आणि स्रग्धराबाईनी लिहिलेली माहिती मी जशीच्या तशीच माझ्या हस्तलिखितात चौदावे प्रकरण म्हणून घातली ती अशी—

"मी कराचीला आले तेव्हा कराची बदरातल्या गडबडीला किती बावरून गेले याची मला चागली आठवण आहे वास्तविक बदरावरच्या त्या गलबल्याने मला आमची बोट टॉर्पेडो लागून फुटल्याच्या प्रसगाची जास्तच आठवण झाली त्या सर्व प्रसगाचा आणि माझ्या आईच्या मृत्यूचा माझ्या बालमनावर एवढा जोराचा परिणाम झाला होता की माझी जवळ जवळ वाचाच बंद झाली होती. कराचीत आल्यावर प्रभाशकरानी मजुराचे काम प्रथम स्वीकारले त्या वेळी मला ख्रिश्चन मिशनच्या कॉन्व्हेन्टमध्ये दाखल करविले होतें. मीं तेथे आठ वर्षें राहिले. पण तेथेहि मी अगदी जरूरीपुरते तेवढेच बोलत असे. कॉन्व्हेटच्या शात वातावरणात माझ्या धक्का बसलेल्या मनाला हवी होती ती विश्रांति मिळाली तेथले धार्मिक आणि व्रतस्थ आयुष्याचे वळण मला फार मानवे दिवसभर अभ्यासात आणि व्यवसायात स्वत ला गुतवून ठेवून मनाला कसे समाधान मिळते त्याची मला तेथें कल्पना आली. लहानपणची माझ्या आईच्या वियोगाची स्मृति हलके हलकें कमी

झाली. माझ्या मनाला बसलेल्या धक्क्याचा जोर ओसरला. आणि माझे मन जास्त प्रगल्भ आणि विचारशील बनले.

मी कॉन्व्हेन्ट सोडून ज्या वेळी घरी परत आले त्या वेळी माझ्या लक्षात पहिली गोष्ट आली ती ही की आमच्या घरचे वातावरण, आणि मी होते त्या कॉन्व्हेन्टमधील वातावरण, याच्यात फारसा फरक नव्हता. कारण प्रभाशकर याचा सर्व दिवस इतक्या उद्योगात जात असे की त्याचे व माझे सभाषण जवळ जवळ दिवसाकाठी चारपाच शब्द इतकेच होत असेल नसेल ते भल्या पहाटे उठत आणि आपले आन्हिक उरकून स्वत चूल पेटवून स्वयपाक करीत. माझे जेवण काढून ठेवून, स्वत चे जेवण बरोबर बाधून घेऊन, कामाला जात त्याच्याइतका स्वावलबीपणा मी खरोखरच कधी पाहिला नव्हता बहुतेक अशी कोणतीहि गोष्ट असावयाची नाही की जिच्यासाठी लोकाच्या मदतीशिवाय त्याचे अडावयाचे त्याची उद्योगप्रियता पाहून माझ्यावरहि हलके हलके परिणाम झाला आणि घर चालविण्याचे काम मी एक एक माझ्या स्वत वर घेऊ लागले व्यापारधद्याच्या एवढ्या उलाढाली कराव्या लागत असूनहि त्याचे जीवन इतके व्रतस्थ असे की मला राहून राहून त्याच्या आणि इतर लोकाच्या चारित्र्यातील जमीन अस्मानाची तफावत चागलीच प्रत्ययास आली. त्यानी मला तोडाने, 'ही गोष्ट कर अथवा ती कर,' असे सागितले असते, तर मी आज्ञाधारकपणे तसे केले असते परतु ते शब्दानेहि मला कधी काही करावयास सागत नसत पण प्रत्यक्ष कृतीने माझ्यापुढे इतके उत्तम उदाहरण ठेवीत की त्याच्या मानाने आपण कमी पडतो की काय, अशी माझ्या मनाला सारखी बोचणी लागून मी जास्तच काळजीने व मन.पूर्वक सर्व उद्योगात पडत असे. इतके अनेक धदे ते चालवीत असून सुस्थिति प्राप्त झाली होती तरी त्या सुस्थितीचा अर्थ ख्यालीखुशाली अथवा ऐषआराम, असा कधीच झाला नाही. कोणती गोष्ट चागली व कोणती वाईट याचा मनाशी निश्चय केल्यावर मनाच्या कमकुवतपणामुळे, जाऊ देत की, सगळे नाही का करीत, नाहीतरी मध्यम मार्गच चागला, कशालाहि नाही म्हणू नये, सगळ्या गोष्टी योग्य प्रमाणात केल्या तर हरकत नसते, अशा कोणत्याहि सबबी पुढे न करता, योग्य गोष्टीपासून रेसभरहि विचलित न होता ते वागत.

मला अनेकदा मनात वाटे की इतक्या असिधाराव्रताचे पालन करणे, हे सर्वसाधारण मनुष्यस्वभावाला तरी धरून आहे का? का अतिकडवेपणा विकृतीत जमा होतो? पण अनुभवाने मला कळू लागले की ही विकृति नव्हे तर ही वर्षानुवर्षे प्राप्त करून घेतलेली प्रभाशकराची सिद्धि आहे.

आमच्या घरी प्रभाशकरानी आणखीहि एक अनाथ विद्यार्थी आणून ठेवला. तो आला त्या वेळी तो इतका आसन्नमरण स्थितीत होता की, तो कधी चागला होऊन हिडू फिरू लागेल, असे वाटले नव्हते पण त्याला सर्व तऱ्हेचे उपचार करून, व त्याच्या खस्ता खाऊन त्यानी त्याला अगदी उत्तम आरोग्य प्राप्त करून दिले आमच्या घरी आता जी ही तिसरी व्यक्ति आली, तिचेच नांव शिरीष!

वर्षानुवर्षे आमच्या उद्योगी आयुष्यक्रमात कशी गेली, हे मला कसे ते कळलेहि नाही. आणि मी आता अल्लड बालिका राहिले नाही, याची जाणीव मला एके दिवशी अचानक आली जसजशी प्रभाशकराच्या सपत्तीची कीर्ति पसरत चालली, तसतशी माणसे त्याच्या विवाहाबद्दल हेतुपूर्वक चौकशी करू लागली. अशा अनेक तरुणी होत्या की, त्यानी प्रभाशकराना पकडण्यासाठी त्याच्याभोवती आपल्या मोहाचे जाळे पसरविण्यास सुरुवात केली. कित्येक उपवर मुलीचे आईबापहि आपल्या मुलीला हे स्थळ मिळाले तर कोटकल्याण होईल, अशा हेतूने प्रभाशकराच्याशी परिचय वाढविण्याचे प्रयत्न करू लागले होते.

माझ्या मनातल्या मनात असा कोणीहि प्रभाशकराच्याशी परिचय वाढविण्याला सुरुवात केली की बेचैन वाटू लागे. त्यानी असे करणे बरोबर नव्हे असे मला निक्षून वाटे पण का, याचे मात्र निदान मला कधी मनाशी स्पष्ट करता आले नाही.

पण प्रभाशकर स्वतःच अशा सर्वांना एका स्पष्ट मर्यादेच्या अलिकडे येऊ देत नसत. असे असूनहि एक विशिष्ट तरुणी इतक्या हात धुऊन मागे लागली होती की त्याना जास्त जालीम उपाय योजावा लागला.

एके दिवशी अचानकपणे ती हजर असताना एक तार आली. ती वाचून त्यानी एकदम कपाळाला हात लावला व अगदी खिन्न चेहरा करून ते बसले. अनेक वर्षांच्या परिचयाने त्याचें हे वागणें स्वाभाविक नाही, याबद्दल माझी

एवढी खात्री होती की यात काही कपट नाटक तर नाही, असे मला वाटले. अतिशय मैत्रीचे सोंग करणाऱ्या त्या तरुणीने सहानुभूतिदर्शक स्वरात विचारले, " काय झाल ? कोणी तुमच्या परिचयातील वा इष्टमित्रापैकी कुणी अत्यवस्थ आहे की काय ? "

हताश चेहऱ्याने प्रभाशकर म्हणाले, " त्याहूनहि जास्त भयकर गोष्ट झाली आहे मी काही फार मोठा सट्टा केला होता त्यात बाजू अगावर आली आणि मी साफ बुडालो आहे ! "

त्यानतर थोडया वेळाने दीर्घ निश्वास टाकून ते म्हणाले, " हरकत नाही. पण माझे इतके अनेक मित्र तुमच्यासारखे आहेत की यातूनहि मार्ग दिसेल "

सट्टचात प्रभाशकर बुडाले, ही गोष्ट इतक्या हा हा म्हणता सगळीकडे पसरली की आठवडाभरात प्रभाशकराच्या सपत्तीवर एक डोळा ठेवून त्याच्याशी मैत्री वा सोयरीक करू पाहाणारे त्याचे सर्व मित्र हा हा म्हणता त्याच्याजवळून दुरावले

अर्थात् दिवाळे जर निघालेच नव्हते तर अशी खोटी बातमी किती दिवस टिकणार ? लौकरच सगळीकडे पुन· ठाऊक झाले की प्रभाशकर सट्टचामधे बुडून त्याचे दिवाळे निघाल्याची बातमी अगदीच खोटी होती. गेल्या आठदहा दिवसात त्याच्याकडे न फिरकलेल्या लोकामधे जी काही माणसे धूर्त होती त्यानी तेव्हाच ओळखले की कपडा झटकून ज्याप्रमाणे आपण त्यावर बसलेली माती झाडून टाकतो तद्वत् सपत्तीच्या लोभाने प्रभाशकराची मैत्री वाढवू इच्छिणाऱ्या आपमतलबी लोकाना झाडून टाकण्याचा प्रभाशकराचा हा प्रयत्न होता. आपले सत्यस्वरूप उघडकीस आले, अशी ज्याची मनोमन खात्री पटली त्या लोकानी पुन या भानगडीत पडण्याचा प्रयत्न केला नाही. परतु मी वर उल्लेखिलेल्या तरुणीने मात्र वेड पाघरण्याचा प्रयत्न केला.

मला जरी ती कधीच आवडली नाहीं तरी ती सुदर नव्हती, असे मला म्हणता यावयाचे नाहीं कदाचित् आपल्या सौदर्यावरहि तिनें जास्त भरवसा टाकून हे धाडस केले असेल.

अतिशय नटून थटून ती पुनः आमच्या घरी आली, आणि जणू काहीं झालेच नाहीं अशा आविर्भावाने वागू लागली पण यत्किचित्‌हि न हंसता

प्रभाशकरानी तिला विचारले, "तुम्ही गेले आठ दहा दिवस आमच्याकड फिरकण्याच्या एकदम कशा थाबलात ? "

"मला बर नव्हन !" तिने सपशेल खोटे सागितले.

"माझ दिवाळ निघाल्याच ऐकून माझी स्वत.ची तब्येत बिघडण्याऐवजी माझे मित्र म्हणवणाऱ्या पुष्कळच लोकाच्या तब्बेती मात्र फार अचानक बिघडल्या. तुमचीहि तब्येत तशीच बिघडलेली असावी."

"तुमच्या बोलण्याचा आशय मला समजत नाही–" तिने आपण दुखावले गेल्याचा बहाणा करीत म्हटले.

प्रभाशकर गय न करता म्हणाले, "याहूनहि स्पष्ट शब्दात सागायच तर तुमच लक्ष वा मैत्री प्रभाशकर या व्यक्तीशी नसून त्याच्याजवळ असणाऱ्या सपत्तीशी आहे !"

डोळचात अश्रु आणून ती तरुणी म्हणाली," हीच का माझी किमत केली तुम्ही ?"

"तुमची किमत मी किती केली ते तुम्हाला ऐकायच आहेच का ? दोन रुपये बारा आणे ! कारण मनुष्यदेह ज्या द्रव्याचा बनलेला आहे त्याची बाजारभावान किमत केली तर ती सारी 'दोन रुपये बारा आणे' येईल अर्थात् केवळ ती द्रव्यच हवी असली तर मनुष्यदेहातून ती मिळविण्याऐवजी, माझ्यासारख्या धदेवाईकाला, ती बाजारातून घाऊक भावान घेण जास्त परवडेल. देहाशिवाय माणसाला आणखी मनहि असत, अस म्हणतात. आणि ते असल तर त्याची किमत मात्र पैशान होऊ शकत नाही हेहि मला ठाऊक आहे. परतु बोलून चालून तुम्हा आपमतलबी लोकाना मन आहेच कुठ ? "

तेव्हापासून त्याहि निर्लज्ज तरुणीने आमचे घर वर्ज केले !

या अनेक आपमतलबी लोकाची अब्रू चवाठ्यावर आली. या गोष्टीपेक्षा मला जास्त आनद झाला तो प्रभाशकराच्या मागे त्याच्याशी विवाह करण्याच्या उद्देशाने लागलेल्या तरुणीचे शुक्लकाष्ट कायमचे दूर झाले, याचा !

आता हलके हलके मला जाणीव झाली की माझ्या स्वत च्या मनात प्रीतीचा उद्भव झाला आहे !

माझी आई वारल्यानतर माझ्या आनाथ पोरकेपणी प्रभाशकरानी मला साभाळून मोठें केले. मी ज्या सुस्थितीत आता होते ते सर्व केवळ त्याच्यामुळें.

माझे शिक्षणसुद्धा उत्तम झाले केवळ त्याच्याच योजनेने या सर्वांबद्दल माझ्या मनात त्याच्याबद्दल अपरपार कृतज्ञता वाटे.

इतर माणसे सदासर्वदा जगाला बोल लावताना मी पाहिली होती बहुतेकाचे जगाविरुद्ध गाऱ्हाणे असावयाचे स्वत च्या स्वभावातले गुणदोष त्याच्या खिसगणतीत नसतात आपल्या अपयशापैकी आपला स्वत चा वाटा कोणता व जगाचा कोणता याची विचक्षणा करताना ही माणसे सरसहा सगळा दोष जगाच्या माथी मारतात अशा रडकथाच सदा कानी येतात असे असता प्रभाशकराची बिनतक्रारी, आनदपूर्ण वृत्ति पाहिली की मला बरे वाटे कळकट ढगाच्या पसाऱ्यातील एखाद्या झरोक्यातून सूर्याच्या उन्हाचा एखादाच झोत बाहेर आल्यावर जसे होते तसे मला होई नन्नाचा रडका पाढा घोकण्याऐवजी, आत्मविश्वासाने आशावादाचे आनदी सूर कुणी काढलेले मला आवडत आणि अशा सूरसागरावर प्रभाशकराचे तर प्रभुत्वच होते त्यामुळे त्याच्या सान्निध्यात असण्यात मला मोठ्या आनदाचा लाभ होई

त्याचा आधार फार मोठा वाटेच वाटे, पण ते सान्निध्यात असले म्हणजे मला तरी लख्ख ऊन पडल्यासारखे वातावरण उत्साही वाटे

मनन व चितन प्रभाशकर करीत असतच, पण योगाभ्यासाचाहि त्याना नाद लागला होता त्याविषयी ते पुष्कळ वाचीत जमशेद मेहताच्या बरोबर तासन्तास ते योगसाधनावर चर्चा करीत माझ्या कानावर ही चर्चा अनेकदा जाई ती ऐकून मला एवढे समजू लागले होते की मनुष्याच्या बौद्धिक व मानसिक विकासाचे काम जर जलद व्हावयाचे असेल तर मनुष्याच्या शरिरातील अनेक सुप्त शक्ति प्रथम जागृत करायला पाहिजेत त्या जागृत झाल्यावर माणसाची आकलन शक्ति प्रभावी नी अमर्याद वाढते पण त्या सुप्त शक्ति जागृत करावयाच्या झाल्या तर प्रथम आपले शरीर त्या दृष्टीने तयार झाले पाहिजे त्यासाठी यमनियमाचे काटेकोर पालन करावयास पाहिजे, व्रतस्थ राहिले पाहिजे व काही विशिष्ट पद्धतीने शारीरिक विकासासाठी व पूर्णारोग्यासाठी अभ्यास व व्यायाम केला पाहिजे

या सर्वसाधारण माहितीपेक्षा, माझ्या मनावर जास्त ठसणारी गोष्ट म्हणजे प्रभाशकराचे आरोग्यपूर्ण, योगसाध्य सौदर्य. ते योगाभ्यास करीत, व्रतस्थ राहात यामुळे त्याचे वय किती होते हे बरोबर कुणाला सहज सागता आले

नसते ते अगदी तरुण दिसत चेहऱ्यावरची कांति, काळेभोर केस, सडसडीत पण पोलादी कांबीसारखे शरीर, या गोष्टी पाहिल्या की आपण पंचेचाळिशी उलटून गेलेल्या पुरुषाशी बोलत आहो, असें कुणाला सहसा खरे वाटले नसते.

तारुण्याचा मोह साऱ्या जगाला पडतो मग मी तरी कुठे अपवाद होते ? त्यात मी स्वत च नवयौवना नव्हते का ? माझ्या दृष्टीला तर सौंदर्याचा मोह किती पडावा ! प्रभाशंकराच्या शरीरसौंदर्याने माझे नेत्र भारून गेले होते तर त्याच्या मनाच्या अनेकविध गुणसमुच्चयाने माझे मन भारून गले होते

ते माझे पालनकर्ते म्हणून कृतज्ञता उत्पन्न झाली. उत्तम यशस्वी जीवन कसे जगावे याचे नमुनेदार उदाहरण माझ्यापुढे ठेवल्यामुळे ते माझे गुरु होते. गुरुशिष्यभावात आदरभावाना उत्पन्न झाली नी त्याच्या शरीरसौंदर्याने माझ्या यौवनसुलभ मनाला अनिवार आकर्षण उत्पन्न झाले गंगा, यमुना नी सरस्वती यांचा त्रिवेणीसंगम प्रयागक्षेत्री व्हावा, तद्वत् कृतज्ञता, आदरभाव नि सौंदर्यदृष्टि या भावनांचा त्रिवेणीसंगम माझ्या मनोभूमीत झाला. नी मग माझ्या ध्यानात आले की, हीच ती दुथडी भरून वाहणारी प्रीतिगंगा ! भगि-रथाच्या वंशजांना त्या भागीरथीत वाहून सद्गती कशी मिळाली हे मला आता पटू लागले, कारण या प्रीतिभागीरथीत मी नाहाले तर धन्य होईन असे मला वाटत होते

ती भागिरथी जरी शिवशंकराच्या पासून वाहू लागली होती, तरी माझी प्रीतिगंगा प्रभाशंकराच्या पासून उगम पावली होती

ही जाणीव जेव्हा मला झाली तेव्हा माझ्या वागण्यात फरक झाला असावा. घर चालविण्याचे काम जरी पूर्वीपेक्षाहि जास्त कसोशीने मी आता करू लागले तरी मी जास्तच अबोल झाले अगोदरच होते अबोल, पण आता जास्तच गप्प झाले मी आपल्याच प्रीतिभावनेच्या आनंदात नी आपल्याच नादात रंगलेली राही प्रीति जागृत होण्यापूर्वी मन बहिर्मुख असते, कारण बाह्य जगातून मन आनंद शोधते प्रीति उद्भूत झाल्यावर मन अंतर्मुख होते, कारण प्रीतीबरोबर आनंद हृदयात आपोआप येतो, मग तो शोधायला मनाने बाहेर पाहायचेच कशाला ?

गारुडी तोंडाने पुंगी वाजवत डोलू लागला म्हणजे फणा काढून उभा राहिलेला नाग नादलुब्ध होऊन गारुड्यावर नजर खिळवून तो हालेल तसा

हलतो, गारुडी वळेल तसा वळतो मीहि तशीच प्रभाशकराबद्दलच्या प्रीती-ने लुब्ध होऊन, त्याच्यावर दृष्टि खिळवून वागू लागले

माझ्या जगातल्या अस्तित्वाचे एकमेव कारण म्हणजे प्रभाशकर अशी माझी वृत्ति झाली. त्याच्याखेरीज बाकीच्या जगात मला काहीहि लभ्याश नव्हता, बाकीचे जग मला अर्थशून्य झाले.

प्रभाशकर आपल्या उद्योगात सदैव निमग्न असत ते घरी असले तरी कधीच आम्ही सर्व गप्पा मारीत बसलो आहो असे होत नसे.

माझ्या स्वभावात झालेल्या तफावतीची चाहूल शिरीषला प्रथम लागली. घरची कर्तीसवर्ती मी असल्याने त्याचा माझ्याशीच जास्त सबध येई त्याच्या आजारीपणात त्याची सेवा शुश्रूषा मी सारखी करी त्यामुळेहि माझा त्याशी पुष्कळ सबध आला शिरीष फार अशक्त असल्याने त्याच्या मनाची ठेवण पूर्वीपासूनच चिडखोर होती त्याच्या मनासारखी गोष्ट झाली नाही तर चट-कन् बोलून टाकून मोकळे व्हायचा त्याचा स्वभाव नव्हता तो त्याबद्दल मनातल्या मनात कुढत राही. आणि मग पुष्कळ दिवसानी केव्हातरी आपल्या मनातली खवखव काही तरी विचित्र वागणुकीने उघड करी. पण हा चिड-खोरपणा सोडला तर त्याचा बाकी स्वभाव फार चागला होता तोहि चागला बुद्धिमान होता

"तू अशी का वागतेस ?" तो म्हणे मला

"अशी म्हणजे कशी ?"

"कशी ते कस सागू, पण पूर्वीसारखी तू माझ्याशी वागत नाहीस तुझ्यात एकदम बदल झाला आहे !" तो रुसल्यासारखे बोले

"छे ! काहीसुद्धा नाही !" मी म्हणे नी गोष्ट हसण्यावारी नेई

त्यामुळे शिरीषहि कमी बोलू लागला आमचे दोघाचे खेळीमेळीचे बोलणे-वागणे कमी झाले मात्र शिरीष सारखी माझ्यावर बारीक नजर ठेवतो अशी मला जाणीव झाली

'आभास' बगल्यात आम्ही राहू लागलो तरी प्रभाशकर वेळ झाला की मलीरच्या माळबगल्यात जायचे

मलीरला मळ्यामधे एक मोठी खोल विहीर होती. या रेताड प्रदेशात मलीर हा मोठा पाणथळ भाग होता. या विहिरीवर बसवलेल्या पपाने

मुबलक पाणी मिळे, त्यावर खूप मोठी जमीन लागवडीखाली आणली होती. हा सर्व भाग सिधुनदाच्या मुखाशी असल्याने येथील माती उत्तम आहे. पाण्याचीच टचाई पाणी मिळाले की इकडची जमीन लागवडीला फार छान ! मलीरला आमच्या शतीवाडीवर नुसते हिरवेचार होते खजुरीची झाडे, आब्याची राई, दाट बाभुळवन याचे आमच्या शेतीवाडीभोवती रगण होते त्याच्यामधे भाजीपाला व धान्य पेरलेले असे त्याशिवाय द्राक्षाचाहि मोठा मळा होता कराचीला रेताड आणि उजाड प्रदेशात आमचा हा मळा म्हणजे एखाद्या नदनवनासारखा भासे

मलीरला जरी आमचे छोटेसे पक्के घर मळ्यावर होते तरी त्यापासूनहि दूर अशा अतरावर एकटे एक खोपट प्रभाशकरानी स्वत च्या हातानी बाधले होते या खोपटाभोवती पुष्कळ झाडे असल्याने तेथे बसले की अतिशय एकात मिळत असे या भागात कुणीहि फिरकू नये अशी प्रभाशकराची सक्त ताकीद असे मलीरच्या शेतीवाडीवर बाहेर जे चौकीदार असत त्याना घरच्या माणसाखेरीज इतर कुणाहि लोकाना प्रभाशकराच्या पूर्व परवानगी-वाचून आत येऊ देण्याला मज्जाव असे

प्रभाशकराच्या त्या छोटचा खोपटात एखाद्या सन्याशाच्या खोपटाप्रमाणे व्यवस्था होती बाजूच्या जमिनीपासून दान हात उच असा एक ओटा त्यानी केला होता त्यावर एक मोठे दर्भासन अथरलेले असे त्यावर निजता येईल एवढा तो मोठा होता बाजूची जमीन हातानी सारवलेली होती खोपटाच्या बाजू व छप्पर झापाच्या केलेल्या होत्या तेथे बसून प्रभाशकर मनन आणि चिंतन करीत पाणी पिण्याच्या एका कमडलूखेरीज व काही थोडचा पुस्तका-खेरीज तेथे काही नसे या खोपटात ते बसले म्हणजे दोन दोन, तीन तीन दिवस तेथेच् राहात आणि त्या दिवसात काही जेवणखाण करीत नसत. सर्व जगव्यवहारातून शरीरमनाने पूर्णपणे अलिप्त होऊन ते खोपटात बसले म्हणजे जणू काही सर्वसगपरित्याग करून हिमाचलाच्या गिरिकुहरात बसलेल्या योग्याप्रमाणे ते राहात

त्याच्या विचाराची छाया माझ्यावर फार चटकन् पडे ते मलीरला जास्त राहू लागल्यावर, मीहि आभास बगल्यातून मलीरच्या घरी येऊन राहात असे. त्याच्या निकट सान्निध्यात नेहमी असावे असे मला वाटे प्रभाशकर

जवळ नसले म्हणजे, वावाळ पडून सूर्यदर्शन न झाल्याने सृष्टीवर खिन्नतेची छाया पडते तसे माझ्या मनाला होई

परंतु माझ्या मनातली भावना मी कधी बोलून दाखवली नाही ती मनातल्या मनात ठेवून सर्व व्यवहार नेहमीप्रमाणे मी करीत असे गंगाजल भरून ताम्रकलश लाखेनें तोंड बंद करून ठेवावा, तशी मी होते ! माझे हृदय जरी प्रीतिजलाने तुडुंब भरलेले होते तरी माझे तोंड अगदी बंद असे !

एकदादोनदा शिरीषने विचारले, "तू मलीरला जाऊन कशाला राहातेस ?"

"प्रभाशंकर स्वत मलीरला गेल्यावर मी इथं कशाला राहावयाचं ?" मी म्हणे आणि माझ्या या उत्तरात तर्कपूर्णता आहे असे मला वाटे

पण त्याला तसे न वाटून शिरीष विचारी, "प्रभाशंकर मलीरला गेले म्हणजे तूहि लागलीच गेलं पाहिजे, असं का कुठं आहे ? मी नाही का मागं राहात ? "

"तुझं ठीक आहे रे ! तुला तुझा कामधंदा आहे. माझं तसं नाही !"

"का ? या मोठ्या बंगल्याची व्यवस्था पहाण्याचं व घर चालवण्याचं काम नाही का तुझं --? " तो थोड्याशा चिडखोरपणाने विचारी

"प्रभाशंकर असले तर या आभास बंगल्यात राम असतो ते नसले तर घर कमल ठेवावयाचं शिवाय नोकर माणसं सारी आहेतच सर्व कामाला. मग काय चालतेच आहे की आपोआप, मी कशाला त्याला ? "

माझ्या या बोलण्याने, माझा तसा यत्किंचित्हि हेतू नसताना, शिरीषला मी किती दुखवले याची प्राचीति मला मग अचानकपणे आली !

त्या दिवशी सकाळी उठल्यानंतर मी मलीरच्या घरातून प्रभाशंकराच्या खोपटाकडे गेले मी अनवाणी गेल्याने माझ्या पावलाचा यत्किंचित्हि आवाज झाला नाही खोपटाला दार नव्हते दारातून आत ऊन पडले होते खोपटातल्या आतल्या ओट्यावर पद्मासन घालून, नेत्र मिटून प्रभाशंकर ध्यानस्थ बसले होते त्याच्या चेहऱ्यावर अलिकडे अलिकडे तर केवढे तेज दिसू लागले होते ! त्याच्या ध्यानात व्यत्यय आणण्याचा माझा मुळीच उद्देश नव्हता. पण माझ्यावर एवढी मोहिनी पडली होती, की मी हलकेच जवळ गेले आणि ओट्याशेजारी जमिनीवर प्रभाशंकराच्या पायाशी जाऊन बसले त्याच्या

ध्यानस्थ चेहऱ्याकडे पाहात मी किती वेळ बसले कोणास ठाऊक ! मी माझे डोके त्याच्या पायावर टेकवले प्रभाशकरानी ध्यान सपवून आपले डोळे उघडलेले असावे

" तू इथ कशी आलीस, स्रग्धरे ? " त्यानी विचारले

" मला आल्याशिवाय राहवेना ! " मी उत्तरले

" तुला बरेच दिवस विचारीन म्हणत होतो तू लग्न का करीत नाहीस ? तू आता फार मोठी झालीस तू लग्न करण बर "

माझ्या मनात कुठला एवढा धीर आला कुणास ठाऊक पण मी म्हणाले, " माझी लग्न करायला कुठ ना आहे ? पण ज्याच्याशी मला करावयाच ती व्यक्ति तयार हवी ना ? "

" आपल्या परिचयातली आहे का ती व्यक्ति ? "

" हो "

" कोणची ती व्यक्ति ? "

मोठ्या धीराने मनाचा हिय्या करून मी म्हटले, 'तुम्ही ! " आणि माझ्या भावनेला प्रथमच वाचा फुटल्याने मला आनद वाटला

प्रभाशकर म्हणाले, " स्रग्धरे, तू केवढी, मी केवढा ! "

" केवळ वर्षामध्ये पुष्कळ अतर असल तरी काय झाल ? मला आता चागल वाईट स्वत च्या मनान कळण्याइतकी मोठी मी खास आहे मला जर ही गोष्ट सुखावह होणार असली तर काय हरकत आहे ? "

" पण माझ्याशीच लग्न कशाला करावयाच ? तुझ्या वयातला अनुरूप अशा कुणाशी का नाही ? "

" तुम्ही जगव्यवहार सोडून योगसाधना का करता ? " मी विचारले.

" कारण व्यवहारापेक्षा योगसाधन जास्त श्रेष्ठ, अशी माझी खात्री झाली, म्हणून "

" माझीहि खात्री झाली आहे की मी पाहिलेल्या अनेक पुरुषामधे तुम्ही श्रेष्ठ आहात जास्त चागल्या गोष्टीची ओळख पटल्यावर तिच्याहून कमी प्रतीच्या गोष्टीची कोण हाव धरील ?"

" इतराच्याहून, तुझ्या मते, मी जास्त चागला असलो तरी माझ्यात तू अस काय पाहिल आहेस ? "

"तुमच्यामधे माझ्या मनाला आवडणाऱ्या सद्‌गुणाची पूर्णता झालेली मला दिसते व्यक्ति कशी असावी, याचा तुम्ही मला आदर्श वाटता !"

"म्हणजे पूर्णतेच्या शोधात का तू आहेस ?"

"हो अगदी बरोबर, आणि म्हणूनच तुमच्याशी विवाहबद्ध व्हाव अस मला वाटत"

"स्रग्धरे, मग तू वाट चुकलीस ! कारण पूर्णतेच्या शोधात तू असलीस तर ती तुला मनुष्यप्राण्यात आढळणार नाही ! नी माझ्यात तर मुळीच नाही. कारण पूर्णतेच्या शोधात मी स्वतःच अजून मार्ग क्रमीत आहे मी स्वतःच पूर्णता शोधत असल्यावर, मी तिथ कसा असेन ? तुला पूर्णता एकाच ठिकाणी सापडेल, आणि ती म्हणजे ईश्वराच्या पायाशी !"

"मग ईश्वरप्राप्तीच्या आड तुमचा माझा विवाह येईल का ?'

"होय ! येईल ! जन्मभर मी सत्याच्या आणि पूर्णतेच्या शोधात घालविला आहे मानसिक आणि शारीरिक सारी बधन मी तोडून टाकत आहे अस असता नवीन बधन कशी बर निर्माण करू ?"

आणि त्याक्षणी वज्राघात व्हावा, असे मला वाटले जणु काही जीवनाच्या कमानीतील चावीचा दगड निखळून पडावा, असे मला झाले माझे मन व्याकुळ होऊन, अश्रु अनावर होऊन माझ्या डोळ्यातून वाहू लागले !

"स्रग्धरे, रडू नकोस ! तुझ्यावर माझ अपरपार प्रेम आहे तुझ्यावरच काय, साऱ्या मनुष्यजातीबद्दल मला मनात मोठ प्रेम वाटत ! पण त्या प्रेमाचा अर्थ ससारातच पडल पाहिजे असा नाही. प्रेम आणि सदिच्छा केवळ शारीरिक आणि मानसिक बधन, अस का मानाव ? प्रेम हे सूर्याच्या उन्हासारख असाव ते ज्यावर पडेल ती गोष्ट उज्ज्वल दिसू लागते. पण उन्हाचा कुणाभोवती पाश असत नाही तुला दुःख वाटत.आहे, पण तू जर पूर्णतेच्या शोधात असलीस, तर त्या मार्गावर चालत असताना सुखदुःखाचे खाचखळगे लागून माणूस अनेकदा ठेचकाळतो ! पण ठेच लागून डोळयाला क्षणभर पाणी आल तरी सन्मार्गान चालण्याच का कोणी सोडतो त्यासाठी ? ध्येयाप्रत चालत जाताना ज्या अनेक गोष्टी वाटेवर टाकून पुढ जाव लागत, त्यामधलीच ही एक आहे, अस मान पण तुझ्यापुढ काही

पावल चालून गेलेला पाईक म्हणून मी तुला अनुभवान एवढ सागतो की या मोहत्यागाबद्दल तुला पुढ समाधानच झाल्याशिवाय राहाणार नाही ! "

माझ्या डोक्यावरून हात फिरवून ते म्हणाले, " स्रग्धरे, शिरीष हा तुझ्याच वयाचा आहे तो स्वभावान फार चागला आहे, हुशार आहे आणि तुला अनुरूप आहे त्याच्याशी तू विवाह कर. त्याच तुझ्यावर प्रेम आहे, असहि मला वाटत तुमचा दोघाचा विवाह झाल्यान ती गोष्ट फार योग्य तर होईलच, पण मलाहि समाधान वाटेल ! "

याच वेळी अगदी अचानकपणे शिरीष आत आला त्याने जाऊन प्रभाशकराच्या पायाला घट्ट मिठी मारली आणि तो ओक्साबोक्शी रडू लागला. प्रभाशकरानी त्याच्या डोक्यावरहि कुरवाळत त्याला विचारले, " शिरीष बाळा, तुला वेड तर नाही लागल ? तू एवढा मोठा, आणि असा एखाद्या लहान मुलासारखा रडतोस काय ? "

शिरीषच्या दु खापुढे मी माझेहि दुःख विसरले, आणि त्याचा हात हातात धरून त्याचे सात्वन करू लागले त्याला काय झाले, हे कळेना.

त्याचा दु खभार ओसरल्यावर तो म्हणाला, " मला क्षमा करा मी तुमच फार अपराधी आहे ! स्रग्धरेच्याबद्दल माझ्या मनात गेली काही वर्ष प्रेम उत्पन्न झाल होत. पण तिच प्रेम तुमच्यावर आहे, अस माझ्या ध्यानात येऊन, माझ्या चिडखोर स्वभावान उचल खाल्ली माझी मत्सरभावना इतकी बळावली की त्यामध्ये माझ्या तुमच्याबद्दल वाटणाऱ्या कृतज्ञताबुद्धीचाहि अजिबात लोप झाला ! मी तुमच्यावर पाळत ठेवू लागलो स्रग्धरेला तुम्हीच आपल्या नादी लावून माझ्यापासून दूर करीत आहात, असा मी माझ्या मनाचा समज करून घेतला. आणि तुम्ही दोघे एकत्र असताना तुम्हाला पकडून, त्याची जाणीव देऊन, माराव अशी दुष्ट इच्छा मी मनाशी बाळगली ! त्याच हेतून हा सुरा घेऊन मी इथ आज आलो होतो आणि खोपटाआड लपून बसलो असताना, तुमच सर्व सभाषण ऐकल त्यामुळ तुमच्या थोरपणाची जितकी कल्पना आली, तितकीच माझ्या नीच स्वभावाची मला जाणीव होऊन, मला अतोनात शरम वाटून दु ख झाल." त्याने आपल्या कमरेचा एक मोठा तीक्ष्ण सुरा प्रभाशकरांच्या पायापाशी ठेवला आणि तो म्हणाला, " मला क्षमा करा !

तुमच्याजवळ माझा खोटेपणा स्वत च्या तोडान सागून, क्षमा मागून, येथून कायमच चालत व्हाव अस आता मी ठरवल आहे. मला तशी अनुज्ञा द्या."

मी तर हतबुद्धच झाले होते पण प्रभाशकराची शाति किंचित्हि ढळली नव्हती! ते म्हणाले, "माणसाला आपली चूक कळून पश्चात्ताप झाला व त्यान आपला मार्ग सुधारला म्हणजे त्यात सर्व आल त्या परिस्थितीपासून पळून जाण्याची भीरुता माणसान दाखवू नये. जा आता तुम्ही दोघ, आणि आजची कोणतीच गोष्ट घडली नाही, अस मानून पूर्वीसारख आनदान वागा! तुमच्या दोघाच्याहि सत्प्रवृत्तीबद्दल माझी पूर्ण खात्री आहे!"

"त्या सगळ्या अनपेक्षित प्रकारानतर शिरीष इतका धीमेपणान व सौजन्यान वागू लागला, की त्याच्या स्वभावातला चिडखोरपणा तेवढा गेल्यान एरवी तो किती चागला होता याची खात्री पटली. पण त्याच्याशी लग्न करण्याच मात्र माझ्या मनात चुकूनहि येऊ शकले नाही त्याच्याशीच काय, पण कुणाच्याशीहि आता विवाहबद्ध होण नको, असा मी निश्चय ठरवला कारण ज्या दृष्टीन गौरीशकराच्या हिमाच्छादित, धवल, आणि उच्चतम शिखराच देदिप्यमान, दैवी सौंदर्य एकदा पाहिल, त्या दृष्टीला त्यानतर पर्वतीचा मुलामा दिलेला कळस पाहून का कधी समाधान होईल? मीहि ईश्वराची उपासक बनले! आणि ज्या सत्य आणि पूर्णता, याच्या शोधात प्रभाशकर मार्ग आक्रमत होते, त्याच्या पावलावर पाऊल ठेवून तोच मार्ग मीहि चोखाळला! प्रभाशकर जरी गेले, तरी त्याचा सदेश मला पाठ झाला आहे. त्याच मार्गाने मी आजन्म पावले टाकीत राहीन!"

---

## प्रकरण : १५–जमशेदांनीं काय सांगितलें ?

मी जमशेदाच्याकडे गेल्याबर त्यानी हसत मला विचारले, "काय रे श्रीधर, कुठवर आल तुझ काम ?"

मी म्हटले, "माझ तर काम सपल आहे. म्हणून तर तुमच्याकड आलो."

"तुझ काम सपल म्हणतोस, मग माझ्याकड आता काय काम तुझ ?"

"वा, जमशेद! तुम्हीच ना सागितल होतत मला की, तू प्रभाशकराची माहिती जी काही इतर लोकाच्याकडून मिळवावयाची ती मिळव आणि मग मला आणून दाखव' ही पाहा, ती सर्व माहिती मी जमवून लिहून काढली आहे तुम्ही कबूल केल होतत की तुम्हाला ठाऊक असलेली सर्व माहिती तुम्ही मला सागाल म्हणून."

जमशेद थट्टेच्या स्वरात म्हणाले, "अरे, तू एका मोठ्या माणसाच सर्व चरित्र अभ्यासून लिहून काढल, अस म्हणतोस, आणि तरीसुद्धा तुला त्याची एवढी ओळख झालेली असू नाही का, की उरलेली थोडी माहिती तुला कल्पनेन पुरी करता येऊ नये ? व्यक्तीचा स्वभाव जर समजला तर उपलब्ध नसलेली तेवढी माहिती तुला सहज ताडता यावी वास्तविक"

"तुमच्या म्हणण्याचा आशय कळला मला, जमशेद. जर त्याच्या आयुष्यातील मधला एखादा भाग मला न कळता तर तेवढा कसा असू शकेल, हे मी बरोबर सागू शकेन, अस मला वाटत पण प्रभाशकराची सुरवातीची माहिती आणि शेवटची माहिती या दोन्ही मला ताडता यण शक्य नाही कारण प्रारभ आणि अत या दोन्ही गोष्टी व्यक्तीच्या आधीन असत नाहीत मग स्वभाव माहिती असून नसून सारखाच!"

"ठीक आहे, श्रीधर, तुझ हस्तलिखित ठेवून जा आणि आठदहा दिवसानी ये मग तोवर मी ते वाचून ठेवीन आणि तू विचारशील त्या प्रश्नाची उत्तरे देईन"

दहा दिवसानी मी गेल्यावर जमशेदानी मला आतल्या हॉलमधे नेऊन, जमिनीवर अथ लेल्या बैठकीवर, शेजारी बसविले. ते मला म्हणाले, 'तू माहिती मिळविण्यासाठी पुष्कळच परिश्रम घेतलेले दिसतात ठीक आहे. आता मला विचार तुला काय विचारायच आहे ते"

मी विचारले, "प्रभाशकर मुक्याच साग घेऊन पडावावर चढून देशातराला निघाले इथपासून त्याची माहिती मला कळली, आणि पन्नासाव्या वाढदिवसाच्या दिवशी सकाळी देवापुढ ते बसलेले असताना थोड्याशा चमत्कारिक परिस्थितीत त्याचा अत झाला इथपर्यंतहि माहिती मला कळली आहे पण पडावावर चढण्यापूर्वी ते कोठून आले ते एक तुम्ही मला सागा. आणि दुसरी गोष्ट म्हणजे, त्याच्यासारख्या यशस्वी पुरुषाचा पन्नासावा वाढ-

दिवस साजरा व्हावयाच्या नेमक्या शुभवेळी त्याचा अत कसा झाला ? त्यांच्या हातात पिस्तुल होत, त्यातील एकहि गोळी उडवलेली नव्हती. तरीपण देवापुढ प्रार्थनेस बसताना पिस्तुल हाताशी घेण्याच काय कारण ? मी आता तुम्हाला विचारले हे दोन्ही प्रश्न माझ्या दृष्टीपुढ उभे राहतात, आणि त्या प्रश्नाची समाधानकारक उत्तर मिळाल्याशिवाय मी जमवलेली सर्व माहिती अजिबात अपुरी राहते. पाय नसले तर माणूस अजिबात उभा राहू शकत नाही. तद्वत् प्रारभ आणि अत याच्यावाचून चरित्र उभ राहणार कशावर ? त्या दोन्ही गोष्टी मला न कळल्या तर माझे सर्व परिश्रम जणू काही व्यर्थ गेले, अस मला वाटत. म्हणून त्या दोन्ही गोष्टी मला सागा "

जमशेदानी मला माझ्या दोन्ही प्रश्नाची उत्तरे दिली त्यापैकी प्रभाशकराच्या प्रारभाबद्दल काय सागितले ते मी उपोद्घातामध्ये सागितले आहे. दुसऱ्या प्रश्नाबद्दल काय सागितले ते उपसहारामध्ये मी नमूद करीत आहे

---

# —उपसंहार—

जमशेदानी मला 'आभास' बगल्यावर नेले स्वत बरोबर. शिरीषला विचारून आम्ही दोघे प्रभाशकराच्या भव्य प्रार्थनामदिरात जाऊन बसलो. प्रभाशकर गेले त्या वेळी ज्या स्थितीत सर्व वस्तु होत्या, तशाच्या तशाच त्या राखून ठेवल्या होत्या. मधल्या चौथऱ्याच्या दोन्ही बाजूस मोठे पितळी नदादीप अजूनहि पाजळत होते उदबत्त्याचा धूर त्यांच्या पेटलेल्या लाल टोकापासून अल्लद तरगत निघे आणि हरघडी नवनवी वळणे घेत उच जाई. जसजसा तो उच जाई तसतसा तो आकाराने पसरत शेवटी वातावरणात मिसळून दिसेनासा होई

चौथऱ्यावरची देवता पद्मासन घालून बसली होती तिचे नेत्र अर्धोन्मीलित होते चराचरसृष्टीचा खेळ अतर्ज्ञानाने पाहात ती बसली होती. निरामय आनद, चिरशान्ति याचा खोल, सथ डोहच होता हा जणू काही !

त्या देवतेच्या सन्मुख मला जमशेदानी बसविले. आणि माझ्या शेजारी ते

स्वत बसले त्यानी नेत्र मिटून क्षणभर प्रार्थना केली मग डोळे उघडून ते म्हणाले,

"प्रारभ आणि अत ही परस्पर विरोधी टोक असतात अस वाटत खर, पण वास्तविक तस नाही, कारण सर्व जीवन नुसतच सूत्रमय नाही तर ते चक्राकार आहे त्यामुळ प्रारभ नी अत ही टोक शेवटी एकमेकात मिळतात व म्हणूनच ती अतिशय परस्परावलबी असतात एकामुळ दुसर ठरत

प्रभाशकराना त्याची मानलेलो माता, निपुणाबेन भेटल्याची व गुलाबशेठाची मोठी मालमत्ता सरतेशेवटी तिने प्रभाशकराना कशी दिली याची माहिती तुला झालेलीच होती प्रभाशकराच्या देशातरापूर्वीच्या हकीगतीवर थोडा प्रकाश त्यान पडलाच होता पण तीच माहिती सविस्तरपणान मी तुला काल सागितली ती तू कालच लिहूनहि काढलीस नी तिचा उपोद्घात म्हणून समावेश केलास पण त्यात मुख्य म्हणजे प्रभाशकराचो त्या वेळची मन स्थिति मला तुला समजावून द्यावयाची आहे कारण त्या वेळची मन.स्थिति हीच त्याच्या पुढच्या सर्व चरित्राची गुरुकिल्ली आहे

प्रभाशकर, म्हणजे तेव्हाचा किरण, ज्या वेळी त्या तुटक्या कड्यावर आत्महत्या करण्यासाठी मनाचा निश्चय करून उभा राहिला त्या वेळी त्याची मनःस्थिति किती दुर्धर होती, याची नीट कल्पना केली पाहिजे

तो पोरका होता त्याला निपुणाबेनन लहानाचा मोठा केला, नी शिक्षण दिल आपल आयुष्य सुरू होताना जरी आपण अनाथ होतो, तरी आता आपल्या पायात स्वतच्या पायावर उभ राहता येईल अशी शक्ति आली आहे अशी उमेद त्याला वाटू लागली होती पण नेमकी त्याच आणीबाणीच्या क्षणी त्याची उमेद खचावी अशी परिस्थिति त्याच्यावर ओढवली होती, व त्याचा मुळीच दोष नसताना कधी न बोलणाऱ्या बापाच्या उग्र चेहेऱ्यावर लहान मुलानी स्मित पाहून, धीर करून त्याशी एक शब्द आशेन बोलावा, तो त्या बापान चिडून त्याच्या कानशिलात भडकावावी अस त्याला झाल होन किरण दैवाच्या गतीमुळ अगदी हिरमुसला झाला होता नुकतच जमिनीबाहेर निघालेल रोप, वादळी वाऱ्यान पुन्हा जमिनीसरपट व्हाव अस त्याला वाटत होत

त्याचा जगावरचा विश्वास पार उडाला होता. या जगात न्याय नाही

नियम नाही उन्हाळ्यात माळरानावर वावटळ उडते नी ती चक्राकार भरकटत कशीतरी कुठतरी फिरत जाते तिच्या लहरी मार्गात सापडतात ती पान फुल झाडावरून तुटून इतस्तत उधळून दिली जातात

दैव म्हणजे देवाधर्माच्या नावान मोकळा सोडलेला, माजलेला, निर्बुद्ध बैल आहे ! गरीब बिचाऱ्या लोकाना शिगान ढोशीत, हुदाडत तो मोकाट फिरतो ! आपल्याला दैवाची ढुशी मिळाली, लाथेचा तडाखा मिळाला, त्याबद्दल काही करता येत नाही कारण त्या दैवाला वेसण कोण घालणार ?

किरणसारखी पोरकी, अनाथ मुल फार अतर्मुख स्वभावाची असतात. स्वत ची सुखदु ख ती मोकळेपणान कुणाजवळ सागणार ? आपली सुखदु ख मनातल्या मनात ठेवून स्वत शीच त्याचा सारखा विचार करण्यान त्याना अकालपरिपक्वता येते ती बहुतेक निराशावादी होतात दैवाची आपल्याला विनाकारण गाजणूक होते आहे, जग आपल्याला सावत्र आईसारख वागवत आहे अस त्याना वाटत

या विरोधी परिस्थितीविरुद्ध आपला काही उपाय चालत नाही अस पाहून नैराश्यवादान अगदी हताश होऊन अशी तरुण माणस शेवटी आत्महत्येकडे वळतात

किरणची मानसिक स्थिति तशी झालेली होती पायात शेपटी घालून, गलितधैर्य झालेल्या व इतर जबरदस्त कुत्र्याच्या तडाख्यातून धूम पळून जाणाऱ्या भित्र्या, बेवारशी कुत्र्याप्रमाण त्याला वाटत होत !

किरण त्या कड्यावर उभा राहिला वर आकाशात काही घारी घिरट्या घालीत होत्या किरणच्या जोडलेल्या हातात काहीतरी खाण्याची वस्तु आहे अस एका घारीला वाटल असाव तो नुसता हातरुमाल होता त्याच्या हातात तो कड्यावरून पुढ अग झोकून देणार इतक्यात त्याच क्षणी एका मोठ्या घारीन त्याच्या हातातल्या वस्तूवर, वरून अचानक जोरान येऊन झडप मारली आणि आपल्या पजात तो रुमाल पकडून ती घेऊन गेली ! तिच्या धक्क्यान कड्याच्या टोकावर उभ्या राहिलेल्या किरणचा तोल पुढ जाण्याऐवजी माग गेला ! पुढ पडण्याऐवजी किरण मागे कड्याच्या दगडात असलेल्या, मागे उल्लेख केलेल्या, खोबणीत पडला

क्षणभर काय झाल याचा त्याला उमज पडेना, इतक्या अकल्पितपणानं ही घटना झाली!

त्या दगडाच्या खोबणीत पडल्या पडल्या तो विचार करू लागला काय विचित्रपणा दैवाचा, कुणी मरायच ठरवल तर ते दैव मरूमुद्धा धड देत नाही! त्याला त्याहि स्थितीत हसू आल अरेबियन् नाईट्स्मधल्या एका माणसाची गोष्ट त्याला आठवली त्या माणसाला आपले जुने जोडे फेकून द्यायचे होते नुसते! पण ते काही केल्या त्याला जमेना कसेहि कुठेहि टाकले तरी त्यामुळ काहीतरी विचित्र योग जुळून यायचा नी हे जोडे कुणाचे असा शोध काढून लोकानी ते त्याकडे परत पोचवून त्याला शिव्या द्यावयाच्या अस सारख चालल होत शेवटी तो रडकुंडी आल्यावर, त्याची कथा ऐकून खूष होऊन खलिफान त्याला माफ केल नी त्याचे जोडे आपल्या दूताकरवी नष्ट केले!

पडल्या पडल्या त्याच्या मनात आल मी जर पुढ पडतो तर? एव्हाना माझ शरीर कडयाखाली ओपटून, ठेचाळून मी मरून गेलेला असतो म्हणजे खुनशी गुलाबशेठच्या, नी पोलिसाच्या तावडीतून माझी सुटका झाली असती कायमची कारण जगाच्या दृष्टीन मी नाहीसा झालो असतो! किरणच अस्तित्वच उरल नसत!

जगाच्या दृष्टीन माझा मृत्यु ही किमान मर्यादा ठरली असती त्या मर्यादेच्या नतर जग मला विसरून जायला तयार झाल असत किरणची समेहोलपट किरणच्या मरणापाशी जगान सोडून दिली असती!

पण मी मेल्यानतर मला काय वाटल असत? कुणास ठाऊक मरणानतर काय होत ते! पण काही झाल तरी मनाला टोचणी लागून राहिली असती की, 'जगानं आपली लाडगेतोड केली आणि जगापुढ हार खाऊन आपण आत्महत्या केली!' म्हणजे जगापुढ आपण शरणचिठ्ठी दिली असच झाल की!

आत्महत्या करायची असली तरी त्यातहि धैर्य लागतच की जगाच्या अतीव भयातूनच ते धैर्य उत्पन्न होत पाण्यातून अग्नि! अधारातून उजेड! भयातून धैर्य!!

समजा, माणूस जगला तर त्याला जगापासून भय कसल सभवेल?

वाइटात वाईट काय करू शकेल जग आपल ? मानमान्यता नाही मिळणार नको ती! —

धन नाही मिळणार ? - तेहि नको !

— धन नसल तर इतर माणस जवळ फिरकणार नाहीत तुझ्या !—

— वा ! छान झाल औषधावाचून खोकला गेला !

पाहा तुझ्यावर कुणी प्रेम करणार नाही ! —

— माझ्या स्वत करिता म्हणून माझ्यावर प्रेम न करिता माझ्या लौकिक-प्रतिष्ठेवर वा धनावर दृष्टि ठेवून जर कुणी प्रेम करणार असल माझ्यावर तर तसल मतलबी प्रेम हवच आहे कुणाला ?

ते असो पण प्रेम नाही तरी, तुला तुझी पोरबाळ असावी अस नाही का वाटत ?--मला स्वत लाच जगण नको झाल इथ आणि त्यात भरीला या खाईत घालायला मुल कुणाला हवीत ? नकोच ती !

पण गरिबीन काय होत आहे का तुला ठाऊक ? –काय ? गरिबीन वस्त्र-प्रावरण मिळत नाही, खायला मिळत नाही, 'शरीर भुकेन नी व्याधीनी ग्रासून त्याचा खुळखुळा होतो !--

— म्हणजे सुख मिळत नाही ?

छे ! छे ! अगदी नाव नको सुखाच ! जगाकडून अपेक्षाच नको सुखाची !

-- वा ठीकच झाल मग मी जगाकडून सुखाची अपेक्षाच करणार नाही अजिबात ! मग काय करेल जग ?

मग जग तुला जीवनातून उठवील तुला भयकर मृत्यु येईल !—एवढच का, मृत्यु नाही तरी आत्महत्येनहि मला आलाच असता की ! त्याहून जास्त अमोघ अस्त्र जगाच्या अक्षय्य वाटणाऱ्या भात्यात कोणत आहे का आणखी ?—

त्या प्रश्नाला उत्तर आल नाही ! सार शातच होत ! वर आकाशात अतिशय स्वच्छ वातावरणात तारे आपल्या स्वयभू तेजान तळपत होते ! या पृथ्वीवरच्या मर्त्य जगापलीकडहि फार मोठ विश्व आहे या पृथ्वीचा त्या पुढ काय पाड, अशा अनत सूर्य–मालिका आहेत ! अनत विश्व आहेत. ती अमावास्येची काळोखी रात्र होती अमावास्या ! अधार, काळाकभिन्न अध - कार ! अधाराची परिसीमा ! त्याहून जास्त अधार सभवतच नाही नी त्या अमावास्येच्या रात्री, रानावनात, सह्याद्रि पर्वताच्या एका उच कड्यावर

वारा घोघावत असताना, निरभ्र आकाशाच्या छपराखाली, किरणचा पुनर्जन्म झाला! दुःखाच्या खोल गर्तेतून उसळी घेऊन तावून सुलाखून त्याचं मन बाहेर आलं पुन्हा!

हा पुनर्जन्म फारच न्यारा होता. कारण प्रसववेदना आईला होत नव्हत्या मनाच्या पुनर्जन्मात प्रसववेदना मनालाच होतात. प्रसूति करतंहि मन, आणि जन्म पावतंहि मनच!!!

या जन्माच्या वेळी सारेच ग्रह उच्चीचे होते! बुद्धि-सूर्य, विवेक-गुरु, शांति-चंद्र, आशा-शुक्र सारेच ग्रह लग्नस्थानी पडले होते. अशा मोठ्या मुहूर्तावर किरणमधून प्रभाशंकर जन्मला तो मग महापुरुष व्हावा यात काय नवल?

पर्वतावर वाहाणारा गार वारा म्हणाला 'प्रभाशंकर! तुला रहस्य सापडलं, रे सापडलं, जीवनाचं! जगाकडून सुखाची कसलीच अपेक्षा करू नये माणसानं. जगापासून मन अलिप्त ठेवावं. कारण 'सुखाची अपेक्षा' हे रजःकण आहेत! धूळ आहे रे धूळ आहे ती. मला ठाऊक आहे, कारण मीच ती उडवतो सारखी! ती डोळ्यात जाऊन दृष्टीला अंधी येते, नाही तर पाणी तरी येतं डोळ्याला!'

आकाशातले स्वयंभू प्रकाशानं लुकलुकणारे तारे म्हणाले, 'प्रभाशंकर, बरोबर आहे तुझा निष्कर्ष! आमच्याकडं पाहा. हे विश्व इतकं प्रचंड आहे की ते समजायला मन बहिर्मुख केलं पाहिजे. मृत्यूची भीति सोड. कारण तू आमच्यासारखाच अमर आहेस- मृत्यु नाहीच आहे कुठं. मृत्यु नाही पण जीवनाला गति आहे, बदल आहे! जीवनाची गतिमानता किंवा नवनवोन्मेषशालीनता म्हणजे विनाश नाही काही! तेव्हा मृत्यूचं भय कसलं?'

मग मी जर, 'मृत्यूचं भय सोडायचं आणि जगाच्या सुखाशेपासून मन अलिप्त ठेवायचं' या दोन तत्वावर जीवन आधारलं माझं तर काय होईल? खरोखरीच पाहायला काय हरकत आहे प्रत्यक्ष अनुभव घेऊन? नाहीतरी कड्याखाली सापडून किरणचा जगाच्या दृष्टीनं अंत झाला, नी मी, प्रभाशंकर, देशांतर करून नव्या परिस्थितीत, जुने लागेबांधे मागं टाकून नवीन आयुष्य सुरू केलं तर?– होय तसंच करणार मी.

अनेक वर्षांनी त्याला निर्घोर झोप लागली! जेव्हा त्या कड्यावर सूर्या-

ची किरण पडली त्याच वेळी प्रभाशकराच्या मनात आशावाद उगवला ! रात्रीबरोबरच नैराश्यवादाचा अध कार सपला !'

जमशेद म्हणाले, "अशी प्रभाशकराची मन स्थिति त्यानी देशातर करण्यापूर्वी झालेली होती"

"आता प्रभाशकराच्या मला उपलब्ध झालेल्या चरित्राची पूर्वभूमिका काय होती ती माझ्या नीट ध्यानात आली त्याच्या जीवनातील अनेक गोष्टीवर स्वच्छ उजेड पडला आहे"

"आता तुझ्या पुढच्या प्रश्नाच उत्तर तुला सागावयाच आहे ना? ठीक !" जमशेद म्हणाले, नी सागू लागले,

"सुखाशेपासून अलिप्त राहायच, नी मृत्यूच भय मनात बाळगायच नाही ही प्रभाशकराच्या जीविताची दोन मुख्य सूत्र होती त्यामधे, नि ज्याला निष्काम कर्मयोग म्हणतात त्यात, काय फरक आहे? 'कर्मण्येऽवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।' असा निष्काम कर्मयोग जन्मभर प्रभाशकरानी आचरणात आणला आणि त्या किमयेन त्याच्या जीवनाच सोन झाल जे जग पूर्वी त्याना भीतिप्रद बुजगावण वाटे ते आता त्याच्या पायापाशी विनीत झालेल होत जग आणि जगातील ऐहिक ऐश्वर्य सार त्याना साध्य झाल होत जगाची कामधेनु त्याच्या आधीन झाली होती

पण त्याचा मत्र ते विसरले नव्हते

जगाच्या दृष्टीला त्याची अपरपार सपत्ति दिसे पण तीहि खरोखरीच आभास होता

"महाबळेश्वरला तू गेला आहेस ना? तिथ कृष्णेचा उगम पाहिला आहेस का?"

मी मान हलविली

"कृष्णा एका गोमुखातून उगम पावते गोमुखातून कृष्णेच पाणी वाहिल वर्षानुवर्ष तरी गोमुख कधी तरी भिजून गल आहे का? गोमुखातल्या ज्या जिव्हेवरून पाणी वाहात तिन कधी त्या पाण्याचा थेब तरी स्वत प्राशिला आहे का? नाही ! तद्वत्च प्रभाशकराची सपत्ति होती त्यानी प्रत्येक धद्यातून उत्पन्न होणारा धनौघ गरीबगुरिबाच्याकड परत लावून दिला होता.

उदाहरणार्थ, त्याच्या मालाची चढउतार करण्याच्या कत्राटातून जे पैसे

येत ते सरळ त्याच मजुराच्याकरिता चालवलेल्या इस्पितळ, शाळा, नफ्या-वाचून चालविलेल दुकान इत्यादि गोष्टीवर ते खर्चीत मजुराच्या मुलापैकी होतकरू मुलाना उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्त्या त्यातून ते देत

हे मला चागल ठाऊक असण्याच कारण अस की प्रभाशकराच्यावर त्याच्या काही शत्रूनी, ते सरकारला उत्पन्नावर कर देत नाहीत याची चौकशी करावी असा तक्रार अर्ज सरकारात गुदरला होता माग एकदा सरकारन यासाठी एक चौकशीसमिती नेमली निरनिराळ्या धद्यातील तज्ज्ञाच्या साक्षी त्या समितीन घेतल्या प्रभाशकरानी दाखविलेले हिशेब इतके चोख होते की, खुद्द सरकारी अधिकाऱ्यानी सुद्धा त्याबद्दल प्रशसा केली परतु धद्याच्या धनोत्पादन शक्तीबद्दल प्रभाशकरानी केलेली विधान सरकारला पडताळून पाहावयाची होती आणि त्यासाठी प्रभाशकर करीत त्या अनेक धद्यामधल्या त्रयस्थ लोकाच्या साक्षी समितीन घेतल्या मी त्या समितीवर बिनसरकारी सभासद नेमला गेलो होतो या समितीच कामकाज अर्थातच गुप्त तऱ्हेन झाल्यान लोकाना ठाऊक झाल नाही कारण प्रभाशकराच उत्पन्न किती, त्यावर ते कर देतात की नाही, या सर्व गोष्टीचा हिशेब कसोशीन करून शेवटी प्रभाशकरावर यत्किचित्हि दोष येऊ शकत नाही अस सरकार-ला आढळून आल

माझी स्वत ची तर खात्रीच झाली की, या गृहस्थाची धद्यामधील दृष्टि इतकी सूक्ष्म व अचूक होती, की केवळ स्वार्थी बुद्धि असती तर जगातल्या मोठ्या धनवान् माणसात गणना झाली असती अशी सपत्ति तो मिळवू शकला असता पण स्वार्थाची दृष्टीच त्याच्यात नव्हती कधी !

सढळ हातान सारखी लोकाना ते मदत करीत असत पण त्याच सर्व दान गुप्तपणे चाले त्याची मदत घेणाऱ्या अनेकाना ही मदत प्रभाशकर करितात हेहि कधी समजल नाही एवढच काय त्याची मदत घेणाऱ्या अनेकानी त्याच्यावर ते गरिबाची पिळवणूक करून श्रीमत झाले म्हणून आरोप केले ! त्या गोष्टी ऐकून ते दुसऱ्या कानान सोडून देत

शेवटी त्यानी उरलेल्या सपत्तीचा,– त्यातच "आभास" व मलीरची शतीवाडी जमा होते-ट्रस्ट केला आणि विश्वस्त म्हणून स्रग्धरा, शिरीष, आणखी एक थोर गृहस्थ याची नेमणूक केली होती त्या सपत्तीतून अनेक

विश्वविद्यालयाना, व लोकोपयोगी कार्याना, व सस्थाना फार मोठी मदत केली जाते. पण प्रभाशकरानी काही देणगी दिली असा चुकूनसुद्धा उच्चार कुठ प्रभाशकर करू देत नसत गुप्तदानात जर महापुण्य असल, तर प्रभाशकरानी ते अतोनात मिळविल असेल !

आता प्रभाशकर योगाभ्यास करीत. आणि त्या साधनात त्याचा माझा पुष्कळच परिचय वाढला त्याच्या थोरपणाची यथार्थ कल्पना मग मला आली.

अनेकदा ते म्हणत मला, ' सपत्ति ही खरीच उपाधि आहे. माझ्या जीवनाला इतकी थोडी सपत्ति लागते, इतक्या थोड्या गोष्टी लागतात की ही बाकीची सपत्ति निष्पन्न करायची नी पुन्हा योग्य कारणी ती खर्च पडते की नाही हे पाहात बसावयाच म्हणजे केवढी भगभग या सर्वातून मला अग काढून घ्यावयाच आहे ! '

प्रभाशकर म्हणत मला, ' तुम्हाला एक तत्वज्ञान्याच वाक्य माहीत आहे ना ? तो म्हणतो, ' As I grow older, I find that I require fewer people and fewer things for my happiness. All that really matters is what I think and feel The only true wealth is intangible ! '

मलाहि तसच झाल आहे या जगाच्या उपाधीतून वेगळ होऊन बाजूला बसाव खरोखरीच माझ्या गरजा इतक्या थोड्या आहेत की त्या भागविण्याइतकाच वेळ त्यावर खर्च करून उरलेला सर्व काल योगाभ्यासात घालवावा

आणि याप्रमाणच ते आताशी योगाभ्यासात रमून जात

जमशेद म्हणाले, " श्रीधर, शब्दानी सागता येतील तेवढ्या गोष्टी मी तुला इतका वेळ सागितल्या प्रभाशकराना अतसमयी काय वाटल असेल हे आता समजण्यासाठी थोडा निराळा मार्ग स्वीकारला पाहिजे तू स्वत त्याच्या चरित्रग्रथाची सर्व साधन श्रमान उपलब्ध करून त्याच सपादन केलस आणि उरलेल्या काही गोष्टी मी तुला काल नी आज सांगितल्या त्यावरून मला वाटत की प्रभाशकराच्या चरित्राशी अगदी एकरूप होऊन जाण तुला स्वतःला आता मुळीच अवघड जाऊ नये. त्याचे अंतकाळचे विचार केवळ शब्दांत बसवून सागण मला तरी सोप वाटत नाही. पण त्या मनःस्थितीची प्रचीति मी तुला अन्य रीतीन पटवू शकेन !

प्रभाशकर अतसमयी जिथ दर्भासनावर देवतेपुढ पद्मासन घालून बसले होते तिथ बस समोरच्या देवतेच्या मूर्तीवर नजर खिळवून, चित्त तीवर केद्रित कर मी इथ डोळे मिटून तुझ्या शेजारी बसलो आहे मी माझे विचार तुला अतर्ज्ञानान समजविण्याचा प्रयत्न करीन मग तुला समजल्यावर शब्दामधे तुला जमेल तस वर्णन करण्याचा तू प्रयत्न कर "

मी त्या देवतेच्या मूर्तीसमोर बसलो आणि ध्यानस्थ बसल्याप्रमाणे चित्त त्या मूर्तीवर स्थिर केले मला माझा स्वत चा पार विसर पडला आणि माझी जणू खरोखर समाधीच लागली त्या समाधीत मला प्रभाशकराच्या अतसमयी आपण स्वत हजर आहो असे दृश्य दिसले साध्या दृश्यान आणि मी पाहिलेल्या दृश्यात मुख्य फरक एवढाच की प्रभाशकरानी त्या वेळी काय काय केले एवढेच मी अतर्दृष्टीने पहू शकत होतो असे नाही, तर त्याच्या मनात काय विचार चालले हाते तेहि माझ्या ध्यानात येऊ शकत होते.

ते दृश्य पाहून आणि त्याचे विचार जाणून मी हे शेवटचे वर्णन पुढे लिहीत आहे.

मलीरहून काल प्रभाशकर परत आले आज त्याचा कराचीत हजर राहावे असा वास्तविक बेत नव्हता आपल्या योगाभ्यासात ते इतके रमून गेले होते की तो सोडून येणे त्याना कष्टाचे वाटत होते परतु केवळ लोकानी प्रेमाने केलेल्या मागणीला नाही म्हणणे, व इतक्या माणसाची मने मोडणे योग्य नाही, अशा कर्तव्यबुद्धीने ते आले होते

आज पहाटे उठून, आन्हिक आटोपून ते खाली येण्यास निघाले त्या वेळी त्याच्या मनात एकाएकी असा विचार चमकून गेला की, " सुखाशेच्या मोहात आपण पडावयाचे नाही व मृत्यूचे भय बाळगावयाचे नाही ही आपली सूत्रवाक्ये ऐश्वर्याच्या मोहात दडली तर नाही गेली ? ऐहिक ऐश्वर्याचे भाड पितळी भाड्याप्रमाणे आहे त्यामधे फार वेळ ठेवल्याने मन कळकत तर नाही ? गेली काही वर्षे ऐश्वर्याचा सपर्क झाल्यामुळे नकळत त्याच्या मोहात मी पडलो तर नाही ना ? इतके दिवस मृत्यूला मी क पदार्थ मानीत आलो पण आज माझा पन्नासावा वाढदिवस लोक साजरा करणार, त्या मोहात गुरफटून या वेळी मला मृत्यू नको अशी तर माझ्या मनात इच्छा झाली नाही ना ?

मी मागे सह्याद्रीपर्वताच्या कड्यावर जिवाचा अंत करण्यास उद्युक्त झालो असताना यदृच्छेने मागे पडलो आणि विचार करताना ठरविले की आपण जगाला भिऊन त्याच्यापासून पळून जाण्यात अर्थ नाही. जगापासून आपल्याला कोणतीहि अपेक्षा नाही व मृत्यूचे भय मानावयाचे नाही अशी खूणगाठ मनात बांधून, आपण पुन जगात परत जाऊन जीवन जगून पाहावयाचे त्याप्रमाणे आपण इतके दिवस कर्मयोग आचरणात आणला मग आजच माझ्या मनात मृत्यूची भीति निर्माण झालेली नाही ना ? आजच मला माझ्या जीवनाचा अंत त्या दिवशीसारख्या निश्चयाने करता येईल का ? "

हा विचार प्रभाशकराच्या मनात इतक्या आवेगाने उठला, की त्यांनी आपल्या खोलीतले, बोटीवर असताना जवळ असलेले, पिस्तुल बाहेर काढले आणि ते घेऊन ते प्रार्थनामंदिरात देवापुढे येऊन बसले तेथे बसल्यावर एकदा चिंतन करून, मग पिस्तुलाची गोळी स्वत च्या मस्तकावर उडवावी, असा त्याचा विचार !

पण मग त्यांच्या मनात आले, ' मी पिस्तुलाने तरी माझा प्राण घेण्याची जरूरी का असावी ? योगसाधन करण्याने अनेक सिद्धि प्राप्त होतात त्यांतील एक मोठी सिद्धि म्हणजे इच्छामरण ! वास्तविक मृत्यु हा कुणालाहि त्याचे जीवितकार्य संपल्यावर येतो नेहमी माणसांना आपले जीवितकार्य केव्हा संपले हे कळू शकत नाही कारण ती मोहवश झाल्याने त्यांना स्वत -च्या जीवनाकडे निरपेक्षबुद्धीने पाहाणे शक्य होत नाही म्हणूनच जीवनात गुरफटून गेलेल्या व्यक्तींना त्यातून ओढून बाहेर काढण्याकरता यमदूतांना येण्याची गरज पडते !

पण जेव्हा माणसाने आपली इच्छा ईश्वराच्या इच्छेशी एकरूप करून टाकलेली आहे, व जीवनावर आसक्ति न ठेवता तो निष्काम कर्माचरण करीत आहे त्या वेळी, आपले जीवितकार्य संपून आपल्या मृत्यूचा क्षण आला की नाही हे माणसाला कळावयास हवे !

इच्छामरणाचा अर्थच असा की ईश्वरीइच्छेशी एकरूप झाल्यामुळे मरण्याचा योग्य क्षण कोणचा हे कळून मरण स्वेच्छेने प्राप्त करून घेता यावे ! म्हणूनच इच्छामरणाला म्हणावयाचे सिद्धि !

विश्वाच्या पसाऱ्यात माझे जीवनचरित्र म्हणजे प्रचंड पसरलेल्या कुरणात

वळणे घेत जाणाऱ्या निरुद पाऊलवाटेप्रमाणे आहे! माझे जीवन मीच एकटा जगू शकतो माता, पिता, कांता, कुणीहि माणसावर केवढेहि प्रेम केले तरी ती काही आपले जीवन जगू शकत नाहीत माणूस जन्मून एकाकी जगात येतो – नी एकाकीच जगातून जातो जन्म, जीवन व मृत्यु यातून जाताना कुणी कुणाचा हात धरून सारखा बरोबर चालू शकत नाही. म्हणूनच हा राजमार्ग नाही मोठा, की सर्वांनी टोळक्याने बरोबर चालावे. ही एकेकटयाने चोखाळावयाची पाऊलवाट आहे! मी जन्मलो एकटा नी मी जग सोडणार तेव्हाहि एकटाच माझी पाऊलवाट माझी मी शोधून काढायची असते आणि मी चालून येथून गेल्यावर, विस्मृतीचे तृण फिरून त्यावर उगवेल आणि माझी पाऊलवाट बुजून दिसेनाशी होईल!

माझ्या पाऊलवाटेने मी इतक्या लांबवर एकाकी चालून, आता श्रमून गेलो आहे! मी जन्मभर निष्कामकर्मयोगाचे आचरण केले! आता या जीवनात जगण्यासारखे वा नवीन शिकण्यासारखे काही उरले असे वाटत नाही बुद्धीला व शरिराला आता शीण आला आहे आता मृत्यूच्या आधीन होऊन हे जीर्ण शरीर सोडून जावेसे वाटते परमधाम ईश्वराचे जे चित्स्वरूप आहे त्यात मिसळून जावे, असे वाटते मग मला तरी मरण येण्याला पिस्तुल कशाला? जर मी केलेले कर्मयोगाचे आचरण देवाघरी रुजू झालेले असले, जर आयुष्यभर केलेली ईश्वरोपासना ईश्वराला मंजूर झालेली असली तर मलासुद्धा इच्छामरणाची सिद्धि देवाने द्यावी!"

प्रभाशंकरांनी पिस्तुल चौथऱ्यावर जसेच्या तसेच खाली ठेवले त्यांनी हलकारती घेऊन त्यात कापराच्या पाच वड्या ठेवल्या खुरमांडी घालून ते दर्भासनावर बसले त्यांनी हात जोडून म्हटले, "परमेश्वरा, आजन्म व्रतस्थ राहून निष्काम कर्माचरण मी केले माझे शरीर ज्या पंचतत्वाचे झालेले आहे, त्याच्या द्योतक अशा या पांच कापराच्या वड्या मी हलकारतीत ठेवत आहे तुझ्यापुढे लावलेल्या ह्या हलकारतीतून त्यांचे ज्वलनकार्य संपले म्हणजे त्या क्षणात विझून जातील मागे त्यांचा धूमसुद्धा राहाणार नाही श्वसनागणिक मी तुझी पूजा करत आहे, अशा भावनेने मी आजवर वागून तुझी पूजा केली! ती तुला मान्य झाली असली, तर त्याचे द्योतक म्हणून मला इच्छामरणाची सिद्धि दे. हा कापूर पेटवून ठवून, हलकारती तुझ्यापुढे ठेवीत

आहे तो जळून संपल्यावर त्याची ज्योत मावळेल, त्याच क्षणी तुझ्यापुढे नत झालेल्या या प्रभाशकरांचीहि जीवनज्योती मालवून पंचत्वात विलीन होऊन जाऊ दे !"

प्रभाशकरानी हलकारतीत कापूर पेटवला आणि दर्भासनावर खुरमांडी घालून दोन्ही हात आणि शिर चौथऱ्यावर देवापुढे टेकून त्यानी प्रणाम केला !

नंदादीपाच्या ज्योती दोन्ही बाजूला समाधि लावून उभ्या होत्या देवतेच्या मूर्तीपुढे ठेवलेल्या पुष्पाचा मंद सुगंध सगळीकडे दरवळला होता उदबत्तीच्या टोकातून निघणारा धूर कुठल्यातरी गूढ लिपीमध्ये काही विचित्र सांकेतिक चिन्हे काढल्यासारखा तरळत वर जात होता देवतेच्या मुखावर स्थितप्रज्ञत्वाचे सुमधुर हास्य विराजत होते. तिचा एक हात आशीर्वाद दिल्यासारखा पसरलेला होता चौथऱ्यावर ठेवलेल्या हलकारतीतील कापूर चांगला प्रज्वलित झाला त्याची ज्योत हेलकावत थोडी नाचली, नी कापूर संपल्यावर अचानकपणे पटकन् विझून नाहीशी झाली हलकारतीत खाली चिमूटभर राखसुद्धा राहिली नाही फक्त कापराच्या वडीचा एक चौकोनी काळसर डाग मात्र चांदीच्या हलकारतीत दिसत होता आणि प्रभाशकराचे नत शरीर देवतेपुढे होते, तरी त्याचाहि प्राण शरीर सोडून ईश्वरस्वरूपात विलीन झाला होता ! प्रभाशकराची पाऊलवाट चालून संपली होती ! त्यानी मागितलेली इच्छामरणसिद्धि देवाने त्याना दिली होती !! अशाच वेळी यथार्थतेने म्हणावयाचे—

ॐ शांति शांति शांति ! तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु !!!

---